# अनामिका

: लेखक :

प्रो. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.

पहिली आवृत्ति

न ] मूल्य ३ रुपये [ १९४६

# प्रस्तावना



ललित वाङ्मयाच्या वाचकांचा परिचय मला उपेक्षितांच्या अंतरंगानें प्रथम करून दिला. मीं त्यानंतर लिहिलेल्या वाङ्मयानें त्यांचा व माझा परिचय दृढ झाला. 'अनामिके'चा स्वीकार हे परिचित वाचक कसा करतात हें आतां पहावयाचें आहे. पुस्तकाला नांव काय ठेवावें हें सुचेना म्हणून 'अनामिका' हें नांव ठेवलें!

श्रीपाद महादेव माटे
२५।६।४६

# अनुक्रमणिका

# १. त्याचें धन हरपलें !

भिवा आपल्या खोपींतच रहात असे. शेजारीं मोठें डेरेदार आंब्याचें झाड होतें; पण भिवानें आपली खोप सावली सोडून चार हात दूरच घातली होती. डोंगराच्या उताराचा विस्तार संपला कीं एक तिरका वहात जाणारा ओढा होता, आणि त्याच्या अलीकडे भिवाचें शेत होतें. मला तेव्हां कल्पना नव्हती; पण आतां असें वाटतें, कीं चांगली पंधरा-वीस एकर सलग जमीन भिवाच्या मालकीची असावी. चढाच्या बाजूसच सुंदर बांधलेली प्रशस्त विहीर असून तिच्या मात्याडाकडे वर मान करून पाहिलें म्हणजे मला थोडेंसें भय वाटे. भिवाच्या हाताखालीं एक गडी होता. कदाचित् तो त्याचा भाचा म्हणा, कीं पुतण्या म्हणा, कोणी तरी असेल. मोट धरण्याचें काम नेहमीं त्याच्याकडे असे. बैलांचें तें जणूं कांहीं नाखुषीनें मागें सरकणें आणि मग गणूच्या आसुडाच्या आवाजाबरोबर जोरानें पुढें सरकणें हें बाजूला उभें राहून पहातांना मोठी गंमत वाटे. दर मोटेच्या वेळीं तिच्यांतील पाणी त्या कुंडींत घो घो करीत भरलें म्हणजे पोटांत कसेंसें होई खरें; पण तें फेसाळलेलें पाणी आणि त्याचा पाटाकडे जाणारा लोंढा यांत हात घालून डबडब करीत बसण्यानें मोठी करमणूक होई. पाटाचें पाणी शेतांत शिरूं लागलें व रताळीं, गाजरें, भुइमूग, कांदे यांच्या वाफ्यांत तो जीवनरस डगडगून भरला म्हणजे त्या पिकाइतकाच मला सुद्धां आनंद होई.

सध्यां भिवाच्या शेतांतलें मुख्य पीक म्हणजे शाळू होतें. शाळू बराच तरारून आला होता आणि त्याच्या कडेनें गवारी, भेंडी असल्या भाज्या लावलेल्या होत्या. भिवाच्या शाळूला पाणी बख्खळ मिळत असे. ' तुमी चार मोटा चालावल्या तन्ही माज्या हिरीचं

पानी मुंडा हात त्री हालायचं न्हाई ' असें भिवा मोठ्या ऐटीनें म्हणे. एकरामागें एकर पिकाची थाप सारखी लागून गेलेली असल्यानें मोटेची ' कुरकुर ' अखंड चालू असे. शाळू दाट, जोमदार, आणि रसरसलेला असून गर्द हिरवेपणामुळें कांहींसा काळसर दिसे. डोंगर-कटडीकडून वाऱ्याचा झोत आला म्हणजे शेताच्या कडेपर्यंत त्याच्या-पुढें लवत लवत जाणाऱ्या शाळूच्या पंद्यांची लाटच्या लाट उठत असे. पण भिवाला खरा आनंद गोठ्यांतील बैलांकडे पाहण्यानें होई. तो सुभान्या, तो गवळा, तो पेंजण हे सारे भिवाच्या दौलतीचे खरे खरे खांब होते. ते पांढरे शुभ्र पण मळलेले पोक्त बैल आपल्या मासानें सुस्त होऊन उभे असले म्हणजे आम्हीं त्यास खुशाल कवटा-ळावें. कांही अवखळ जवान मात्र डरकाळ्या फोडतांना व गुडघे टेकून वारुळाची माती शिंगांनीं फेकून देतांना पाहिले म्हणजे पोटांत धस्स होई. एकादा उंच वशिंडाचा रगेल खोंड पिंपरणीखालीं गुंतविलेला असे. त्याचे ते बेगुमान लाल डोळे आणि बुजऱ्या नजरेनें पाहून येणारा–जाणारावर त्याचे होणारे फूत्कार यांच्या धाकानें तिकडे फारसें कोणी फिरकत नसे. चार–पांच गोऱ्हे, चार–पांच कालवडी, आणि पुष्ट कासांनीं ओळंबलेल्या त्या गाई यांनीं भिवाच्या वैभवाला कळस चढलेला होता. भिवा खरोखर सुखी होता; निदान असावयास हवा होता.

भिवाची काठी उंच होती; पण हाडापेरानें तो जरी चांगला मजबूत असला तरी अंगानें अगदीं किरकोळ दिसे. रंगानें तो पहिला निमगोरा असला तरी रानच्या वस्तीनें आणि शेतावरच्या काबाड-कष्टानें अगदीं रापून गेलेला होता. त्याला दुखणेंबहाणें कधीं फारसें आलें नाहीं. पण काय असेल तें असो, त्याच्या अंगावरची कळा मालवल्यासारखीच असे. असें:असलें तरी तो कधीं बसून

राहिला आहे असें झालें नाहीं. मात्र भिवा अगदीं अबोल; त्याच्या तोंडून कधीं शब्द निघावयाचा नाहीं. इतक्या दिवसांत मीं त्याला दोन तीनदांच बोलतांना ऐकलें होतें आणि तेव्हां मात्र मीं त्याच्या तोंडाकडे न्याहाळून पाहिलें होतें. नवराबायको खोपींत रहात असत. कधीं भांडण नाहीं; तंटा नाहीं. दोघें एकटींच असत; घरांत अगदीं शुकशुकाट असे. गणू गांवांतून येई व काम नसेल तेव्हां गांवांत जाई. एकाद्या वेळीं भिवा त्याला कांहीं सांगतांना दिसे; पण भिमाबाई मात्र त्याच्याशीं बोलल्याचें कोणीं पाहिलें नव्हतें.

भिमाबाई भिवाच्या बरोबरीनें काय, पण भिवापेक्षां जास्त राबत असे. सगळ्या वावरावर तिची नजर घारीसारखी फिरत राही. कोपराच्या खालपर्यंत चोळी; चोळीच्या अस्तनीच्या कांठांत तपकिरीची डबी; लुगड्याचा जोरकस काचा; प्रसंग पडल्यास पदराचीच चुंबळ; पायांत करकर करणाऱ्या चेपल्या; हातांत कसला तरी एक फोक; अशी ही भिमाबाई सगळ्या वावरांत तक्षकासारखी भिरीभिरी फिरत असे. दुध्याला फळ धरलें आहे का, गवारीला फूल आलें आहे का, पानांखालीं वाळकें किती लागलीं आहेत, हें पहातां पहातां भिमाबाईची संध्याकाळ सहज खर्च होई. मधून मधून बाभळीच्या नाहीं तर बोराटीच्या काट्या कोयत्यानें तोडून कुंपणाला लावण्यांतही ती दिवसच्या दिवस घालवी. गणूनें मोट धरली कीं वाफे करावयाच्या कामाला भिमाबाई खडी उभी असे. धारा काढण्याचें काम मात्र तिला जमत नसे. तें काम गणूकडेच होतें. भुइमूग काढतांना, खणती लागली म्हणजे, कापणीच्या वेळीं, किंवा तण उपटतांना ती गांवांतल्या दहापांच बाया कामाला लावी; पण जर का त्यांतल्या कोणीं इकडे तिकडे हातबित लावला तर भांडून भांडून ती त्यांचें भुस्कट पाडी. गुराख्याचें पोर डोंगराच्या उतरणीवर गुरें लावून आजूबाजूला कोठें झटकलें तर

त्याला शिवी हसडून खालून तिनें आरोळी ठोकली कीं सारा डोंगराचा पायथा दणाणून जाई. एकाद्या वेळीं शेतांत गुरू शिरलें अन् बांड्या कुत्रा उन्हाच्या तिरपेला सुखानें पसरला असला तर भिमाबाईचा धोंडा भिर्रर करीत लांबून येऊन त्याच्या भकाटींत बक्‌कन् बसला म्हणून समजावें. कुंपणाच्या कांट्या कोणी उपसूं लागलें तर भिमा खोपींतूनच एकदां कडाडली म्हणजे कांट्या टाकून देऊन त्या भुरट्या माणसानें पळ काढलाच पाहिजे. असा तिचा खडा पहारा असल्या-मुळें चोराचिलटाचें कसलेंही भय भिवाच्या शेताला नव्हतें. जमीनीची सुपीकता, पाण्याची सुबत्ता, आणि नवराबायकोची दक्षता यांच्या बळावर भिवाला शेतीचा मामला सुखास पडत असे.

भिवा आपल्या पुतण्याशीं एखाद्या वेळीं बोलत बसे. बैल हरळीला लावावे आणि घोंगड्याच्या दुमत्या घडीवर कोपर रोवून बैलांकडे बघत असतांना पुतण्याशीं बोलत रहावें असें भिवा केव्हां केव्हां करी. पण आसपास मात्र त्या वेळीं कोणी नसे. लांबून पहाणाराला मात्र हे कांहीं तरी बोलत आहेत असें दिसे. तुम्ही जवळून ऐकलें असतेंत तरी भिवा काय म्हणतो आहे हें तुम्हांला कळलें नसतें. गणूचें ' वयू वयू ' तेवढें तुम्हांला कळलें असतें. पण इतर कोणी जवळ नसलें तरी जोंधळयाच्या आडून भिमाबाई त्यांचें बोलणें लक्ष लावून ऐकत उभी राही. नवऱ्याचें बोलणें तिला सवयीमुळें कळत असे. भिवाला आम्ही सगळे लोक ' गेंगाणा पाटील ' म्हणत असूं. त्याचें नाक अगदीं बसकें होतें; किंवा झालें होतें; आणि त्यामुळें त्याचा वर्णोच्चार अगदीं अस्पष्ट, ' फ ' कार-युक्त व थोडासा नाकांत होई. इतर कोणाशीं बोलण्याचा प्रसंग भिवा सहसा येऊं देत नसे. कारण कोणीही झाला तरी त्याच्या असल्या वर्णोच्चारामुळें त्याचें बोलणें पुढें ऐकण्याच्या ऐवजीं

प्रथम हंसूंच लागावयाचा. हें आपलें वैगुण्य ओळखून भिवा इतरांपासून दूरदूरच असे. पण याला कोणाचाच इलाज नव्हता. आम्हां मुलां-च्याशीं तर तो कधींहि बोलला नाहीं. आपण म्हणतों कीं मुलें चांगलीं, देवाचीं लाडकीं, निरुपद्रवी, आणि गोड असतात. पण तें खरें नाहीं. त्यांना कांहीं शहाणपण नसतें. दुसऱ्यांच्या भावनांची त्यांना कल्पनाहि नसते; आणि अवगुणास किंवा शारीरिक व्यंगास फिदीफिदी हंसण्यांत त्यांना कसलाही संकोच किंवा लाज वाटत नाहीं. आम्हीं भिवाचें बोलणें अर्थात् एकाद्या वेळीं ऐकलेलें; पण तेवढ्या माहितीवर आम्हीं त्याला हसावयाचे आणि इतरांप्रमाणें त्याला 'गेंगाणा पाटील' म्हणावयाचे—मला आतां त्या गोष्टीचें वाईट वाटतें. काय वाटेल तें म्हणा; पण ल्हानपणीं आपल्याला अक्कल कमीच असते. आतां मीं त्याला त्या वाईट नांवानें कधींही संबोधिलें नसतें.

भिवा मोठा सज्जन माणूस होता. गांवांतील प्लेगच्या उपद्रवा-मुळें हीं माणसें आपल्या शेताच्या कांठीं राहावयास आलीं आहेत; प्लेग संपला कीं इथून जातील; तर त्यांची थोडीशी वर्दळ आपण सहन करावी; अशा हिशेबानें भिवा वागत असे. तो कधीं कोणावर खेकसला नाहीं कीं कोणाला त्यानें हिडिसफिडीस केलें नाहीं. पण त्याच्याहीपेक्षां भिमाबाईची आम्हा मुलांवर मोठी ममता असे. येवढी कर्दनकाळ बाई, पण आम्हांला ती अगदीं प्रेमळ मावशीप्रमाणें वाटे. आमचीही तिच्याशीं वर्तणूक लाघवीपणाची असे. विहिरींत डुंबावें, पाणी पाटांत वाहूं लागलें कीं तिच्याबरोबर वाफ्यांत शिरावें, आंब्याखालीं बसून ती जितरापाकडे बघत बसली असली म्हणजे आसपास बागडावें; तिचें प्रेमळपणाचें बोलणें कधीं सुटलें नाहीं. भिवा एकटाच गणूशीं काय बोलत असे व भिमाबाई आम्हांला इतकें जवळ कां करी हें आमच्या तेव्हां ध्यानांत कसें येणार ?

भिवा आणि भिमा दोघेही कष्टी दिसत हें मात्र खरें. आम्हां मुलांच्याकडे पाहून कांहीं कांहीं वेळां भिमाबाईचे डोळे ओले होत. पण आतांशीं मात्र भिवा आपल्या पुतण्याशीं एकांतांत बोलत बसला तर तिला खपेनासें झालें होतें. वास्तविक तो त्याचा सख्खा पुतण्या पण भिमाबाई प्रत्यक्ष बोलली नाहीं तरी ती नवऱ्याकडे अशा प्रसंगीं त्वेषानें पाही. अलीकडे अलीकडे तर भिमाबाईचा राग जास्तच होऊं लागला होता. "हे त्याच्याशीं कशाला हितगुज करीत आहेत; आतां आपल्याला काय जरूर राहिली आहे?" अशा नजरेनें ती त्याच्याकडे पाही. तिला वाटे 'हे कांहीं तरी बोलून बसतील; शब्दाला गुंततील.' बायकोच्या वाढत्या रागाचें मर्म भिवाच्या ध्यानांत हळूहळू भरूं लागलें आणि त्याचीहि कळी खुलूं लागली. भिमाबाईच्या तोंडावर जास्त जास्त तजेला दिसूं लागला आणि त्या सगळ्या वावरावरचें तिचें ममत्व अधिकच वाढूं लागलें. आपलें बोलणें कोणी ऐकत आहे कीं काय इकडे लक्ष न देतां भिवा तिला आतां रागें भरून म्हणूं लागला, "तूं कां उनातानांतून हिंडतियास? आंब्याखालीं वाइच् बस; मी वापे भरतु." उल्हासानें भिवाच्या तोंडावर नवी कळा दिसूं लागली. गणूशीं मधूनमधून चाललेलें त्याचें हितगुज जवळजवळ बंदच पडलें. तो आतां कोपींत, नाहीं तर आंब्याखालीं, नाहीं तर शेताच्या बांदावर, भिमाबाइशींच हितगुज करूं लागला. नित्य नेमानें तो वाळकाचा वेल न्याहाळून पाहूं लागला. एकादी काकडी सांपडली कीं तेवढी आठवण ठेवून तो घरीं नेऊं लागला. शाळू आत्तांशी थोडा पोटऱ्याला येऊं लागला होता; पण एकादें ताट जलदीनें सरसावतें व दाणा धरतें. असें एकादें ताट दिसलें तर भिवानें तें कोपींत आणावें आणि हातावर मळूनच त्यांतील दुधानें भरलेलें दाणे भिमाबाईच्या पुढ्यांत ठेवावे.

डोंगराच्या माथ्यावर मंगळाईचें देवस्थान होतें. ज्यांना वर चढवत नाहीं त्यांच्यासाठीं पायथ्याला एका लहानशा कमानींत मंगळाई बसविलेली होती. दर मंगळवारीं भिवा डोंगरावर दर्शनाला जाऊं लागला आणि पायथ्यावरच्या देवीला भिमाबाई जाऊं लागली. आमच्या घरच्या बायका पाण्यासाठीं विहिरीवर जाऊं लागल्या आणि वाटेंत भिमाबाई भेटल्या म्हणजे हसून विचारीत, "कसं काय, बरं आहे ना? जपून असा; बरं ना!" भिमाबाई डोईवरचा पदर सावरून हसून म्हणे "व्हय काकी; मंगळाईच्या किर्पेनं बरं हाय."

जिकडे तिकडे आनंद पसरून राहिला होता. भिवा रागावला तरी त्यांत गोडी होती. त्याला 'व्हय' म्हणून भिमाबाई शेताचें सौभाग्य पहात प्रहरच्या प्रहर बाहेरच घालवी. विहिरींतल्या देवता, माचाडावरच्या देवता, आंब्याकडच्या देवता, बांदावरच्या देवता रोज हळदी–कुंकवानें, नारळानें, कदाचित् आणखी कशानें तरी, संतुष्ट होऊं लागल्या. हा सगळा हंगाम शेतकऱ्यांना फारच उत्तेजक झाला होता. पाऊस, अगदीं वेळच्या वेळीं, हवा तेवढा, पडला होता; उन्हाची तिरीप अजून लांब होती; डोंगराच्या सगळ्या उतरणी हिरव्यागार झालेल्या होत्या; तरी ऋतुमानांत फरक असल्यानें त्यांच्यावर थोडी पिंगट छाया आली होती; पायथ्याला व भोंवतालच्या रानांत झाडोरा हिरवाचार दिसत होता; ओढ्याला पाणी चांगलें खळाळून वहात होतें; विहीर पाण्यानें डबडबली होती; जमिनींतून बाहेर तरारत आलेलें प्रत्येक पीक जोराजोरानें वाढत होतें; आणि त्यांचीं अंगें जीवनरसांनीं टरारून भरत असल्यामुळें, हीं पिकें रंगीबेरंगी तेजांनीं सुशोभित झालेलीं होतीं. कोणाला गोंडे आलेले; कोणाला तुरे आलेले; कोणाचे पंदे लांबलांब वाढलेले; कोणाचा पसारा भुईवरच झालेला; कोणाला पिंगट पांढऱ्या जटा आलेल्या; कोणाला पिवळीं

फुलें; कोणाला करड्या रंगाचीं फुलें आलेलीं; पाटाचें पाणी जवळून पिऊन पिऊन संतुष्ट झालेल्या कण्हेरींना तांबड्या फुलांचे झुपकेच्या झुपके लागलेले होते; भिमाबाईच्या अंगावर रसरशीत कांति पसरली होती; पावसाळ्यांतील धारांनीं सर्व अंग धुऊन गेलेलीं आंब्याचीं, जांभळीचीं, पिंपरणीचीं झाडें प्रसन्न होऊन गेलेलीं होतीं; भिवाचा चेहरा थोडा हसतमुख झालेला होता; कोणाचाही ज्यांना प्रतिबंध नाहीं तीं अल्लड वासरें काय वाटेल तें खात शेतांतून फिरत आणि जोगावत होतीं; शाळू आतां पोटऱ्याला येऊन कांहीं दिवस लोटले होते आणि आतां या टोकापासून त्या टोकापर्यंत अवघें शाळूचें रान हिरव्या दाण्यांनीं खचून गेलेल्या कणसांनीं गजबजून गेलें होतें; मधून मधून स्वस्तिकाच्या आकाराचीं आणि पांढऱ्या पैरणी पेहरलेलीं तीं वाकडीं-तिकडीं बुजगावणीं उभीं होतीं आणि कणसांना टोचावयास येत असलेल्या पाखरांच्या थव्यांना पिटाळून लावण्यासाठीं ठिकठिकाणच्या माळ्यावरून गोफणींचे फडत्कार होत होते; सूर्याच्या औदार्यानें संतुष्ट झालेली भूमि आपलें हरतऱ्हेचें वैभव कवळे भरभरून आणून पुढें मांडीत होती; शेताच्या मध्यावर संध्याकाळीं जमा झालेले पुष्ट आणि डरकाळ्या फोडीत असलेले ते बैल, त्या लेकुरवाळ्या आणि त्या गाभण्या गाई, शिंगांची वाढ सुरू झाल्यामुळें खाजत असलेलीं आपलीं माथीं आईच्या अंगाला घासत असलेलीं तीं अचपळ वासरें, आणि त्यांच्या मेळांत बेदरदपणें उभी राहून कोणाच्या पाठीवर थाप मारीत असलेली, कोणाला कुरवाळीत असलेली व कोणाला कानाला धरून ओढीत असलेली ती अवघडलेली भिमाबाई, हा देखावा पाहून कोणी भाग्यवान्ही हर्षभरित होऊन गेला असता.

आंब्याच्या झाडापलीकडे काल संध्याकाळपासून कांहीं ठाकठोक चालू झाली होती. एक हातभार उंचीचें जोतें मातकटांतच घातलें

होतें व वर खांब उभे राहून लगीही पडल्या होत्या. रात्रीं चांदण्यांतही काम चालू होतें. सकाळीं आम्ही पहातों तों सुतारगवंड्यांनीं रातोरात बरीच तयारी केलेली दिसली. आदल्या दिवशींच भिवाची भावजय, म्हणजे गणूची आई, भिवाच्या खोपीवर फार वेळ बसली होती. काय बोलणें झालें कोणास ठाऊक; पण ती जरा ताणाताणानेंच गांवांत परत गेली येवढें खरें. जातांना, आमच्या झोपडीवरूनच वाट असल्यामुळें, तिला बायकांनीं काय झालें म्हणून विचारलें. "बया, द्येवरजी व्हय म्हन्त्यात; पन् भिमा काय व्हय म्हनत न्हाइ; आमी तरी काय करनार! मी म्हंगाल्ये बया, मला त्येल्पानी काय मिळल त्ये करीन; तुजाआमचा काइ वाकुडपना न्हायी; तूं गांवांत चल; हतं रानांतवनांत बळं कशापायीं करतां! पन् तिनं आपलं याकुच धरलंया, मी आपली मंगळाईच्या दिष्टीम्होरं ऱ्हात्यें! मी आपली मंगळाईच्या दिष्टीम्होरं–हात्यें! आतां आमी तरी का करनार?... जात्यें; वाइच उलीशी दिष्ट असूं द्या" असें म्हणून जानकाबाई गांवांत निघून गेली. सकाळीं सुतार–गंवडी पुन्हा आले आणि कामाला जुपी झाली. भिमाबाई जोरजोरानें गर्जून "अर हाकुंट नीट बग; अर तकुंट लइ खालपाट होतंया" असें त्या कामकऱ्यांना चमकावीत होती. इतक्यांत आढ्यावर बसलेला सुतार उगवतीच्या कोपऱ्याकडे टक लावून पाहूं लागला.

त्या आग्नेयीच्या कोपऱ्यांत लांब अंतरावर पारशांचीं प्रेतें टाकण्याची विहीर होती. तिकडून एक लालसर रंगाचा कसला तरी धुरळा दिसूं लागला. हळूहळू हा आभाळांत जास्त पसरत आहे असें वाटूं लागलें. कामावर आलेल्या लोकांपैकीं यानें त्याला दाखवावें, त्यानें याला दाखवावें असें सुरू झालें. होतां होतां तो लाल पट्टा मोठ्या थोरल्या ढगासारखा दिसूं लागला. वायधूळ

म्हणावें तर सकाळीं नऊ वाजायची वेळ; या वेळीं वायधूळ कधीं उठत नाहीं. वाढतां वाढता हा ढग भराभर वाढत चालला. आणि थोड्याच वेळांत टोळधाड आली असें एकजण ओरडला. दुर्दैवानें त्याचा अजमास खरा ठरला. सुमारें अर्ध्या तासाच्या आंत पूर्व-दिशेची सगळी बाजू लाल दिसूं लागून तें अरिष्ट आभाळांतून पुढें पुढें सरकत येत आहे हें स्पष्ट झालें. आसपासच्या झोंपड्यांतील सगळीं माणसें बाहेर येऊन हा भयंकर देखावा बघूं लागलीं, आणि त्यांना धडकीच भरली. थोड्याच वेळांत डोक्यावरचें सगळें आभाळ या टोंका-पासून त्या टोंकापर्यंत लालेलाल होऊन गेलें. 'टोळधाड, टोळधाड' असा शब्द आम्हीं ऐकला होता. पण ती कशी असतें हें कोणी पाहिलें नव्हतें. टोळांशिवाय आतां डोक्यावर दुसरें कांहीं दिसेनासें झालें. ज्वाळांचें छत जसें बनवावें तसा प्रकार झाला. टोळ किती असतील याची मोजदाद कोण करणार ? सरासरी टीचभर लांबीचा एकेक टोळ होता आणि त्याचे पंख लालभडक होते. असे कित्येक अब्ज टोळ थवेच्या थवे करून डोक्यावरून चालले होते. एखाद्या नदीला महापुराच्या वेळेला गढूळ पाण्याच्या जशा लाटावर लाटा येत असतात, तशा या टोळधाडीला लाटा येत होत्या. सुदैव इतकेंच कीं हे टोळ माणसांना चावत नव्हते. परंतु देखावा इतका भयंकर होता, कीं कोणाही माणसाचें धैर्य गलित झाल्याशिवाय राहिलें नाहीं.

एकामागून एक येत असलेल्या या लाटा आतां भुईवर उतरूं लागल्या. जेथें जेथें हिरव्या उद्भिज्याचा थोडासुद्धां मागमूस दिसला तेथें तेथें यांचीं पथकें उतरूं लागलीं. डोंगराच्या सगळ्या उतरणी लालभडक होऊन गेल्या. भोंवतालच्या माळजमिनीवर खंडोगणती लाल मिरच्या वाळत घातल्यासारखें दिसूं लागलें. प्रत्येक झाड,

झुडूप, झाडोरा, गवत, पीक, हरतऱ्हेचें आणि सर्व प्रकारचें उद्भिज्य या टोळांच्या तडाख्यांत सांपडलें. सत्त्वांश नष्ट करण्याची या टोळांची शक्ति विलक्षण होती. दोनदोन तासांच्या आंत मोठमोठाल्या झाडांचे त्यांनीं खराटे करून टाकले. एकेका झाडावर आणि फांदीवर यांच्या एवढाल्या धाडी बसत कीं चांगल्या चांगल्या झाडांच्या फांद्या कडाकड मोडून पडलेल्या आम्हीं पाहिल्या. वर खावें आणि खालीं घाण करावी असा यांचा सपाटा चालू होता. प्रत्येक झाडाखालीं घोटाघोटा लेंड्यांचा खच पडूं लागला. सगळें उद्भिज्य अगदीं फन्ना झालें म्हणजे हंतरल्याप्रमाणें बसलेले हे टोळ उड्डाण करून पुढें जात. डोंगर, ओढ्याचे कांठ, माळ, आणि सगळ्या टापूंत जिकडे तिकडे डौलानें उभीं असलेलीं लहानमोठीं हजारों झाडें, हीं सर्व पांचचार तासांच्या आंत अगदीं बोडकीं होऊन जाऊं लागलीं. त्यांतल्या त्यांत कणखर उद्भिज्याचा जेथें असा फन्ना पडला तेथें माझ्या त्या भीमा–मावशीच्या कोंवळ्या आणि नाजूक शेताचें काय झालें असेल हें सांगावयास हवें काय ? या टोळधाडीला किती वर्षें होऊन गेलीं. परंतु तो घोर प्रकार माझ्या मनांत अजूनही जसाच्या तसा जागृत आहे.

भिवाचें सगळें वावर सुंदर पिकांनीं भरून गेलेलें होतें. पिकें रसरसलेलीं होतीं. कणसांतील दाणे रसानें टचाचलेले होते. वेलांना फळें लोंबत होतीं आणि जिकडे तिकडे लक्षावधि हिरव्या पंद्यांचा डौल माजून राहिला होता. आतां मात्र या सगळ्या मधुर वैभवावर हे दुष्ट राक्षस येऊन पडले. आम्हा माणसांची शक्ति ती काय असणार ? पण हातांत पोत्यांचें घडपें धरून पिकावर बसलेल्या टोळांना झोडपण्याचें काम माणसें करीत होतीं. भिवाही धावपळ करीत होता; भिमाबाई मात्र कोठें गेली कोणास ठाऊक. पण पीक अफाट; टोळ

तर अगणित आणि त्या मानानें माणसें फारच थोडीं. त्या सगळ्या शिवारांत टोळांशिवाय कांहींच दिसेना. दोन तासांच्या आंत नवजीवनानें, कोवळ्या कणसांनीं, पल्लेदार हिरव्याचार पंद्यांनीं, फुलांनीं, फळांनीं आणि सुवासिक हरळीनें गडगंज भरून गेलेलें तें सगळें शेत अगदीं निपटून बोडकें झालें, आणि जिकडे तिकडे सुतकाची छाया पसरली. पुढल्या रानांतील उद्भिज्याचा नाश करण्यासाठीं टोळांच्या फौजा उडून गेल्या आणि गवतावांचून जमीन, धान्यावांचून कणसें, पंद्यांवांचून ताटें आणि पानांवांचून झाडें असा करुणास्पद देखावा मागें शिल्लक राहिला ! हा देखावा कोण सहन करणार !

भिवा सुन्न होऊन सगळ्या शिवाराकडे पाहत होता; मधून मधून तो खोपींतून जाऊन येई; त्याच्याशीं तरी कोण बोलणार ?—आणि कोण कोणाशीं बोलणार ? त्याच्या तोंडाकडे कोणाला बघवेना, सकाळीं सूर्यनारायण वर आला तेव्हां तेथें काय शोभा, सौंदर्य, आणि धन तुडुंब भरलेलें होतें ! पण दोन प्रहरांच्या आंत जिकडे तिकडे खराटे उभे राहिले आणि हिरवीं तृणें पांघरलेली भूमि रक्तक्षयी दिसूं लागली. गांवांतून भिवाचे कोणी कोणी नातेवाईक आले होते ते बाहेर वावरांत उभे होते. जानकाई मात्र खोपींत जी गेली ती बाहेर आली नाहीं. पण नवऱ्याला प्रसंगविशेषीं गुंडाळून ठेवणारी आणि सगळ्या शेतावर एकाद्या संरक्षक वनदेवतेसारखी भिराभिरणारी ती शेतावरची शूर रायबागीण, ती शेतावरची चांदबिबी कुठें आहे ? भिवा मधून मधून खोपीवर जाई व परत येई. गणू बोलवावयास आला म्हणून आमच्या शेजारच्या सावित्रीकाकू तिकडे गेल्या. मागोमाग आणखी दोघीचौघीजणी गेल्या. हळूहळू तें शेताचें स्मशान सोडून सगळीच मंडळी खोपीच्या आसपास खिन्न होऊन जमूं लागली. बाहेर अवघी भूमि विनाशाच्या तिडका देत होती आणि कण्हत होती; आंत खोपींत

भिमाबाई वेणा देत होती आणि विवळत होती. भूमीला हा अरिष्टाचा भार सहन होईना; भिमाबाईलाही हा अरिष्टाचा भार उचलतां येईना. शेवटीं तिनें साडेसात महिने पोटांत वाढविलेला त्या शेताचा भावी धनी आधींच धास्ती खाऊन निश्चेष्ट होऊन बाहेर पडला.

भिवा ओक्साबोक्शीं रडत खोपीच्या बाहेर उभा आहे. त्याचे नातेवाईक आणि झोपडीवरचीं माणसें शून्य दृष्टीनें दिगंतांत पहात आहेत. भाबडा गणू विहिरीकडे पहात डोळे पुशीत उभा आहे. जमलेल्या आयाबाया एकमेकींत कुचूकुचू करीत आहेत; भिवाच्या शेताचा पाचोळा होऊन पडला आहे आणि त्यावरची अधिष्ठात्री देवता भिमाबाई खोपींत घरघरत पडली आहे. सगळे टोळ विध्वंसनासाठीं पुढल्या मुक्कामाला गेले आहेत.

---

# २. तातूकाका

**तातू**काका आमच्या घराच्या शेजारींच रहात असत. आमच्या घरच्या माणसांचा व तातूकाकांच्या माणसांचा मोटा लोभ असे. आम्ही दोघेही ओढगस्तच होतों. पण तातूकाकांच्या घरीं माणसें फार; त्यामुळें त्यांची जास्त तिरपीट उडे. त्यांची बायको, एक मुलगा, एक मुलगी, त्यांची सासू, मेव्हणा, व मेव्हणीचा नवरा इतकी मंडळी त्यांच्या घरांत असत. शिवाय, स्वतः हे आहेच. तातूकाकांना पंधरा रुपये पगार मिळत असे. त्याला माणसांच्या संख्येनें भागलें तर प्रत्येकीं सरासरी दोन रुपये सव्वा दोन आणे पडले असते! स्वस्ताई कितीही असली आणि कितीही कदान्न खाल्लें तरी एवढ्या आयांत इतक्या माणसांचा गुजारा होणें फार कठीण होतें. हीं माणसें खरोखर काय करत असतील याची मला आतां कल्पनासुद्धां करवत नाहीं. तेव्हां तर मला कल्पनाच नव्हती. बायको ती बायको; सासू ती सासू; तीं मुलें बापडीं पांच–सात वर्षांचीं; मेहुणी तरणीताठी; तिला जपलेंच पाहिजे; येऊन जाऊन साडूनें कांहीं तरी अंग हलवावयास हवें होतें. म्हणजे तातूकाकांच्या आयांत कांहीं भर पडली असती. पण तो साडू अर्धवट होता आणि त्याला मधून मधून वुरें येत असे.

**सग**ळींच माणसें—अर्थात् अर्धवेडा साडू सोडून—मोठीं शहाणीं, मानी, आणि थोड्यांतही समाधान मानणारीं होतीं. यमूताईचें लग्न लहानपणींच झालें होतें; त्या वेळीं गजाननराव हे अर्धवट निघतील आणि त्यांना कांहीं व्यथा जडेल अशी कल्पना नव्हती. पण ते जसजसे मोठे होऊं लागले तसतसे त्यांच्या प्रकृतींतील दोषच वाढूं लागले; आणि शेवटीं ते केवळ 'अजागळ' या कोटींत जाऊन बसूं लागले. बारकाईनें पाहिलें तर त्यांच्या चेहऱ्यावरची छाया कांहीं वाईट

नव्हती, पण माणूस कितीही तरतरीत असलें तरी जर बहिरेपण, फेंफरें, असा कांहीं दोष त्याला जडला तर त्याची ती तरतरी अगदीं मालवल्यासारखी होते; आणि तें बथ्थड व कळाहीन दिसूं लागतें. यमूताई सोळा सतरा वर्षांची असेल. तेव्हांच्या चालीप्रमाणें, जें काय थोडें किडूकमिडूक आईपाशीं होतें तें ती अंगावर घाली, कारण सौभाग्यालंकार घालणें अवश्य असे. नाकीं डोळीं यमूताई अगदीं रेखीव होती; आणि वर्णानें तर अगदीं लखलखीत होती. मेहुणीच्या नवऱ्याची अशी प्रकृति पाहून, आणि त्याला त्याच्या घरचें संभाळणारें कोणी नाहीं म्हणून, तातूकाकांनीं बायकोच्या आग्रहामुळें तें जोडपें घरीं आणलें होतें. दुसरा कांहीं इलाजच नव्हता. आणि नातेवाइकांच्या संबंधाची उपेक्षा सध्यांइतकी तेव्हां वाढली नव्हती. काय भीठभाकरी मिळेल ती आपण सर्वजण खाऊं असें लोक म्हणत असत.

सासूबाईपाशीं कांहीं थोडी माया असावी असा तातूकाकांचा अंदाज नसला तरी शेजाऱ्यापाजाऱ्यांना असें वाटे कीं, या वृद्धेपाशीं थोडेंबहुत कांहीं असावें. अनुभवानें असें दिसून आलें कीं या बाई-पाशीं कांहीं नाहीं. पण तिची चालचलणूक, बोलण्याची ढब, आणि तिचा तोंडावळा यावरून थोडा तिखटपणा, तुसडपणा, आणि इतरांस जरब बसविण्याची इच्छा असे गुण तिच्या अंगीं आहेत असें वाटे; पण जवळ कांहीं असल्यामुळें ती अशी वागते असा गांवढ्या लोकांचा समज झाला होता. खेडगांवला एक पहाण्यासारखें असतें. कोणताही विषय असो, त्याचा संबंध पैशाशीं यावयाचा हें ठरलेलें असतें. 'तुम्हांला काय पगार आहे' 'तुमचें उत्पन्न केवढ्याचें आहे,' 'दुकानावर काय किफायत होते,' असले प्रश्न आपण शहरांत एकमेकांस विचारावयास धजत नाहीं; पण खेडेगांवांत तेच प्रश्न मुख्य

असतात. या प्रश्नांची प्रवृत्ति सगळीकडे दिसते. अर्थात् तातूकाकांच्या सासूबाईच्या स्वाभावाचा अर्थ लोकांनीं अर्थदृष्ट्या लावावा हें स्वाभाविक होतें.

तातूकाकांची बायको गोप्काबाई मोठी कष्टाळू आणि सोशिक असे. अगदीं भरड सुतड्यापलीकडे तिला दुसरें कसलें वस्त्र मिळण्यासारखें होतें? पण ती स्त्री आपल्या रसरशीतपणानें त्या तसल्या वस्त्रालाही शोभा आणी. मुलें मोठीं चुणचुणीत आणि घारोळीं होतीं. आईची छबी मुलाच्या तोंडावर आणि बापाची छबी मुलीच्या तोंडावर स्पष्ट उमटलेली होती. राहतां राहिले तातूकाका. ठेंगणे, गोरेपान, गुल-मिशा राखलेले आणि रुंदट तोंडाचे हे गृहस्थ मोठे गंभीर दिसत असत. सुमारें पंधरा रुपये मिळविणारा मनुष्य असा काय विद्वान् किंवा विचारी असणार आहे, कीं त्यानें असें गंभीर दिसावें? पण तातूकाका तसे दिसत ही गोष्ट खरी.

घरांत दारिद्र्याची करकर फार असल्यामुळें माणसाच्यांत समाधान-वृत्ति असूनही पुष्कळदां भांडणें होत असत. ठकी आणि गणू गूळ-पाण्यांत कालविलेलें लाह्याचें पीठ त्याला जास्त कां आणि मला कमी कां? या मुद्द्यावर वर्दळीवर येत. तातूकाका तें पाहत. सासूबाई आपल्या देहस्वभावाप्रमाणें कडाकडा बोलत; पण तातूकाकांनी तिकडे कधीं ढुंकूनही पाहिलें नाहीं. वास्तविक पाहतां संसार मुलीचा होता. पण आपला वरचष्मा जेथें तेथें चालला पाहिजे ही खोड सासूबाईना होती. सर्वांनीं आपल्या कदरेंत राहिलें पाहिजे अशी त्यांची इच्छा असे. त्यामुळें त्यांचें तोंड मधून मधून वाजूं लागे. पण आपल्या मुलांना जरी त्या तडातड बोलत आहेत असें तातूकाकांनीं पाहिलें तरी ते आपले धीरगंभीर असत. लेक येवढी झालेली; मुला-बाळांची आई; घरांत साडूसारखीं तिऱ्हाईत माणसें; पण तिचें येवढें

कांहीं चुकलें कीं तिला ' आचरट, अजागळ ' असले शब्द त्या बोलत. बायकोचा असा अपमान होत असतांना सुद्धां तातूकाका कधीं उसळून उठले आहेत असें झालें नाहीं. त्यांची शांति कायम ! आईवर मुग्ध टीका करण्यासाठीं गोप्काकाकूंनींही त्यांच्याकडे कधीं पाहिलें तरी त्यांच्या चर्येवर केव्हांही प्रतिजबाबी छाया उमटली नाहीं. ते आपले घुम्म असत. यमू वयानें लहानच, पण मोठी शहाणी होती. आपण व नवरा आपल्या मेहुण्याच्या घरीं केवळ भारभूत आहों य गोष्टीची जाणीव त्या बिचारीला सदैव असे. म्हणून घरांतलें पडेल तें कामधाम ती अंग मोडून करी. खेडेगांवची वस्ती; पाणी दूरचें; उन्हाळ्यांत तर दोनदोन मैलांवरून तें आणावयाचें; धुण्याची मोट रोज घरून तिथें न्यायची, आणि येतांना खांद्यावर दहापांच पिळे आणि कडेवर घागर असें घामानें निथळत परत यायचें. पण थोरल्या बहिणीच्या बरोबरीनें यमू राबत असे. तातूकाकांच्या डोळ्यासमोरच हें सगळें चाललेलें असावयाचें. पण ते एक अवाक्षर कधीं बोलले नाहींत; कीं नुसतें ' भले ' सुद्धां म्हणाले नाहींत. त्यांचें गांभीर्य कधीं ढळावयाचें नाहीं. कचेरींत गेले नसले म्हणजे ते आपले पारावर बसलेले असावयाचे. गजाबा—आळींतलीं हिशेबी माणसें गजाननराव या तातूकाकांच्या साडूला या नांवानेंच संबोधीत—गरीब आणि आळशी खरे पण इतक्या वेंधळेपणांतही त्यांच्या अंगीं एक खोड होतीच. त्यांच्या खिशांत केव्हां केव्हां बिडीचीं थोटकें सांपडत ! खेडेगांवांत बहिर्दिशेला लांब जाण्याची वहिवाट असते. पण गजाबा फारच लांब जात आणि तिकडे दहापांच झुर्के मारून परत येत. तातूकाकांनीं हें केव्हां केव्हां पाहिलें होतें. पण ते कधीं साडूला एका अक्षरानें बोलले नाहींत. गजाबा त्यांची काड्याची पेटी डोळा

चुकवून नेत असत. पण ते कधीं बोलले म्हणून नाहींत. ते निजले नसले म्हणजे आपले पारावर बसलेले असावयाचे.

बरें, ते बोलत नसत म्हणून घरांतलीं माणसें त्यांच्याशीं किंवा त्यांना बोलत नसत असें नाहीं. टकी अगदीं चिमखडा पोरगी होती. परकर सावरून पारावरच ती गजगे खेळावयास बसे. तिच्या साळकाया म्हाळकाया मैत्रिणी गोळा होत; आणि हाप्पी-बोर-खड्याचा धुमाकूळ सुरू होई. मध्येंच ती बापाला विचारी, " काका, किती झाले हो ? " पण काकांनीं आपलें सनातन मौन कधीं सोडलें नाहीं. ते तिच्याकडे नुसतें सुंदपणानें पहात. त्यावर ती चावट पोरगी म्हणे ' बघा ! तोंड तरी उघडताहेत का ! ' गणू तर शाळेंत अगदीं तलवारीच्या पात्यासारखा होता. परीक्षा झाली कीं तो नुसता उड्या मारीत घरीं यायचा. " काका, काका मी पहिला, मी पहिला, हे बघा मार्क " असें म्हणून त्यानें ते तातूकाकांना दाखवावेत; पण त्यांनीं त्याची कधीं पाठ थोपटली नाहीं कीं ते कधीं हसले नाहींत. त्यावर तो म्हणे " नाहीं तर नाहीं, मी आपला आईकडेच जातों. " ते त्याच्याकडे झोपाळलेल्या डोळ्यांनीं बघत रहात. एक वाजला म्हणजे गोप्काबाई त्यांना म्हणत " आतां आंघोळीला उठायची वेळ नाहीं का झाली ? " या वेळीं मात्र त्यांच्या छबींत थोडा फरक पडे. तातूकाका अंगापिंडानें चांगले भरलेले, तेजस्वी आणि बांधेसूद असत. घरांत सदा उघडेबंब बसलेले असावयाचे. बायको असें म्हणाली म्हणजे त्यांचें तोंड थोडें किलकिलें व्हावयाचें. म्हणजे ते हंसताहेत असें तिनें समजावयाचें. सासूबाई एकाद्या वेळीं आंतून कडाडत " असली द्वादशी म्हणून काय झालं, हे बृहस्पति उठून एकदां जेवले म्हणजे दोन अडीच वाजतां आमची अन् अन्नाची गांठ पडायची ! " मग मात्र तातूकाका चटकन् उठत.

पण आंघोळीला जातां जातां तिथेंच अंगणांत खुंटीवर लोंबत असलेल्या एका मांजरपाटी घडण्याकडे ते लक्ष लावून पहात. त्याचीं खालचीं टोकें कात्रीनें कापून कापून घेतल्यासारखीं दिसत असत. पलीकडे एक बाज भिंतीला टेंकून उभी केलेली असे, तिच्या काथ्याकडेही ते लक्ष लावून पहात. हळूहळू तिचा काथ्या कमी होत चालला होता. पारावर बसलेले असले म्हणजे त्यांचे डोळे कित्येकदां लालबुंद झालेले दिसत. ते पहात असले तरी त्यांना कांहीं दिसत नाहींसें इतरांना वाटे. गणू अभ्यास करतांना भूगोलावर आला म्हणजे पाठ करतांना म्हणे "कडेगांव येथें पासोड्या होतात, कडेगांव येथें पासोड्या होतात; म्हसवड येथें घोंगड्या होतात; ऐतवडें येथें केळीं होतात, ऐतवडें येथें केळीं होतात; लेंगरें येथें गांजा फार पिकतो, लेंगरें येथें गांजा फार पिकतो;" गणू या कुग्रामावर येऊन पाठ करूं लागला म्हणजे मात्र तातूकाका मान वळवून त्याच्याकडे मुद्दाम पाहात आणि तें वात्रट पोर, 'लेंगरें येथें गांजा फार पिकतो' असें दहादहा वेळां मुद्दामच घोकी.

घराच्या अंगणांत एक औदुंबराचें झाड होतें; त्याला लागून एक कट्टा होता. त्याला पार म्हणत. त्याच्यावर तातूकाका बसलेले असावयाचे. शेजारीं एका मडक्यांत हिरवी तंबाखू—म्हणजे गांजा असे. गांजा निवडणें, भिजविणें, मळणें, हा रोजगार तासनूतास चालत असे. कचेरीचें काम सकाळीं दहा वाजतां संपे व दुपारीं दोहोंला सुरूं होऊन पांचाला संपे. सकाळीं कचेरींतून आले कीं काका हुश्श करून जे बसत ते एक वाजतां हलत. संध्याकाळीं आले म्हणजे मात्र गांजा—मळणीचें काम जोरानें चाले. गणू, ठकी, व ठकीच्या पाठचीं दोन भावंडें, यांच्या वेळीं दर बाळंतपणांत बाजलें तयार झालेलें होतें. पण प्रत्येक बाजल्याचा काथ्या तातूकाकांनीं गांजा-

खालीं नाहींसा केला होता. गांजा—गांजानें त्यांच्या पोटांत आग पडते म्हणून बायको त्यांतल्यात्यांत ओढाओढ करून थोडें दूधतूप त्यांना घाली. गांजा ओढूं लागले, तेव्हां ते पहिल्या पहिल्यानें शिवीगाळ करीत; पण आतां ते अगदीं संथ झाले होते. दर गुरुवारीं मात्र सकाळीं स्नान होऊन गांवांतील दत्ताची पूजा करून यावयाचें; परत येतांना विष्णुसहस्रनामाचा पाठ चालावयाचा; परत आल्यावर घरांत गुरुचरित्राचें वाचन व्हावयाचें. मग गणू, ठकी यांना आग्रहानें बरोबर नेऊन बाजारांत चारदोन आण्यांची खरेदी व्हावयाची. रताळीं, केळीं, शिताफळें असें कांहीं तरी फराळाचें यावयाचें. गोप्काकाकूंनाही अर्थातच गुरुवार असे. फराळाच्या वेळेला ठकीला आणि गणूला ते हाका मारावयाचेच. सासूबाई खेकसून म्हणत "आहे किती अगोदर; त्यांतलं काय द्यायचं आहे या आशाळभुतांना?" पण तातूकाका ऐकायचे नाहींत. मुलांना प्रेमानं जवळ घेऊन त्यांच्या हातावर थोडथोडें ठेवावयाचे. बापापुढें खुरमांड्या घालून बसलेलीं मुलें आठा दिवसांनीं एकदां तरी हरखून जात. दुपारीं कचेरींतून आल्यावर गणपति, दत्त, सांब इत्यादि देवतांचें दर्शन व्हावयाचें. त्या दिवशीं पारावर गांज्याचें गाडगें, काथ्या, छापी, निखारा इत्यादि कांहीं नसावयाचें. शुक्रवार उगवला कीं ये रे माझ्या मागल्या सुरू व्हावयाचें. पण एक होतें कीं त्यांचा कोणाला उपद्रव नसे.

पण हें किती दिवस चालणार? गांजालाही खर्च बराच येई. दुष्काळ वरचेवर पडत आणि गोप्काकाकू अगदीं रंजीस येत. शेवटीं स्वावलंबन म्हणून सासूबाईंनीं आपल्या धाकट्या जामाताला म्हणजे गजाबाला झोळी घ्यावयास लावलें. बिचाऱ्या यमूच्या मनाची घालमिल झाली पण कांहीं इलाज नव्हता. आनं-

दाची गोष्ट येवढीच होती कीं, गणू व ठकी फार हुशार मुलें होतीं व गोप्काकाकू त्यागाची व कष्टाची मूर्तिमंत पुतळी होती. काकांचें गांजाचें व्यसन पुढें पुढें इतकें झालें कीं, कचेरीच्या कामांत घोटाळे होऊं लागले. कागदपत्रांत घालमेली होऊं लागल्या. काका दोनला यावयाचे ते तीनला, चारला येऊं लागले. मामलेदारांनीं पुन्हां पुन्हां समज दिली. काका मूळचे मोठे हुषार; अक्षर मोत्याच्या दाण्यासारखें; आणि काका टाकाला बळकट; पण त्यांची गांजाची तारच उतरेनाशी झाली. मामलेदार तरी काय करणार ? बरोबरीच्या कारकुनांनीं कांहीं थोडें त्यांचें काम करावें, असें कांहीं दिवस झालें. पण नित्य उठून ही दगदग कोण सोसणार ? एकदां पगार घेऊन काका बाहेर पडले आणि वाटेंतच त्यांनीं एक रुपयाचे पेढे घेतले, अन् ताबडतोब खाऊन टाकले. गोप्काकाकूंनीं विचारलें तर म्हणाले ' आज गुरुवार आहे ! ' वास्तविक त्या दिवशीं मंगळवार होता. शेवटीं त्यांनीं कचेरींत जाऊन सांगितलें कीं पगार यांच्या हातीं देऊं नका. माणसें सत्राप, सालस, व कुलीन होतीं. मामलेदार संभाळून नेऊं लागले. गांवांतही त्यांची भलाई होती. त्यामुळें अडीअडचणीला कोणी तरी उभें राही. पण तातूकाका दिवसेंदिवस वहावतच चालले. तपासणीच्या वेळीं त्यांना वाईट शेरा मिळाला. ते थोडे शुद्धीवर आले. पण तें जमेना. ती चिलीम अन् ती छापी त्यांना दौत-लेखणीपेक्षां प्रियकर वाटूं लागली. शेवटीं दुसऱ्या तपासणीच्या वेळीं शासन होणारसें दिसूं लागलें. बदली झाली तर आपले हाल आहेत हें घरच्या माणसांनीं ओळखलेंच होतें. प्रांतसाहेबांनाही ही हकीकत ऐकून वाईट वाटलें. तातूकाकांना त्यांनीं सर्वांच्या देखत समोर बोलावून आणलें, आणि जरब देऊन ते म्हणाले, " तुम्ही कामांत हयगय करतां,

सरकारची नुकसानी होते, तुम्हांला शिक्षा करणें भाग आहे." तातूकाका चोरट्यासारखे उभे राहिले होते; बाकीच्यांना त्यांची दया आली; ते हात जोडून उभे होते. प्रान्त म्हणाले "तुमचा अपराध तुम्हांला कबूल आहे काय?"

तातूकाका उत्तरले "होय साहेब, मी अपराधी आहें."

"मग तुमची बदली करावयाचें आम्ही ठरवितों."

"साहेब, मजवर दया करावी."

"करूं, पण ती इतकीच कीं बदली तुम्हाला जेथें हवी असेल तेथें करूं. बोला कराड, दहिवडी, तासगांव, कुठें करूं सांगा."

तातूकाका थोडें चाचरले व म्हणाले, "करायचीच तर लेंगऱ्याला करा.!"

प्रान्तसाहेबांचा सगळा दरबार हास्याच्या महापुरांत वाहून गेला. "अहो तातूकाका! लेंगऱ्याला मामलेदार कचेरी नाहीं तुम्हांला माहीत नाहीं का?" असें म्हणून प्रांत पोट धरधरून हंसूं लागले. "तुमच्या भेटीला लेंगरं इथं रोज येतच आहे!"

पुढें त्यांचें काय झालें मला आठवत नाहीं; पण माझी खात्री आहे कीं, तातूकाकांची बदली रहित झाली असावी. कारण त्यांच्या भलेपणावर सर्वांची श्रद्धा होती. त्यांचा गणू शिक्षणक्रमांतून तीरासारखा पुढें गेला. इंग्रजी पांच बुकें होतांच त्यानें 'कडकट्ट'चा अभ्यास केला. आणि त्याची तारमास्तर म्हणून नेमणूक होऊन दोन वर्षांच्या अवधींत त्याला साठांची जागा मिळाली. गोप्काकाकूंचा सगळा श्रमपरिहार झाला. यमूचे मानसिक क्लेश थोडे कमी झाले. त्यांना सुखानें झोंप येऊं लागली. गणू तातूकाकांचा फार लाडका होता. त्यांच्या गांजाचीही व्यवस्था तो करूं लागला. गोप्काकाकू त्यांना दूधदहीं पोटभर घालूं लागल्या. गणूला कोणीं ब्र म्हटलेलें तातूकाकांना खपेनासें झालें!

# ३. पहिला वसंत !

ही गोष्ट कुठें घडली आणि केव्हां घडली हें मला आठवत नाहीं. मलाच काय पण इतिहासालासुद्धां आठवत नसेल. पण ती कुठें तरी आणि केव्हां तरी घडली हें मात्र खास. हें स्मरण मात्र मला पक्कें आहे. बारीक बारीक तपशील मला आठवून आठवूनच लिहावा लागला. पण मनावर त्या प्रसंगाचें चित्र खोलवर उमटलेलें होतें म्हणून तें साधलें. या प्रसंगाची नोंद इतिहासांत सांपडावयाची नाहीं. कारण या प्रसंगानंतर कित्येक शतकेंपर्यंत जिकडे तिकडे सामसूमच होतें. मग कृत्रिमाला सुरुवात झाली. इतिहास लिहिण्याची रानटी चाल फार मागाहून पडली.

डोंगरामागें डोंगर लागले होते आणि उंचीच्या कामांत त्यांच्यांत चढाओढ लागल्यासारखी दिसत होती. त्यांच्या अंगावर बर्फाचीं जाड आस्तरणें पसरलेलीं होतीं. त्यांच्या माथ्याच्या भोंवतीं ढगांच्या प्रदक्षिणा किंवा येरझाऱ्या चाललेल्या होत्या—इतक्या दूरचें दिसलेलें तरी किती असणार आणि इतक्या दूरचें आठवणार तरी किती ! एकादें गमतीदार स्वप्न पडावें, आणि सकाळ झाल्यावर सुन्न मनानें तोंड धुतांना तें आठवण्याचा यत्न करावा तसें माझें झालें आहे. खरोखर तो देखावा पाहून मला फार फार वर्षे लोटलीं. कांहीं तपशील आठवतोसा वाटतो आणि आठवतां आठवतां मनांत विरून जातो. कांहीं डोंगरांच्या खांद्यांवरून पाण्याचे पांढरे शुभ्र प्रवाह खळाळत खालीं येत होते. अलीकडच्या डोंगरांच्या डोक्यावर हिरवेंगार उद्‌भिज्ज वाढलेलें होतें. पण असल्या जवळच्या किंवा दूरच्या शांत देखाव्यांपेक्षां माझ्या मनाला ज्यांची भीति वाटली ते देखावे मला जरा जास्त चांगले आठवतात. डोंगराच्या खोल गव्हारांतून

मधून मधून एकादी गंभीर आणि मंद्र गर्जना उठत असे आणि लांबवर पसरलेल्या डोंगराच्या अंगांतून शिरशिरत शेवटपर्यंत जाऊन ती विरून जाई. भलें मोठें धिप्पाड सिंहाचें जोडपें तोंडांत हत्तीचें गंडस्थळ लोंबत आणून एकाद्या पठारावर येऊन बसे. संध्याकाळच्या उन्हानें झळकणाऱ्या बर्फानें डोळे दिपल्यामुळें हीं श्वापदें डोळे मिटून घेत असत. आणि आपलीं अजस्र अंगें एकमेकाला घांशीत असत. त्यांचे मांसखंड हिसकून घ्यावयास जरी आसपास कोणी नव्हतें तरी मत्सराच्या रागानें तीं जोरजोरानें गुरगुरत असत. पठाराच्या खालच्या तळवटांतून दोन दोन पुरुष उंचीचीं माजोरी गवतें वर आलेलीं होतीं आणि त्यांचे बुंधे खालच्या पाणथळ भूमीच्या चिखलानें बरबटलेले होते. असें कांहीं कांहीं स्पष्ट आठवतें.

या गवतांच्या पोटांतून कोण प्राणी वावरत असत कोणास ठाऊक; पण मधून मधून तीं जमिनीसरशीं झालेलीं दिसत येवढें मात्र खरें. आपल्याला मारावयास डोक्यावर चढलेल्या वाघासकट लोळण घेऊन त्याला चिरडून टाकलेला एकादा प्रचंड हत्ती रक्तानें निथळत पण आनंदानें चीत्कार करीत या गवतांतून हिंडतांना दिसे. आपल्याला पुष्कळदां माहित नसतें; पण भुइमुगाच्या उपटलेल्या वेलांना जसा बारीकसा सुगंध येतो तसा रानांतील गवतांनाही मधुरसा वास येतो. येथल्या या गवताचा वास दाट झाल्यामुळें श्वापदांच्या अंगांतून निघणाऱ्या माजोरी घाणीलासुद्धां कांहींसा गोड कडवटपणा आलेला असे. तो देखावा मनापुढें दिसतां दिसतां एकदम निराळेंच कांहीं मनापुढें येतें. या गवतांच्या मध्यांत, कोणी न लावलेलीं फुलझाडें वृक्षासारखीं वाढलेलीं होतीं; एक एक फुलझाड हजार हजार फुलांच्या झुबक्यांनीं गजबजून गेलेलें होतें: एका एका फुलाला सहस्र पाकळ्या होत्या; आणि प्रत्येक पाकळी लहान मुलाच्या तळहातायेवढी मोठी

होती. तुम्ही या झाडाच्या शेजारून गेलां असतां आणि जर यांतल्या एका पाकळीला तुमच्या अंगांतली पैरण सहज लागली असती तर तिचा सुगंध चार चार दिवस मावळला नसता. प्रत्येक गोष्ट अगदीं ताजी, नवी, सार्द्र आणि तेजाळ असे. तेंच तेंच पुन्हां पुन्हां न झाल्यामुळें, त्या रम्य पण भयानक परिसरांत कोणच्याही वस्तूला शिळेपणा आलेला नव्हता. पाण्याची दलदल सदाच माजलेल्या त्या रानांत येऊन पोंचलेल्या डोंगरांचीं तीं फुगीर नाकाडें, सकाळच्या उन्हाची कोवळी तिरीप खावयास भुजंगांना नेहमींच उपयोगी पडत. खालीं दूर कोठेंसे ते गर्विष्ठ अश्वत्थ वृक्ष आपल्या वैभवाचे फडत्कार करीत ताठ उभे होते. खरोखर यांनीं पहिला सूर्योदयसुद्धां पाहिला असेल, असें त्यांच्याकडे पाहिल्यावर वाटे. ते पुरातन जटाधारी वड आपल्याच पोटीं कितीदां आले होते आणि कितीदां मेले होते कुणास ठाऊक ! पण त्यांच्या जीर्ण ढोलींतून आरपार निघून जाणारीं सावजें त्यांच्या सावलीखालीं रवंथ करीत बसलेलीं असत. रात्रीचा अंधार पसरूं लागला म्हणजे प्रथम पशुपक्ष्यांच्या फडफडाटांनीं आणि आक्रोशांनीं अवघें रान दुमदुमून जाई; आणि मग स्तिमित होऊन तें आपल्याच ठिकाणीं घाबरल्यासारखें स्तब्ध बने. एकाद्या वेलीच्या अंगाचाच काय उजेड पडेल तेवढा; बाकी जिकडे तिकडे गडद काळोख पसरून विश्व आपल्या पुरातन अवस्थेंत विलीन होणार कीं काय असें वाटे.

सगळ्या गोष्टींना अंत आहे. मरणालासुद्धां अंत आहे. म्हणून तर आपण जन्माला येतों. माणूस स्वतःलाच भूत म्हणून भितें. सगळ्या रानांत आणि सगळ्या विश्वांत पसरलेला अंधार आपल्यालाच भितो. हळू हळू तो अंधार क्षीण होई आणि एका बाजूचें आभाळ उजळ होई: मग तें तजेलदार बने व शेवटीं तांबूस-

लाल दिसावयास लागे. आकाशाच्या या बाजूला 'पूर्व' म्हणावयाची चाल लांब पुढें केव्हां तरी पडली. पण तेव्हांच्या त्या पुरातन काळांत कोण कुणाला नांव ठेवणार आणि वाचेनें वर्णोचार तरी कोण करणार? ती अधिकाधिकच प्रज्वलित होई; पांखरें कुलकुलूं लागत व पक्षी दूरवर झेपावूं लागत; मगरमस्त स्थूल श्वापदें इकडेतिकडे दुडदुडूं लागत; डोंगरांचे दूरचे पांढरे शुभ्र शेंडके झळकूं लागत; अश्वत्थांचीं मस्तकें हिरण्यकेशी बनत; आणि सूर्याचें किरणमय बिंब उसळून वर येई. संथपणानें वाहणाऱ्या पाण्याच्या पृष्ठाला घासून त्याचीं किरणें पसरूं लागत आणि आधींचें तें भीतिग्रस्त आणि कष्टी विश्व आनंदानें निर्भर होऊन जाई. पण यांत कांहींच नाहीं; खरी मौज निराळीच असे.

या सर्व वस्तुजाताकडे केव्हां विभिस्तपणानें आणि केव्हां लोभानें पहाणारे कांहीं प्राणी याच प्रदेशांत वावरत होते. हे दोन पायांवर चालत पण यांना पंख नव्हते; ते पशूसारखेच वागत पण चार पायांवर चालत नसत; त्यांच्या अंगावर केस होते पण ती लोकर नव्हती; त्यांना नखें होतीं पण नख्या मात्र नव्हत्या; त्यांना दांत होते पण लांब लांब सुळे मात्र नव्हते; ते तोंडानें वानरांसारखा कचकचाट करीत पण झाडांच्या फांद्यांवर उड्या मारीत नसत. त्यांच्या डोक्यावर आणि जबड्यावर केसांचा जंजाळ उगवलेला असे; आणि ते रागावले म्हणजेही एकमेकांचे केस ओढीत आणि लोभावले म्हणजेही एकमेकांना केस धरून जवळ ओढीत. सहज सांपडलेलें एकादें विस्तीर्ण काटेरें हातानें उगारून, भुईवर बसलेल्या पक्ष्यांच्या थव्यावर ते आपटीत, आणि त्यांत सांपडलेल्या होलगडांचीं पंखें उपटून टाकून ते हे होलगड दांताखालीं करकरवून खात. एकदां एक मोठा वणवा लागला, तेव्हां झाडांच्या झाडें पेटलीं, आणि

त्यांवर वस्ती करून राहिलेले पारवे होरपळून जाऊन, अर्धभाजले होऊन, जमिनीवर पडले. ते उचलून खातांना तर त्यांना पराकाष्टेचा आनंद वाटला! दातानें निम्मा तोडलेला पारवा त्यांच्यांतील एका नरानें आपल्या मादीपुढें धरला आणि आपलें मुस्कें वर करून, आभाळा-कडे पाहून, नाकानें मोठा फुत्कार करून, तो सबंध दाढवण मोकळें करून हंसला ! हे एकाद्या सावजाच्या मागें कोस कोस धावत आणि एकाद्या वेळीं एकाद्या घळींत पाय फासटून मरून पडत. यांच्या अंगाला आणि घामानें चोपडलेल्या त्यांच्या केसांना नेहमीं घाण येत असे. ठिकठिकाणीं पाण्याचे प्रवाह आणि डोह वाटेल तितके होते आणि गारव्यासाठीं त्यांत शिरलेल्या रानम्हशी स्वच्छ होऊन बाहेर पडतांना त्यांनीं अनेकदां पाहिल्या होत्या; पण आपल्या अंगावरची घाण घालविण्यासाठीं ते कधीं पाण्यांत शिरले नाहींत. त्यांच्यांतल्या कांहींनीं कमरेभोंवतीं मुंज–गवत गुंडाळलेलें असून त्याला झाडपाला लोंबत लावलेला असे. इतर कांहींजण हा झाडपाला ओढून काढा-वयास पहात आणि तोंडें वासून हसत असत. गुलामांचे नाक डोळे मात्र, लक्षपूर्वक पाहिलें तर, रेखीव दिसत ! पण त्यांना नाक पुसावयाचेंसुद्धां कळत नव्हतें. त्यांच्या दातांला इतकी लख्ख जिल्हई कशी राही याचें नवल वाटतें. असलीं हीं चमत्कारिक ध्यानें केव्हां आकाशाकडे पहात, केव्हां डोंगराच्या शिखराकडे पहात, रात्रीं टक लावून चंद्राकडे पहात, आणि सकाळ झाली म्हणजे उन्हाला पाठ देऊन बसत. पाऊस आला म्हणजे डोंगराच्या भोकशांत जाऊन बसत आणि थंडीच्या वेळीं झाडांच्या बुंध्यांत अंग चोरून लपत. असा प्रकार किती वर्षें चालला होता याचें मला तरी स्मरण कोठून असणार !

एकदां एक मोठा चमत्कार घडला. वास्तविक पहातां भोवतालचीं सगळीं झाडें पालवीनें गजबजून गेलेलीं होतीं. कोणाचीं अंगें बुंध्यापासून पालवीनें लपेटलेलीं होतीं तर कोणाचे शेंडे मात्र मोठमोठ्या घोसांनीं भरलेले होते. लांब लांब पसरलेले कोणाचे हात पालवीच्या अस्तनीसकट वाऱ्याबरोबर मागेंपुढें होत आणि कोणी आपल्या खांद्यावरून घेतलेले वेलींचे हिरवेगार पदर वाऱ्यांत फडफडतांना आनंद मानीत. सगळ्या अरण्याला माज आल्यासारखा झाला होता. त्याचें तें पालवीचें वैभव उतून मातून चाललें होतें. आणि तें सारें अरण्य आपल्या सुखांत स्थिर झाल्यासारखें दिसत होतें. पण मीं आतांच म्हटलें आहे कीं प्रत्येक गोष्टीला अंत आहे. थोड्याच दिवसांत कांहीं चमत्कारिक वारे वाहूं लागले. त्यांचा तो सोसाटा या पालवीला आवरेना. त्याच्या दडपणानें ती झाडांच्या अंगाला बिलगूं लागली. तिच्या अंगाचा तडतडाट होई; तिला जीव नकोसा झाला. ज्या झाडाच्या अंगाला बिलगावयाचें त्याची त्वचासुद्धां खरखरीत होऊं लागली. वारा गार असावा पण तो अंगाला झोंबावा असें होऊं लागलें. हळू हळू या तजेलदार आणि सार्द्र पालवीला अवकळा आली आणि ती शुष्क बनूं लागली. तिच्या अंगांतल्या शिरा मोकळ्या झाल्या; पानांना बांक येऊं लागला; ती म्हणूं लागली कीं अंगाला वांब कां येताहेत कळत नाहीं. तिला फिकटपणा आला; तिचा वर्ण पिवळा झाला खरा पण तो रोगट पिवळेपणा होता. या पालवीच्या झुबक्यांत येथें एकादें चिमणाचिमणीचें जोडपें रहात असे; तर तेथें पारवे घुमत रहात असत. पालवीचे मोठाले डेरे पाहून त्यांत कोकिळा आपलें मनोगत अवेळींसुद्धां व्यक्त करीत. आपल्या भोंवतालच्या पालवीची कांति ढळत चालली आहे हें दिसूं लागतांच सृष्टीचीं हीं मंजुळ

खेळणीं एकमेकांत कुजबुजूं लागलीं. मादी आपली जागा सोडीनाशी झाली आणि नर लांबलांबच्या खेपा करूं लागले. हळूहळू झाडांचीं अंगें उघडीं पडूं लागलीं; त्यांच्या अंगावरील वैभव करपून जाऊन त्यांच्या पायापाशीं सावडूं लागलें. पक्ष्यांचे थवेच्या थवे कलकलाट करून उडून जाऊं लागले. झाडांच्या पायांपाशीं सांठलेल्या त्या पालवीच्या शुष्क शवांत शिरून वारा त्यांची दुर्रेवडी उडवूं लागला. झाडांचे खराटे झाले. त्यांच्या एकाकी वाळक्या शेंडक्यावर बसून संध्याकाळच्या वेळीं ' कावकाव ' करून कावळा आपला हृद्रोग व्यक्त करूं लागला. झाडावरचे भुजंग खालच्या वाळक्या पानांच्या थरांत सरासर शिरून सर्प नांव पावूं लागले; जिकडे तिकडे दैन्य, दारिद्र्य आणि सुतक पसरलें; तें शोभिवंत अरण्य बोडकें झालें. तोंडें वासून इकडे तिकडे करणारीं, तीं मघाशीं सांगितलेलीं आपलीं चमत्कारिक ध्यानें भ्रांत होऊन एकमेकांत केकाटूं लागलीं; हें काय घडत आहे हें त्यांच्या ध्यानांत येईना.

त्यांना माणसें हें नांव भीतभीतच दिलें पाहिजे. हीं सारीं माणसें भयानें भांबावून गेलीं. असें आधीं केव्हां झाल्याचें त्यांना आठवत नव्हतें. आठवलें तर तें नेहमीं पडणाऱ्या स्वप्नाप्रमाणें एक स्वप्न होतें असें त्यांना वाटलें. तीं माणसें घाबरीं झालीं. ज्यांच्या सावलीखालीं आपण बसत होतों, निजत होतों ते सारे वृक्ष एकाएकीं झुरणीला लागलेले पाहून या माणसांना अचंबा वाटूं लागला. एकानें या झाडाकडे बोट दाखवावें आणि ' ऍ ऍ ' असा कांहीं उद्गार काढावा तों दुसऱ्यानें त्या झाडाकडे हात करून, ' आय् आय् ' असा कांहीं उद्गार काढावा असा प्रकार सुरू झाला. त्यांच्या बसावयाच्या ढोलींत भुजंग जाऊन बसले. तीं माणसें भयचकित होऊन सैरावैरा धावूं लागलीं. पण जिकडे जावें तिकडे त्यांना

भयाणच दिसूं लागलें. इतक्यांत ठिकाठिकाणच्या डोंगरसपाटीवर आणि डोंगराच्या उतरणींवर मोठमोठे धुराचे कल्लोळ उठले आणि रानेंच्या रानें वणव्यानें तडतडूं लागलीं. वाऱ्यांचा सोसाटा चालूच होता. उघडे बोडके झालेले वृक्ष हलूं लागले आणि फांद्यावर फांद्या घासून त्यांतून निघालेल्या आगीनें कित्येक जण धडधडूं लागले. आतां मात्र काय करावें हें या दोन पायांवर चालणाऱ्या प्राण्यांच्या ध्यानीं येईना. तीं दूरच्या उघड्या डोंगराकडे पळालीं, आणि सुरू झालेल्या विश्वाच्या महाप्रलयाकडे तेथून डोळे लुकलुकून पाहूं लागलीं. जर या लगबगींत त्यांनीं काय खाल्लें असेल तें सांगितलें तर खरेंसुद्धां वाटणार नाहीं. त्यांनीं कोंवळीं कोंवळीं पोरेंसुद्धां चावून खाल्लीं. डोंगराच्या गुहागुहांत हीं माणसें लपून बसलीं. भ्यालेल्या या प्राण्यांचीं काळजें तेवढीं ठकठकत होतीं; बाकी कित्येकांना निचेष्टता आली. लांब दाढ्यामिशा वाढलेला, डोईचे केस छातीच्या केसांत मिसळलेला, आणि अनेक माद्यांना गुहेंत गुदमरवून धरलेला एकादा आडदांड बापई गुहेच्या दाराशीं तालवृक्षासारखा उभा राही किंवा पाषाणासारखा पसरलेला असे. तो मधूनमधून बाहेर पडे; पण निपचित पडत चाललेल्या विश्वाचा धाक वाटून तो परत जाई. त्याची ती सुन्न चर्या पाहून त्या डोंगराच्या गोशांत लोळत पडलेल्या भयधुंद स्त्रिया अधिकच निचेष्ट बनत. बावरलेलीं आणि त्यांच्या मागें पळतां पळतां भुईवर पसरलेलीं पोरें केव्हांच मरून गेलीं होतीं. मानवी जीवन आणि सृष्टीचें जीवन हीं एकदमच खुंटल्यासारखीं झालीं. रात्रीच्या वेळीं तर व त्यांतल्या त्यांत चांदणें पडलें असतांना तर, वस्तुजाताची ज्योत मालवून उरलेला कोळी फारच धडकी उत्पन्न करी. सर्व जगाचे दरवाजे टाळा ठोकून कोणीं तरी बंद केल्यासारखे वाटूं लागलें ! जिकडे तिकडे सामसूम झालें; सोसाट्यानें वहाणाऱ्या

वाऱ्याचा घो घो आवाज, घाबरलेल्या सापांचे विषारी फूत्कार, आणि अशाही वेळीं सावजें हुडकणाऱ्या वाघराची डरकाळी येवढेच काय ते आवाज कानीं येत; आणि आकाशांत तुटणाऱ्या ताऱ्याचें आणि खालीं मोडून पडणाऱ्या फांद्यांचें एवढेंच काय तें चलन दृष्टीला दिसे. एरवीं, विश्व शान्त, वसुधा शान्त !

पंधरा वेळां सूर्य डोंगराआडून वर आला आणि पंधरा वेळां डोंगराआड गरंगळत खालीं गेला. ‘जगत्’ म्हणावयाचें पण तें सर्वथा स्थिर होतें. पण सूर्याच्या खेपा वाया गेल्या नाहींत. तुझें गेलेलं वैभव तुला परत करीन, असें पृथ्वीला बजावीत बजावीत तो नित्य येत जात होता. अशी त्याची ईर्षा दिसत होती. मात्र कांहीं वेळ-पर्यंत खिन्न होऊन, तोही आपल्या मार्गावरून ढळल्यासारखा झाला होता. होतां होतां त्याच झाडांच्या अंगावरून आणि फांद्या-फांद्यांतून निराळे वारे वाहूं लागले. या वाऱ्यांच्या झोतांनीं पृथ्वी-वरील पसरलेला सगळा जीर्ण पसारा नाहींसा झाला आणि त्याच्या झुळुकांनीं झाडांच्या आणि वेलींच्या त्वचेला सुख उत्पन्न होऊं लागलें. कांहीं नवा संदेश या झुळकांबरोबर आला होता काय ? कदाचित् आला असावा. कारण ते जबरदस्त अश्वत्थ वृक्ष आणि ते जटाधारी वटवृक्ष थोडे टवटवीत वाटूं लागले. त्यांचीं अंगें नव्या रसांनीं भरल्यासारखीं झालीं. ते आतां आपल्या रन्ध्रा-रन्ध्रांतून कांहीं संतो-षाचा, आनंदाचा, हर्षाचा उद्गार काढणार असें वाटूं लागलें. त्यांच्या रन्ध्रांतून तांबूस अंकुर फुटूं लागले. अश्वत्थाचा सगळा देह दरदरून गेला. प्रत्येक अंकुरानें अश्वत्थवृक्ष उल्हासाचें अस्फुट हास्य करीत आहेसें दिसूं लागलें. अरण्यांतील सर्वच वृक्षांच्या अंगांत आल्यासारखें झालें. सावधपणानें, जपून, हळूहळू, ती गव्हरांतील अर्बुज प्रजा, डोळे ताठ करून, एकमेकाला धरून, आपापल्या खब-

दाडांतून बाहेर पडूं लागली आणि झाडांच्या कोंवळ्या डिक्शांना हात लावून पाहूं लागली. हात लावून ती एकमेकांकडे वळली आणि त्यांना जर बोलतां येत असतें तर ' हा काय चमत्कार आहे ' म्हणून त्यांनीं एकमेकांस विचारलें असतें. रात्रीं गुहेच्या दारांत जागत बसलेल्या व आतां उंच नाक करून जोराजोरानें घोरत पडलेल्या त्या आडदांड बाप्याकडे हीं माणसें परत गेलीं आणि ढोसढोसून त्यांनीं त्याला जागें केलें. तोडून आणलेल्या ओंजळभर तांबूस डिक्शा त्यांनीं त्याच्यापुढें ठेवल्या. सर्वजण धांवत झाडांच्या गर्दीत प्राप्त झाले. त्यांचीं तोंडें उजळलीं. चार पांच दिवसांत झाडांचे बुंधे, फांद्या, डहाळ्या अर्धवट उमललेल्या तांबूस पानांनीं गजबजून गेल्या. ' ही, ही, ही, ' करून हीं उघडींनागडीं माणसें झाडांच्या भोंवतीं फिरत राहिलीं आणि नाचूं लागलीं. त्यांनीं हातांत हात घातले आणि झाडांवेलींभोंवतीं ' ही ही ही ' करीत तीं नाचूं लागलीं. माणसें नाचावयास शिकलीं. जिकडे पहावें तिकडे लक्षावधी धुमारे; कोवळीं लुसलुशित पानें ! झाडांना नवें वैभव प्राप्त झालें. त्यांची पूर्वीची ऐट परत येणार असें दिसूं लागलें. आतां ती लपलेली प्रजा निःशंकपणानें बाहेर पडली. सूर्याचें उगवणें सुशोभित दिसूं लागलें आणि गुलाबी वस्त्रें पांघरलेल्या त्या झाडांचीं प्रतिबिंबें पाण्याच्या सपाट आरशांत पडून झाडांचीं शोभा द्विगुणित झाली. होतां होतां पानें हिरवींगार झालीं. पानांची पालवी झाली. आणि सर्व वृक्षराज व लताराणी गारीगार झाल्या. त्याच्या भोंवतीं, रोज सकाळीं संध्याकाळीं त्यांची बदलती शोभा पहात, ते रानट घेर धरून नाचूं लागले. भोंवतीं भोंवतीं हिंडतां हिंडतां त्यांतलाच हिरवा पाला त्यांनीं आपल्या कमरेभोवतीं बांधला. तीं माणसें उल्हासानें नाचूं लागलीं. तीं नाचावयास शिकलीं आणि झाडांचें अनुकरण करून त्यांनीं आपल्या कमरे-

भोंवतीं पालवी बांधली आणि तीं मग लाजावयास शिकलीं. झाडांचीं प्रतिबिंबें कवटाळावयास तीं पाण्यांत उतरलीं; आणि त्यांचीं अंगें स्वच्छ झालीं; त्यांचे केस पाण्यानें सडक झाले. सर्व सृष्टि हर्षनिर्भर झाली. माणसानें स्नान केलें, वस्त्र परिधान केलें, आणि बेहोष होऊन नर्तन केलें.

झाडें नव्या पालवीनें गजबजून गेलीं. फुलांचे झुपकेच्या झुपके त्यांच्या अंगावर लोंबूं लागले. सहस्र पाकळ्यांचा घमघमाट सगळ्या रानभर दरवळला. दरम्यान पांच सहा कावळे येऊन गेले होते. त्यांच्या कावकावीनें सुद्धां तीं अर्बुजें शहारित झालीं होतीं. इतक्यांत चारही दिशांनीं पक्ष्यांचे थवेच्या थवे परत आले. गांवाहून परत आल्यावर जसे आपण आपल्या घरांत शिरतों तसे हे पक्षी आपापल्या पूर्वीच्या ठिकाणीं शिरले; आणि हर्षभरित होऊन त्यांनीं आपल्या कलकलाटानें सारें गगन भरून सोडलें. हात उंच करून ‘ हो हो हो ’ करीत तीं माणसें नाचूं–उडूं लागलीं आणि संध्याकाळीं झाडां-भोंवतीं घेर धरला असतां, वरच्या कोकिळेचें कुहूंकुहूं आणि साळुंकीची सुरेल तान ऐकून त्यांनींही कुहूंकुहूं करावयास आणि आवाजानें ताण मारावयास सुरुवात केली. एकमेकांचे हे स्वर ऐकून तीं हंसत आणि कोकिळा व साळुंकी पुन्हां ओरडते का हें पाहावयास थांबत. त्यांचे स्वर पुन्हां ऐकतांच तीं पुन्हां गाऊं लागत ! सृष्टीचें वैभव परत येतांच माणसें गाऊंही लागलीं; त्यांनीं स्नानें केलीं; त्यांचे देह स्वच्छ झाले; त्यांचे केस पाण्यानें सडक होऊन पाठीवर लोंबूं लागले; त्यांच्या कमरेभोंवतीं पाल्याचें आवरण आलें; तीं हातांत हात घालून घेर धरून गाऊंही लागलीं ! नेमकें आठवत नाहीं. पण हें सगळें वसंताच्या आगमनाबरोबर झालें एवढें खरें. चित्रविचित्र पानें-फुलें

अर्पण करणाऱ्या चैत्र महिन्यांत हें झालें. भावी काळांत 'संस्कृति, संस्कृति' शब्दांनीं गौरविलेल्या आमच्या वैभवाचें हें आरंभस्थान होय. त्या वैभवाची ही जन्मभूमि होय; ज्या वसंताच्या आगमनानें हें घडलें तो वसंत धन्य होय. माणसांना माणुसपणा आला आणि मानवी जीविताला शोभा आली. त्यांना नीट बोलतांही येत नव्हतें, मग मोजतां कोठें येणार? आणि काळ मोजावा ही कल्पना तरी कशी आलेली असणार? यानंतर किती सहस्र वर्षांनीं माणसाला 'एक' या शब्दाचा उद्भव व बोध झाला कोणास ठाऊक! हिजरी सन काल सकाळीं झाला; शालिवाहन शक व इतर इसवी इत्यादि सन परवांच्या दिवशीं झाले. विक्रमाचा संवत् तेरवाच्या दिवशीं झाला. यांचे आरंभदिन आपण मानवप्राणी शुभ समजतों. पण या सृष्टीला विचारा, झाडांवरच्या पांखरांना विचारा, रानांतल्या श्वापदांना विचारा, माझ्या त्या प्रियकर अश्वत्थाला विचारा, पाण्यांत पडलेल्या सावल्यांना विचारा कीं खरा खरा शुभ दिवस कोणता? ते सारे उंच घोष करून सांगतील कीं ज्या वसंतांत माणसें शुचिर्भूत झालीं, त्यांनीं वस्त्र परिधान केलें, त्यांनीं केशभूषा रचिली, त्यांनीं नर्तन केलें, त्यांनीं गायन केलें, तो वसंत खरा **पहिला वसंत** होय आणि त्याचा पहिला दिवस म्हणजे आपली खरी वर्षप्रतिपदा होय!

---

# ४. मी आलें म्हणून तूं सुटलास !

१९०९ या वर्षीची गोष्ट असावी. पुन्हां इंटरच्या परीक्षेस बसावयाचें; पण पुण्याला प्लेग फार म्हणून जी. आय. पी. वरील एका जंक्शनच्या गांवीं मी माझ्या भावाकडे रहावयास गेलों होतों. अत्याचाराची धूम सर्वत्र चालू होती; आणि विद्यार्थी म्हटला कीं त्याच्या हालचालींवर पोलिसांची नजर रहावयाची हें ठरून गेलें होतें. त्यांतून तो जर का पुण्याचा असला तर त्याला फार जपून वागावें लागे. प्रत्यक्ष अत्याचार करणारे असे फारच थोडे होते; पण त्यांच्या ओळखीचे म्हणून, त्यांचे नातेवाईक म्हणून, त्या राजकारणाचे चाहते म्हणून, किंवा त्या तऱ्हेचें जें क्रांतिकारक वाङ्मय तें लिहिणारे म्हणून सुद्धां जे कोणी असतील, त्यांच्यांवरही प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष पाळत असे. वास्तविक माझी तशी कोणाची ओळख नव्हती; पण कांहीं थोडें तसलें लिखाण मीं याच्या आधींच केलेलें असल्यामुळें पोलिसांची माझ्यावर थोडीशी नजर होती. मुलांना पुण्यास अभ्यासास ठेवलें म्हणजे आईबापांना मोठी काळजी वाटे. त्यांचें खर्चवेंचाचें भागवावयाचें; व पुढें कांहीं भलतेंच करून हीं खोड्यांत सांपडतील कीं काय व घरादारावर संकट आणतील कीं काय, अशी सारखी धाकधूक लावून घ्यावयाची, असें त्यांना होई. घरांत विद्यार्थ्यांचें बिऱ्हाड ठेवावयाचें म्हणजे पुण्याचे घरवाले सुद्धां काचकूच करीत असत. हे विद्यार्थी वेताळटेकडीकडे जात आहेत कीं काय, पांडव-लेण्याकडे वळत आहेत कीं काय, यावर चौकस लोक दृष्टि ठेवीत असत. पुण्यांतला हा प्रकार सगळीकडे माहित झालेला असल्यामुळें माझ्या भावालाहि माझ्याविषयीं केव्हां केव्हां

शंका येई. माझें लिहिणें जरी त्याला आवडलेलें असलें तरी त्यावरूनच त्याच्या मनांत निरानिराळे तर्क उठत. अर्थात् जपून वागण्याविषयीं तो मला सामोपचारानेंच पण पुन्हां पुन्हां सांगत असे.

आम्ही ज्या घरांत रहात असूं त्याचा मालक वयानें लहान होता; पण तो लहानपणींच बिघडलेला होता. त्याची आई मोठी खबरदार बाई होती. मात्र पावसाळ्यांत तिचें डोकें फिरे व मग ती वाटेल तेव्हां, वाटेल तिकडे हिंडूं लागे. एरवींच्या दिवसांत ती जरी प्रत्यक्ष वेडी नसली तरी अधुनमधून तिला एकाद्या वेळीं वेडाची लहर येई; आणि तिच्या नेहमींच्या बोलण्याचालण्यांतही वेडाचीं पाउलें उमटलेलीं दिसत. नवऱ्यानें थोडी माया ठेविलेली होती, तिच्या बळावर या मायलेंकरांचें बरें चाले. जिजाबाईचा आम्हां भाडेकऱ्यांना कसलाही उपसर्ग नव्हता. उलट आमच्याशीं त्या फारच गोडीनें वागत. जिजाबाईच्या या घराभोंवतीं पुष्कळ जागा होती; व बारकाईनें पाहिल्यावर वाटे कीं जिजाबाईचीं ' माणसें ' फार रसिक असावीं. पण या गृहस्थाच्या पश्चात् मुलगा लहान व बायको अर्धवेडी यामुळें हें सगळें वाडगें हयगयींत सांपडलें व जिकडे तिकडे केरकचरा सांचून या सुंदर जागेला कसलीही रया उरली नाहीं. बरें, बिऱ्हाडकरू तरी नसती दगदग कशाला करतील ? " काय घर ठेवलें आहे पण ! " असें म्हणून ते जिजाईला हिणवीत, व बदली झाली म्हणजे निघून जात. मी भावाकडे आलों तेव्हां या वेडाईकडे पाहून मला थोडी भीतीच वाटे. पण हळुहळूं तिचा स्वभाव मला कळूं लागला. भाऊ नोकरीवर गेला व माझेंही वाचन संपत आलें म्हणजे मग पुष्कळ रिकामपण असे. त्या गांवीं फारशी संगत–सोबत नसल्यामुळें माझें लक्ष त्या गदळ परड्याकडे गेलें. मग ओळीनें पांच–सात दिवस दुपारभर

उन्हांत खपून मी तें वाडगें बरेंच साफ करीत आणलें. विहिरीला पाणी खूप होतें. पाणी शिंपून, झाडून, वाडग्याचीं दोन अंगें मीं अगदीं लखलखीत केलीं. पूर्वी केव्हां तरी तेथें मोगरे लावलेले होते ते तरतरून वर आले व थोड्याच दिवसांत त्यांना बहरही आला. जागेची ही छकपक झालेली पाहून जिजाबाई फार खूष होऊन गेल्या. पण जिकडे तिकडे कळ्याच कळ्या थाटलेल्या पाहून तर त्यांना इतका आनंद झाला कीं त्या ज्याच्यात्याच्यापाशीं माझें कौतुक करूं लागल्या. “ पांखरानें माझं परडं कसं स्वच्छ केलं आहे पहा ! ” असें त्या कौतुकानें म्हणत. ही ‘ वेडांबा ’ मला गमतीनें ‘ पांखरूं ’ म्हणे !

पुण्यांत व इतर ठिकाणीं धरपकड चालू होती. वर्तमानपत्रांवर धाडी येत होत्या; आणि विद्यार्थीवर्गासंबंधींचा सरकारी वहीम बळावत चालला होता. संध्याकाळच्या वेळीं मी पुष्कळदां स्टेशनवर फिरावयास जात असें. प्रथम प्रथम माझ्या ध्यानांत आलें नाहीं; पण पुढें दिसून आलें कीं स्टेशनच्या वाडग्यांत पाऊल टाकल्यापासून तों मी बाहेर पडेपर्यंत कोणीतरी माझ्या आजूबाजूस सारखें घोटाळत असतें. एकदां एका उतारूच्या ट्रंका पोलिसांनीं पकडल्या व उघडून पाहतात तों आंत बॉंब गोळे ! या बातमीनें तर सगळा गांव हादरून गेला. कोणा तरुण माणसाच्या डोक्यांत काय असेल, कोण कोठें घोटाळा उत्पन्न करील याचा नेम नाहीं असें ज्याला त्याला वाटूं लागलें. शेवटीं तें स्टेशनवर फिरावयास जाणें सुद्धां धोक्याचें आहे असें पाहून भावानें मला सांगितलें कीं, “ तूं स्टेशनवर मुळींच जात जाऊं नको. ” कोणा तरुणावर काय संकट येईल याचा खरोखरच नियम राहिला नाहीं. एकदां पुण्याच्या माझ्या स्नेह्याचें पत्र आलें कीं, “ मी जळगांवकडे जात आहें; मला स्टेशनवर भेटावयास यावें. ” जाणें

भागच होतें. भावाला इतकेंसें पसंत नव्हतें तरी गेलों. वास्तविक हा स्नेही पुण्यांतल्या एका खानदानीच्या कुळांतला व त्याचा बाप तर सरकारच्या कृपेंतला; आणि वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालेलें वाङ्मय लिहिलेलें असण्यापलीकडे माझा तर राजकारणाशीं कसलाही संबंध नव्हता. पण आम्ही विद्यार्थी, एवढें गुप्तपोलिसांस पुरें होतें ! वेटिंग रूममध्यें आमची गांठ पडल्याबरोबर तो साखसुरत आमच्या शेजारीं येऊन बसला व गाडी जाईपर्यंत दोन-तीन तास त्यानें आमची पाठ म्हणून सोडली नाहीं. ही हकीगत घरीं कळल्यावर " स्टेशनवर तूं जाऊंच नको " हा आपण केलेला उपदेश कसा बरोबर आहे हें भावानें मला पुनः एकदां प्रपादलें.

अंगण स्वच्छ झाल्याबरोबर आणि तेथें फुलांचा सुवास सुटूं लागल्यावर दिवसां कामधंदा करून थकली-भागलेली मंडळी तेथें बसायला टाकून उघड्यावर गप्पा मारीत बसूं लागली. पाणी वाऱ्यावर ठेवावें; त्यांत मोगऱ्याचीं फुलें टाकावीं, पुण्यामुंबईच्या स्टेशनवरच्या गप्पा किंवा प्रसंगाविशेषीं थापा माराव्या, एकीकडे पाणी ढोसावें असें चालूं झालें. एका बिऱ्हाडकरूचे वडील लवकर उठून स्नानसंध्या करून देवपूजेला बसत बसत. त्यांना फुलें लागत ! देवाला फुलें तर हवींत ! सूर्योदयाच्या आंत, फार कांहीं नाहीं, पण परडीभर फुलें तोडून ते देवाला वाहूं लागले. सकाळीं उठून पहावें तों इतक्या मोगऱ्यांवर कोठें तुरळक एखादें फूल सांपडावयाचें. जिजाबाई कुरकुरून म्हणे, " फुलं कोण रांडलेक नेतो कुणास कळे ! " होतां होतां कोणी ' कुलीनच ' नेतो हें तिला कळलें ! रोज दुपारीं चारच्या सुमारास मी विहिरीचें पाणी ओढूं लागे व संध्याकाळपर्यंत वेलांचीं आळीं भरून अंगणाची जागाही अगदीं गारेगार करून टाकीं. अर्थात् त्यावेळीं ऊन असल्यामुळें या वरील देवभक्त गृहस्थाला बाहेर

पडवत नसे ! तथापि त्याच्या देवाला फुलें लागत हें खरेंच आहे ! जिजाबाईची कुरकूर आतां जरा ठळक होऊं लागली. दरम्यान, कुसवाच्या पलीकडच्या घरच्या जानकीकाकू दोन-तीनदां आल्या; अन् फुलें न्याहाळून गेल्या. त्यांचा लक्ष पुरा व्हावयास दहा हजारच काय ते राहिले होते. मग त्याहि पहांटे येऊं लागल्या. रोज दुपारीं चार वाजतां मी पाणी ओढून घालीत होतों. जानकी-काकूंच्या घरचीं जेवणींखाणीं उशीरां होत. उष्टींखरकटीं आटोपून चाराच्या सुमारास त्या थोड्या वांकड्या होताहेत तों मुलें शाळेंतून परत येत. त्यामुळें त्यांना बाहेर पडायला वेळच होत नसे ! पण त्यांना लक्ष पुरा करणें भागच होतें !

पाणी मिळत राहिल्यानें व हंगामहि जोरांत असल्यामुळें मोगरे रोज संध्याकाळीं अगदीं थरारून फुलत असत. मंडळीची रात्रींची बैठक मोठी गमतीची होई. जिजाबाई या मालकीणबाई व वर अर्धवेड्या; त्यामुळें त्यांना सगळीकडे मुक्तद्वार असे. पुरुषमंडळींत बसून त्या मोठमोठ्यानें गर्जून बोलत. पण फुलांचा विषय निघाला म्हणजे त्या देवपूजकाचा मुलगा येथें नाहीं ना हें पाहून, हातवारे करून आणि गाहिंवरून कुजबुजत, " हा बापडा पाणी घाल घाल घालतो, अन् हे अण्णा अन् ह्या जानकीकाकू आपल्या फुलं तोडताहेत. आतां या रांडेच्यांना करावं तरी काय ? " दरम्यान माझें स्वच्छतेचें काम चालूच होतें.

राजकीय घडामोडी अधिक भयप्रद होत होत्या. धरपकड, झडत्या, जबान्या, कबुलीजबाब इत्यादींचा धुमाकूळ सुरू होता. पण हें इतर गांवांत होतें तोंवर ठीक होतें. माझ्या भावाकडे जमणारे त्याचे ते रेल्वेंतील लोक रात्रीं एकत्र जमले म्हणजे एकमेकांत

म्हणत, " अहो, आपल्याला भिऊन काय करायचं आहे ? आपल्या गांवांत काय होणार आहे ? कोण बॉंब करतोय् अन् कोण झडती घेतोय् ! "

" हां कसें बोललांत ! अहो जो तो सकाळीं उठला कीं मुंबईला पळतोय् अन् रात्रीं अर्धमेला होऊन परत येतोय् ! कोण बॉंब करतोय् अन् कोण झडती घेतोय् ! " ते सगळे जण असें एक-मेकांचें समाधान करीत असत. बोलतां बोलतां एकजण माझ्या भावाला म्हणाला,

" बाबा, तुम्ही तुमच्या बापूरावाला येथें बोलावून घेतलंत हें बरं झालं, त्या पुण्यांत अस्सं झालंय् कीं नको ! इथं कांहीं भानगड नाहीं; आपलें सकाळीं उठावें, वाचत बसावें, जेवणखाण करून पुन्हां अभ्यास करावा—"

जिजाबाई मध्येंच म्हणाल्या, " आपलं झाडांना पाणी घालावं अन् अण्णांच्या अन् जानकीकाकूंच्या डोंबलावर फुलं घालावीं." वेडीच्या या समर्पक शब्दांबरोबर सर्वजण खो खो हंसूं लागले.

" आपलं संध्याकाळीं नदीकडे फिरायला जावं. तुम्हीं त्यांना आणलंत तें बरं केलंत. "

तिकडे पलीकडच्या बिऱ्हाडांतले अण्णा अंथरुणांत पडल्या पडल्या खोकून बायकोला म्हणाले– " हें पहा, जानकीकाकू यायच्या आंत मला उठव हं. "

" त्यामुळें तुम्हांला कांहीं काळजी राहिली नाहीं; नाहींतर थोडी धाकधूकच कीं नाहीं ? "

दुसरे दिवशीं सकाळीं मंडळी जागी होताहेत तों गांवांत जिकडेतिकडे माणसें दणकलेलीं—पलीकडच्या आळींत झडती सुरू होती. पोलिसांनीं तियून अनेक तऱ्हेचे कागदपत्र, पुस्तकें जप्त करून

नेलीं. हें ऐकतांच जो तो संशयाचे घुटके गिळूं लागला. लांब आहे, लांब आहे म्हणतां म्हणतां जवळ येऊन ठेपलें. मी गांवांतून उगाच कोठें कांहीं आणावयासाठीं म्हणून हिंडलों तरी लोक चवकसपणानें माझ्याकडे पहात. खेडेगांवांत शहरचा विद्यार्थी टळकन् दिसतो. त्या दिवशीं रात्रीं बाबा मला म्हणाला, " बापू, तुझ्यापाशीं कोणाचीं पत्रें वगैरे कांहीं नाहीं ना ? आज परशरामपंतांच्या घरांतनं पोलिसांनीं बरींच पत्रं जप्त करून नेलीं. "

मी म्हणालों, " आहेत. "

" कुणाचीं ? "

" अच्युतराव कोल्हटकरांचीं. "

" अच्युतरावांचीं ? " बाबा खोल आवाजानें पण ठांसून म्हणाला.

" हो, पण त्यांत कांहीं नाहीं. "

" काढ काढ पाहूं ."

मी ट्रंकेंतून एक मोठें पाकीट काढलें व आंतील पत्रें त्याला दाखविलीं. नागपुरास असतांना शिक्षा होण्यापूर्वी त्यांनीं तीं मला धाडलेलीं होतीं. बाबा अगदीं गडबडला होता. " हें बघ, हीं आपल्यापाशीं नकोत.—अच्युतरावांना शिक्षा झालेली आहे. "

" तीं आपण पुरून ठेवूं आणि दिवस बरे आले म्हणजे काढूं. तीं पत्रें अगदीं साधीं आहेत."

" तें कांहीं नको. पोलीस कशांतून काय काढतील याचा नेम नाहीं." बाबाचें हें म्हणणेंही बरोबर होतें. म्हणून सगळी निजानीज झाल्यावर आम्ही तीं पत्रें जाळून टाकलीं.

स्वच्छतेचें काम आणि फुलझाडांची निगा हें प्रकरण चालूंच होतें. आपल्या घराला असें लखलखीत रूप आलेलें पाहून जिजा-

बाईला अतिशय आनंद होई. त्या वेडीचें माझ्यासंबंधींचें ममत्व वाटूं लागलें. बिऱ्हाडकराच्या मुलानें इतकें काम करावें आणि आपल्या मुलानें मात्र इकडेतिकडे भटकावें याचें तिला वाईट वाटे. शेवटीं मी पाणी ओढूं लागलों म्हणजे जिजाबाई मदतीस येऊं लागल्या. त्यांचें डोकें हटकून ठिकाणावर असेच असें नाहीं. घागर पाण्यांत सोडून त्या घटका घटका रहाटापाशीं उभ्या रहात; नाहीं तर घागर तेथेंच सोडून आळींतून खुशाल एकादा गुंगारा मारून येत. आळींतल्या पोरांना त्यांचें वेड माहीत असल्यामुळें तीं त्यांच्यामागें ओरडत लागत व त्यांच्या हातून वेडाच्या भरांत कांहीं आगळिक झाली तर कोणी वयस्कर लोकहि जिजाबाईला प्रत्यक्ष मारीत असत. पण रडत ओरडत घरीं आल्यावर 'पांखराचें' काम पाहून मात्र त्यांचें भान परत येई व माझ्याशीं त्या फार ममताळूपणानें वागत. एकदां त्यांना काय लहर आली कोणास ठाऊक. त्यांनीं आमच्या घरांत येऊन सांगितलें, "आज पांखराला आमच्याकडे जेवायला पाठवून द्या." त्यांच्या घरीं जेवायच्या म्हणजे त्या एकट्याच ! कारण चिरंजीव केव्हां येतील न येतील हें ठरलेलें नसे. जिजाबाईनीं नुसता भात व निवळशंख बिरड्या केल्या होत्या. त्याला कांहीं चवं ना ढव; पण 'घे, आणखी घे, घे आणखी' असें त्यांचें चाललेंच होतें. त्यांतहि वेडाची छाया दिसत असे ! असल्या लहरी, भान सुटलेल्या वेडीलाहि मी केवळ जिकडे तिकडे स्वच्छता करतों, त्यामुळें अंगणभर संध्याकाळीं पांढरीं स्वच्छ फुलें फुलतात व सुवास दरवळतो या गोष्टीनें शुद्ध येई व माझ्यासंबंधानें आत्मभाव वाटे.

राजकारण तर बिचलत चाललें होतें. इतर अनेक प्रकारांबरोबर आज वर्तमानपत्रांत नवीनच प्रकार वाचला. सातारा जिल्ह्यांत कोठें तरी मोठी चोरी झाली. चोरांचे जबाब झाले. चोर सुशिक्षित

विद्यार्थी होते. त्यांनीं कोर्टांत सांगितलें कीं देशभक्तीचीं कामें करावयास पैसा हवा म्हणून आम्हीं चोरी केली. आतां मात्र राजकारणाचें रूप अगदीं निंद्य बनून गेलें. लुच्चेगिऱ्या कराव्या, शेजाऱ्यांवर, ओळखीच्या माणसांवर झडप घालावी, आणि देशाभिमानाचा आसरा घ्यावा असें झालें. देशभक्ति म्हणजे काय, आणि लुच्चेगिरी म्हणजे काय याचा कांहीं विवेकच राहिला नाहीं. आणि हें तत्त्वज्ञान सांगणारे सगळे विद्यार्थी—! आतांपर्यंत संकटांत सांपडलेल्या विद्यार्थ्यांसंबंधीं गूढ सहानुभूति असे. तिच्याऐवजीं आतां लोकांच्या मनांत तिरस्कार उत्पन्न झाला. आणि विद्यार्थी विद्यार्थी म्हणून सोंग करून भामटे तर ओंवतींभोंवतीं रहात नसतील ना अशी शंका लोकांना येऊं लागली. लोकांचें तरी यांत काय चुकलें ? सगळे विद्यार्थी लफंगे नसतात हें त्यांना माहीत होतें. पण कोण कसा आहे हें ओळखावयाचें कसें ? म्हणून ते सर्वांविषयींच संशय घेऊं लागले मला मोठें कठिणच होऊन बसलें.

या बातमीनें आमच्या गावांत व मंडळींत भारीच अस्वास्थ्य निर्माण झालें आणि विद्यार्थ्यांकडे पहाण्याची लोकांची दृष्टि बदलली. त्याच्या तिसरे दिवशीं पहांटे, आमच्या वाड्यांतील सगळे बिऱ्हाडकरू पांच वाजतां ताडकन् उठले आणि मालकाच्या—जिजाईच्या मुख्य जागेकडे धांवले. आमचें बिऱ्हाड मुख्य इमारतींत बाजूच्या सोंप्यांत होतें. “ अरे भय्या, चोरी झाली रे ! ” असें जिजाबाई घाबरलेल्या आवाजानें पण मोठ्यानें ओरडल्या. हे शब्द कानीं पडतांच जागीं असलेलीं व साखरझोंपेंत असलेलीं सर्व माणसें एकदम उठलीं व तिकडे धांवलीं. केव्हां ? केव्हां ? कुठून आले ? कसे आले ? कुणीकडून गेले ? काय नेलें ? इत्यादि प्रश्नांचा धडाका सुरू झाला.

मी विचारलें, " जिजाबाई, केव्हां झाली चोरी ? "

" अरे प्रहरभर झाला चांगला. "

" अन् तुम्हीं ओरडलां नाहीं ? "

" अरे मला शब्दच उमटेना. अरे ते भांडीं खालीं ठेवीत होते, वर ठेवीत होते तें सगळें मला कळत होतें. "

" अन् मग—? "

" अरे पण माझ्याच्यानें बोलवेचना. मी अगदीं भिऊन गेलें, ती आत्तां उठलें. "

भोळ्या गरीब बाईची सगळ्यांना दया आली. इकडे तिकडे पहातां उत्तरेच्या कुसवाकडे आम्ही गेलों. तेथून पलीकडे राख टाकण्याची जागा असे. अर्थात् अलीकडेही थोडी राख पडलेली होती. त्या राखेवर माझे पाय उमटले. पहातात तों पलीकडे पडलेल्या राखेवर पावलें उमटलेलीं दिसलीं. चोर इकडून पळाले असें ठरलें. ताबडतोब पोलिसांत वर्दी दिली. शिपाई इत्यादि सर्व लवाजम्यासह जमादार प्राप्त झाले; आणि वाड्यांतील माणसें भयभीत होऊन उभीं राहिलीं.

जमादारसाहेब यांचें जिजाबाईशीं संभाषण सुरू झालें; पण त्याच्या आधीं जमादार एकदां घराच्या भोंवतीं फेरा मारून आले होते. परसांतील सैंपाकघराचें दार उघडें पडलें होतें.

" तुम्ही उठलां होतां तेव्हां दाराला कडी होती ? "

" नव्हती. "

" तुम्ही रात्रीं आंतून कडी लावून घेतली होती का ? "

" होय, घेतली होती. "

" मग चोर तिकडून कसे आंत आले ? "

" तें कळेना म्हणून तर तुम्हाला बोलविलं आहे. "

वेडीचा हा फटकारा जमादारानें निमूटपणें गिळला. जिजाबाईचें वेड सर्वश्रुत होतें. माझ्याकडे पाहून पण जिजाबाईला उद्देशून जमादार म्हणाले, " हे कोण आहेत ?"

" आमच्या बिऱ्हाडकरूचा भाऊ आहे तो."

जमादार मला म्हणाले, " तुम्ही काय करतां ? "

" मी विद्यार्थी आहें. " मी कंपित आवाजानें म्हणालों.

" इथं कसली विद्या शिकतां ? "

" इंटरचा अभ्यास करतों. "

" इंट्रचा आभ्यास इथं ? "

जमादार माझ्या डोक्यापासून पायापर्यंत माझ्याकडे पाहूं लागले. " तुम्ही विद्यार्थी आहां ? अँ ? "

माझ्यापेक्षां जिजाबाई धीट; कारण ती वेडी होती. ती म्हणाली, " अहो जंबादार ! तुम्ही ह्याला बोलूं नका अँ, मी तुम्हांला सांगतीय."

" तुम्ही रात्रीं कोठें होतां ? "

" या बाजूच्या खोलींत होतों मगासपर्यंत."

" तुम्ही विद्यार्थी आहां ? "

" होय."

आतां मात्र जिजाबाई चवताळली.

" मग काय तुम्ही यानं चोरी केली असं म्हणतां ? तो काय देवासारखा माणूस आहे. त्यानं माझं सगळं वाडगं कसं लखलखीत केलं आहे पहा. काय मोगरे फुलतायूत आणि वास सुटतोय्. तुम्हींच बघा, याला कां बोलतां ? "

" अहो, होय हो. "

जमादार ठांसून बोलले. जमादारांनीं माझें नांव टिपून घेतलें व मी पुण्याचा विद्यार्थी ही माहितीहि तरतुदीनें लिहून घेतली. इतरांनाहि प्रश्न विचारले. चोरांनीं कुसवावरून कोटून उड्या टाकल्या हें पाहिलें. उमटलेलीं पावलेंहि पाहिलीं. त्यांनीं माझ्याकडेहि पुन्हां एकदां नखशिखान्त पाहिलें. माझें काळीज लकलकूं लागलें. चवकशी संपली. जमादार, शिपाई इत्यादि मंडळी निघून गेली. वाड्यांत जिकडेतिकडे उद्विग्न झालें. कांहीं वेळानें तें ओसरलें व सर्वांनीं जिजाबाईला शाबासकी दिली. पण सर्व लोक चिंतातुर होऊन गेले हें खरें. एक चोरी झाली म्हणून आणि दुसरें माझ्यावर कांहीं बालंट येईल कीं काय म्हणून. जिजाबाई म्हणाली, " पांखरा, तूं भिऊं नको; मी आहें."

सुमारें तीन वाजण्याच्या सुमारास एक मुसलमान शिपाई दरवाजांतून अंगणांत आला. आम्ही कोणी आंत, कोणी बाहेर असें चोरीचेंच बोलत बसलों होतों. त्याला पहातांच सर्वांना धस्स झालें.

" इधर जिजाबाई कौन हय् ? "

जिजाबाई धट्टपणानें पुढें झाल्या व म्हणाल्या,

" कां ! मी आहें."

" पूनेका विद्यार्थी कौन हय् ? "

" मी आहें."

मी पुढें होऊन खोल आवाजानें म्हटलें,

" चलो, तुमको इन्स्पेक्टरसाबने जलदी बुलाया हय्. मेरीहि साथ चलो, जलदी करो."

आतां मात्र पोटांत धडकी भरली व याचें कसें होईल म्हणून सर्वांना वाईट वाटलें. कबुलीजबाब कसा काढतात याच्या गोष्टी सर्वांना माहीत झाल्या होत्या. अर्थात् पोलिस आतां याला छळतील

कीं काय असें सर्वांना वाटलें. संकट प्रत्यक्ष येऊन ठेपल्यावर मला धैर्य आलें. मी कोट टोपी घालून निघालों. जिजाबाई म्हणाली, " थांब, तुझ्याबरोबर मी येतें. परत आल्यावर मोगऱ्यांना पाणी घालूं " मी त्यांना आग्रह करकरून परतविलें व निघालों. धैर्य आलें तरी विवंचना होतीच. मिशा पिंजारीत आणि बूट करकर वाजवीत तो शिपाई माझ्या शेजारीं चालला होता. काय जबाब द्यावा, उत्तरें कशीं द्यावीं, खरें तेंच सांगावें, असें चिंतन करीत मी जातां जातां, एका इमारतीच्या जिन्यापाशीं मला थांबवून शिपाई वर गेला व दोन तीन मिनिटांनीं त्यानें वरूनच मला वर ये म्हणून खुणाविलें. चोर नसूनहि, पाय न वाजवितां, मी चोरट्यासारखा वर गेलों. पहातों तों हॉलच्या त्या भिंतीपाशीं एक मोठा मध्यवयीन रुबाबदार गृहस्थ बसलेला दिसला. त्याच्या उजव्या डाव्या बाजूंस डोक्याचे फेटे मागें सारलेले, मोठमोठ्या अक्राळविक्राळ मिशा धारण करणारे आणि रोखून पहाणारे असे पांचसहा आसामी उभे होते व टेबलापुढें मांडलेल्या खुर्च्यांवरहि कोणी पाठमोरे बसले होते. त्यांतच तो सकाळचा जमादार होता. मी बिचकत थोडा पुढें गेलों व सलाम करून उभा राहिलों. इन्स्पेक्टरसाहेबांनीं माझ्याकडे नुसतें पाहिलें व ते त्या लोकांशीं तसेच कांहीं वेळ बोलत राहिले. बोलणें संपतांच ते खुर्चीवरील गृहस्थ उठून गेले. जिन्यावरून उतरतांना मात्र त्यांनीं माझ्याकडे पुन्हां पुन्हां पाहिलें. ते होते तेंच बरें असें मला वाटूं लागलें. इतक्यांत ते जे क्रूर दिसणारे शिपाई त्यांनाहि इन्स्पेक्टरनीं खूण केली व तेही जाऊं लागले. आतां मात्र माझा धीर सुटूं लागला. विचारपूस करतांना पोलिस लोक धाकदपटशा दाखवितात व मग ‘ समज ’ देतात हें मीं ऐकलें होतें. त्याचीच ही प्रस्तावना

असावी असें चक्र दिसूं लागलें. ते शिपाई एकामागून एक खालीं गेले. शुद्ध मराठींत इन्स्पेक्टरनीं म्हटलें, " या."

मोठे पोलिस प्रथम प्रथम असाच शिष्टाचार दाखवितात हेंहि मी ऐकलेंच होतें.

" बसा खुर्चीवर आपण." हाहि अर्थात् त्यांतलाच प्रकार असणार !

" आपण अजून शिकतां आहां ? "

" होय. "

इन्स्पेक्टरसाहेब मुद्याकडे येऊं लागले असें मला वाटलें. " आपल्याला कांहीं इतर कामाला वेळ उरत असेल ? "

" होय."

इतर काम म्हणजे काय हें ध्यानांत आलें ! इन्स्पेक्टर फार हळूहळू मुद्याकडे येत आहेत हें मी ओळखलें.

" येथें कोणाची ओळख आहे काय ?"

" होय–अमुक अमुक डॉक्टरांची आहे. "

हा गृहस्थ काय जामीन–जातमुचलका मागणार कीं काय कोणास ठाऊक !

" संध्याकाळीं फिरावयास दूर कोठें जातां का? "

" हो या नदीपर्यंत जातों. "

तिकडं कांहीं सुगावा आहे कीं काय कोणास ठाऊक ! इतक्यांत रस्त्यावरून ' जंबादार, अहो जंबादार ' अशी हांक आली. सडकेवरचा अडली धिक्कारानें म्हणाला, " जा तिकडे ! अहो, ती वेडी आहे. "

इतक्यांत मला बोलवावयास आलेला शिपाई वर आला व जवळ जाऊन इन्स्पेक्टरशीं बरेंच बोलूं लागला. दरम्यान मला एक

नव्ल वाटलें. इन्स्पेक्टरच्या पलीकडे एका सुंदरशा खुर्चीवर एक सुमारें अकरा बारा वर्षांचा लाल मोंगली टोपी घातलेला, एका पायांत चांदीचा बारीक वाळा असलेला, अंगांत बारीक मखमलीचा सदरा अडकविलेला एक निमगोरा मुलगा बसलेला होता. मी त्याला मघाशींच पाहिलें होतें. मला समज द्यावयाची असली तर या मुलाला येथें कसें बसूं दिलें असतें असें मला सारखें वाटत होतें. इतक्यांत तो शिपाई गेला व इन्स्पेक्टरसाहेब माझ्याकडे वळले. ते म्हणाले, " हें पहा मिस्टर—" उगाच लांबवीत न बसतां त्यांनीं मला सरळ काय तें विचारावें असें मला झालें होतें. म्हणून मीं म्हटलें, " सकाळच्या चोरीच्या प्रकरणीं—"

इन्स्पेक्टरसाहेब दाढीवरून हात फिरवीत मोठ्यानें हंसले. त्यांचे दांत गाराप्रमाणें पांढरे शुभ्र होते. ते म्हणाले, " छे ! छे ! मीं आपल्याला त्याकरितां बोलाविलें नाहीं."

मी एकदम सावरलों !

"आमचा हा महिबूब शाळेंत जातो. पण याला मराठी, इतिहास, असे कांहीं कांहीं विषय येत नाहींत, तेवढे आपण तयार करून घेतलेत तर बरें होईल. परीक्षा अजून बरीच लांब आहे. शेवट-पर्यंत शिकविलेंत तरी हवेंच आहे."

भयाचें सगळें अस्मान् बदललें !

" हो हो जरूर शिकवितों."

परिहाराच्या गोड वेदना अनुभवीत मी समेटाच्या आवाजानें म्हणालों. माझा चेहरा काळवंडलेला असलाच पाहिजे. पण आतां हुषारी वाटूं लागली व मी प्रफुल्लितपणानें म्हटलें,

" माझ्याकडून मेहनत घेऊन मी शिकवितों."

" आपल्याला मी भरपूर वेतन देईन; आपण चांगलें शिकवा."

" पण मी आपणांकडे अगदीं घाबरून आलों होतों."

" मला तसें वाटलेंच. आमच्या शिपायानें निरोप नीट सांगितला नाहीं. तो नेहमींच्या वळणावर गेला !"

" हें चोरीचें प्रकरण—"

" अहो कोण चोरटे आहेत ते आम्हांला माहीत आहे; ते नेहमींचेच आहेत. तुम्ही स्वस्थ असा. कोण कसा हें आम्हीं सहज ओळखतों!" इतक्यांत जिना वाजूं लागला. ते म्हणाले, " महिबूब रोज येत जाईल."

वरून त्यांनीं खालच्या शिपायास सांगितलें,

" मास्तरसाबच्या घरीं माहिबूबला घेऊन जात जा रोज" मी खालीं आलों. त्या मगाच्याच शिपायानें मला लवून सलाम केला.

जिन्याच्या दाराशीं पहातों तों जिजाई उभी ! मी हंसत होतों. ती म्हणाली, "बघ, **मी आलें म्हणून तुला जंबादारानं सोडलं कीं नाहीं!**" मोठ्या त्वरेनें घरीं गेलों. सर्व मंडळी चिंतातुर होऊन बसली होती. माझा भाऊहि आला होता. पण माझें वर्तमान ऐकून तो पुन्हां बाहेर पडण्याच्या बेतांत होता. आम्ही अंगणांत गेलों तों अगदीं खोंकाळतच गेलों. अर्थात् सगळी मंडळी जमा झाली. त्यांनीं विचारलें, " काय झालं रे?" मी सगळी हकीकत घोळघोळून सांगितली. शिकवणी मिळाल्याची हकीगत येतांच सर्वजण जोरानें हसूं लागले व जिजाई म्हणाली, " अरे पांखरा ! माझी चोरी झाली अन् तुला शिकवणी मिळाली! चल आतां पाणी घालायला; झाडें वाट पहात असतील!"

---

## ५. "सगळीं माणसें जख्ख होऊन मेलीं असतीं तर !"

अगदीं आरंभापासून सर्व माणसें जख्ख होऊन मरण्याची पद्धति पडली असती तर बरें झालें असतें. कोणीही अर्धेमधें मरावयास नको होतें. अगदीं भुईला नाक लागून, झिजून, वाळून, उसरी होऊन, प्रत्येक माणूस मरावयाची चाल पडली असती तर आपल्या ऐहिक जीविताला किती तरी निराळें वळण लागलें असतें ! सध्यां आपल्या संसारांत जे अनेक प्रश्न दत्त म्हणून आपल्यापुढें उभे राहतात आणि ज्या अडचणी आपल्या वाटेंत दुर्दैवासारख्या आडव्या पडलेल्या असतात त्या प्रश्नांचा आणि त्या अडचणींचा मागमूसहि राहिला नसता. एवढी एक करामत माणसांनीं करावयास हवी होती कीं, कोणीहि सांपळा शुष्क होईपर्यंत मरावयाचें नाहीं; आणि जरी कोणी आधींच मेलें तरी तें झिजून झिजून, कणशः कमी कमी होऊन मरावयास हवें होतें. उरलेल्यांना असें दिसावयास हवें होतें कीं, हीं मरत असलेलीं माणसें आपल्या शक्ती गमावत आहेत; त्यांचे जीवनरस प्रत्यहीं आणि दर क्षणाला आटत चालले आहेत; त्यांच्या शरीरावर, व सूक्ष्म रूपानें त्यांच्या मनावरहि या ऱ्हासाच्या बारीकसारीक खुणा, दर दिवशीं आणि हरघडीं दिसत आहेत; हीं आतां आपलीं कोणी नव्हत; हीं माणसें नव्हेत, तर माणसांच्या नुसत्या सांवल्या शिल्लक राहिल्या आहेत. किंचित् वरखालीं होणाऱ्या यांच्या बरगड्या म्हणजे नुसतीं टरफलें आहेत, असें दिसावयास हवें होतें; व मग हीं घड्याळें, श्वासाचा लंबक किंचित् घोटाळून, बंद पडावयास हवीं होतीं. असा क्षीणतेचा सूक्ष्म अनुक्रम उरलेल्यांना

स्पष्ट दिसावयास हवा होता. हें होत राहिलें असतें तर मानवी-जीविताला एक निराळेंच वळण लागलें असतें. सध्यांच्या अनेक दुःखांचा आणि मानसिक जाचांचा उद्भवच झाला नसता. किती दुःखें, किती आक्रोश, किती गैरसोयी, व किती विवंचना वाचल्या असत्या; आणि त्यांचीं वाङ्मयें लिहिण्याचे व तीं वाचण्याचे श्रमही पडले नसते! इतकेंच कीं, माणसें जख्ख होऊन मरावयास हवीं होतीं.

धडधाकट असतांनाच कांहीं माणसांना तात्कालिक मरण आलें यानें सगळें बिघडलें. त्यांच्या सर्व शक्ती जोरकस असतांनाच मरण आलें यामुळें उरलेल्यांच्या मनावर कांहीं चमत्कारिक संस्कार झाला. एका निराळ्याच तत्त्वाचा उदय माणसाच्या मनांत झाला. रानावनांतून हरणांच्या मागें धावतांना, कड्यावरून कोसळून, त्यांना तत्काळ मरण यावयास नको होतें; पण तें आलें मात्र. हे धावणारे चांगले बलिष्ठ आणि रसरसलेले दिसतां दिसतां एकदमच मृत्यु पावले! मधाचीं पोळीं झाडावरून काढण्याच्या आशेनें ते उंच उंच झाडावर चढले आणि मग मधानें बरबटलेल्या फांदीवरून पाय निसरून खालच्या शिळेवर त्यांचा कपाळमोक्ष झाला; आणि ते तेथल्या तेथें गप्प झाले. हेंच व्हावयास नको होतें. त्यांच्या शारीरिक शक्ति आणि मनःशक्ती अगदीं खडखडीत जाग्या होत्या आणि त्या तशा असतांनाच या लोकांना अचानक मरण आलें. यानें मानवी मनांत फार चमत्कारिक चलबिचल झाली आणि त्यांची कल्पनाशक्ति जागृत झाली. त्यांची एक जमात एका दऱ्यांत रहात होती आणि दुसरी पलीकडे आणखी एका दऱ्यांत रहात होती. एका जमातींतील एक बाई इकडे तिकडे भटकत असतांना तिला दुसऱ्या जमातींतील माणसांनीं धरून नेलें. यावरून या दोन लोकांत

अदावत माजली. ते वर्दळीवर आले. हातांतील कळकांच्या सोटांनीं त्यांनीं एकमेकांचीं डोकीं फोडलीं. बाईवरून भांडण होतें; अर्थात् तरुण लोकच जमा झालेले होते. त्यांच्या अंगांतील सर्व शक्ति तल्लख होत्या. त्यांचीं मनें शाबूत होतीं. पण सोट्यांच्या मारानें त्यांच्या कवच्या फुटल्या आणि तेथल्या तेथें निपचित पडून ते मरण पावले. ते क्षणार्धापूर्वी नवजवान मल्ल होते. जीवनरस त्यांच्या शरीरांत उचंबळत आहेत असें दिसत होतें. पण पाहतां पाहतां ते आ वासून पडले. ते आतां जिवंत होते आणि ते आतां चुटकीसरसे निचेष्ट झाले. हेंच व्हावयास नको होतें ! पण तेंच घडलें. यानें इतरांच्या मनांत कांहीं अकल्पित घडामोड सुरू झाली. त्यांची कल्पना जागी झाली आणि ते असें मानावयास धजेनात कीं, हे आपले दणदणीत प्रकृतीचे बांधव मरण पावले आहेत, म्हणजे सर्वथा कायमचे नाहींसे झाले आहेत !

सर्व माणसें जर जख्ख होऊन मेलीं असतीं तर, अनुक्रमानें शरिरांतील शक्तींना नवी वाढ यावयाचीं यंत्रें बंद पडणें हें ओघानेंच झालें असतें. मग त्यांचा तजेला मावळत चालला असता. सर्व शक्तींनीं भरलेलीं माणसांचीं शरीरें, वर सांगितल्याप्रमाणें, अगदीं फळासारखीं वाळून जावयाचीं, झिजावयाचीं, छायामात्र उरावयाचीं व मग एके दिवशीं तीं माणसें मेलीं असें म्हणावयाचें, तर त्यांचा सूक्ष्म ऱ्हास इतरांच्या ध्यानांत हळूं हळूं येत रहाणारच; आणि तसेंच व्हावयास हवें होतें. त्यांच्या तोंडावर बारीक बारीक सुरकुत्या पडल्या असत्या. नाकाच्या बाजूकडून खालीं हनुवटीकडे तिरप्या रोखानें बारीक वळी पडत चालली असती. डोळ्यांचे बाहेरचे कोपरे जास्त निमुळते होऊं लागले असते व त्यांच्या भोंवतालचें कातडें, गांठोड्याच्या गांठीशीं जमा होणाऱ्या कापडाप्रमाणें दिसलें असतें. बघणारे 'लोक म्हणाले असते ' असें होणारच

कारण यांच्या शक्ति कमी होऊं लागल्या आहेत ! ' नाकाचा शेंडा, जर असला तर, खालीं लवला असता आणि कपाळावरच्या आडव्या रेघा ठळक झाल्या असत्या. उजवा नाहीं तर डावा डोळा, उघडा असतांनाही, कोपऱ्याकडे लवल्यासारखा झाला असता, व मिशांत करड्या राकट केसांची वाढ होऊं लागली असती. बघणारे लोक म्हणाले असते कीं, असें होणारच ! कारण यांच्या शक्ती कमी होऊं लागल्या आहेत ! हळू हळू पडत जाणारे हे फरक सर्वांच्या ध्यानांत आले असते, आणि असेंच व्हावयास हवें होतें. पण माणसें अगदीं टणटणीत असतांनाच अचानक मेलीं, त्यानें सगळें बिघडलें. त्यानें इतरांच्या मनांत कांहीं चमत्कारिक विकल्प उत्पन्न झाले. या विकल्पाचें जाळें तयार झालें. तेंच आपलें मोठें बळ आहे असें माणसांना वाटूं लागलें व त्यामुळें आपली वैचारिक उन्नति झाली आहे अशी त्यांची खात्री झाली. पण जर तीं अगदीं जख्ख होऊन मेलीं असतीं तर यांतलें कांहींच घडलें नसतें आणि या विकल्पांच्या व्यापारामुळें त्यांच्या जीविताला सध्यां व्यापून राहिलेलीं दुःखें उद्भवलींच नसतीं. पण माणसें चांगलीं भक्कम असतांनाच अचानक मेलीं त्यानें हें सगळें झालें. वास्तविक त्यांच्या शक्ति अनुक्रमानें क्षीण व्हावयास हव्या होत्या.

हें जर घडत राहिलें असतें तर मग त्यांचे हात केव्हां केव्हां दुखूं लागले असते. त्यांच्या गळ्याची घाटी बोलतांना वरखालीं होऊं लागली असती, आणि हनवटीकडून खालीं गळ्याच्या खळगीकडे येणारें शुष्क कातडें पोळीसारखें लोंबू लागलें असतें. मानेकडून खांद्याकडे जाणारी जत्रू खालीं खचली असती आणि बाहूंचीं खांद्यावरचीं हाडें लहानशा सोंगटीसारखीं वर आलीं असतीं.

छातीच्या बेल्यांतील केंस करडे बनले असते. हे सर्व फरक इतरांच्या ध्यानांत आले असते व ते म्हणाले असते कीं, 'असें होणारच, कारण यांच्या शक्ती हळूं हळूं क्षीण होत चालल्या आहेत ! हे म्हातारे होत आहेत.' असेंच व्हावयास हवें होतें. माणसें अशा पद्धतीनें अगदीं जख्ख होऊन मरावयास हवीं होतीं. म्हणजे आपण सर्वजण एका मोठ्या मनस्तापांतून वांचलों असतों आणि आपली बुद्धि निराळ्या चिंतनाला उपयोगी पडली असती. पण कांहीं माणसें ऐन तारुण्यांत आणि शक्ति पणांत असतांनाच मेलीं. त्यामुळें इतरांच्या मनांत विलक्षण खळबळ झाली. येथें कांहींतरी निराळीच योजना असावी असे तरंग त्यांच्या मनांत उद्भवले. याच तरंगांतून आपल्या जीविताचें कायमचें आक्रमण करून बसणाऱ्या कल्पना निघाल्या. वास्तविक पाहतां त्यांच्या शक्ती हळूं हळूं क्षीण होऊन त्यांना मरण यावयास हवें होतें.

हें झालें असतें तर मग त्यांच्या पिंढऱ्यांना बांक येऊं लागला असता, आणि त्यांचीं मांसल पावलें व बोटें शुष्क होऊं लागलीं असतीं. त्यांच्या पिंढऱ्यावर सहस्र चिरम्या पडल्या असत्या, आणि आपण म्हातारे होत चाललों नाहीं असें दाखविण्यासाठीं ते लटकेंच म्हणाले असते कीं, या चिरम्या थंडीनें पडल्या आहेत. पालथ्या हाताची त्यांची त्वचा सुरकुतूं लागली असती आणि त्यांच्या बोटांची कातडी लोंबूं लागली असती. जागचें उठतांना त्यांनीं कमरेवर हात दिला असता आणि पाठ भरून आलेला सुतार जसा उठल्यावर उराडें पुढें काढून चालतो तसें ते चालूं लागले असते. दांत उठून गेल्या-मुळें नाक अधिकच ओघळलें असतें आणि त्यांचें बोलणें फकारयुक्त बनलें असतें ! त्यांना भलतीच खा खा सुटली असती आणि इकडे तिकडे पाहून त्यांनीं जास्तच तिखटामिठाचे पदार्थ तोंडांत

टाकले असते. त्यांच्या डोळयांत पांढरें अभ्रक जमा होऊं लागलें असतें आणि डोळयांच्या कोपऱ्यांत पिवळा डिंक साठूं लागला असता. त्यांच्या डोक्याला एकहि केंस राहिला नसता आणि ते निजले असतांना तोंडांतून वारा सुटावयास कसलाच प्रतिबंध न राहिल्यानें त्यांच्या ओठांतून विविध प्रकारचे फूत्कार बाहेर पडले असते. लोक म्हणाले असते कीं, 'असेंच व्हायचें—उत्तरोत्तर अशीच अवस्था व्हावयाची. कारण ह्यांच्या शक्ति क्षीण होत आहेत.' हे घडत जाणारे फरक बघणारांच्या ध्यानांत आलेच असत आणि अनुक्रमाची स्वाभाविकता त्यांनीं ओळखिली असती. असेंच शेवटपर्यंत सर्व होत गेलें असतें तर फार बरें झालें असतें. आपल्या मनाला एक भेसूर भीति आणि आपल्या बुद्धीला एक मादक भ्रान्ति वाटूं लागली नसती; पण अनेक माणसें भर जोरांत असतांना एकाएकीं मरण पावलीं. काय करावें ठेंच लागूनच तीं मेलीं किंवा साप चावून त्यांना झेंडू फुटला आणि पाणी न मागतांच तीं मेलीं. यानें आपलीं मनें व बुद्धि हीं गांगरलीं आणि भीति व भ्रान्ति यांनीं आपल्या जीविताचा कब्जा घेतला. खरोखर त्यांचीं शरीराचीं व मनाचीं सामर्थ्यें हळूं हळूं मंद होत जावयास हवीं होतीं व मग धीमे धीमे त्यांना शेवटचा दिवस यावयास हवा होता.

हें झालें असतें तर समाजांत इतकीं म्हातारीं माणसें झाल्यामुळें आपण म्हातारवाडे तयार केले असते; आणि अशी व्यवस्था गांवोगांव करावी लागली असती. या वृद्धांचे नातू पणतू मधून मधून त्यांना भेटावयासाठीं गेले असते. त्यांचीं क्षीण होत चाललेलीं सामर्थ्यें आणि थकत चाललेलीं शरीरें त्यांनीं पाहिलीं असतीं. त्यांना त्या ठिकाणीं काय दिसलें असतें? भयाचें कसलेंही कारण नसतांना त्यांची शरीरयष्टी थरकांप पावत आहे, हें पाहून त्यांना विस्मय वाटला

असता; शोकाचें कसलेंही कारण नसतांना त्यांच्या डोळ्यांतून अश्रूढाळ चाललेली पाहून त्यांना नवल वाटलें असतें; तोंडांत कांहींही नसतांना हे कांहींतरी सारखे चघळत आहेत हें पाहून ते त्यांच्याकडे जास्तच कुतुहलानें पाहूं लागले असते; कोणी कसलीही संमति विचारलेली नसतांना हे मानेनें सारखा नकार कां देत आहेत असें त्यांनीं एक-मेकांस विचारलें असतें; आणि कांहींहि हरवलें नसतांना इतकें वांकून हे भुईवर काय शोधीत आहेत हा प्रश्न त्यांना पडला असता. त्यांनीं हा सर्व प्रकार घरीं सांगितल्यावर वडील माणसें म्हणालीं असतीं, " असेंच व्हावयाचें, त्यांच्या शक्ति कमी कमी होत आहेत. अणू-अणूंनीं ते असेच झिजत जाणार आहेत. आतां आपण त्यांच्याकडे पुनः पुन्हां गेलें पाहिजे." शेवटीं एके दिवशीं या वृद्धांच्या भोंवतीं त्यांच्या नातेवाईकांचा गराडा पडला असता. ते मात्र स्वतः स्वस्थ पडून राहिले असते. श्वास घेण्याशिवाय कोणचीही क्रिया त्यांच्या हातून होत नाहीं असें त्यांना दिसलें असतें. मधून एकाद्या वेळीं श्वासही ऐकूं येत नाहीं असें यांना वाटलें असतें. खरोखर श्वसन चाललें आहे काय हें पहाण्यासाठीं त्यांनीं या वृद्धांच्या नाकासमोर सूत धरलें असतें. शेवटीं शून्याकार झाला असें दिसतांच ते एक-मेकांस म्हणाले असते, " सर्व संपलें."

" सगळें संपलें " एवढेंच काय तें ते म्हणाले असते. त्यांनीं त्या मुमुर्षू माणसांचा सूक्ष्म ऱ्हास दर क्षणाला पाहिलेला होता आणि जर शक्ती कमी होत आहेत तर त्या पुरत्या नाहींशा झाल्या म्हणजे यांचें अस्तित्व संपणार हें त्यांनीं ओळखलें असतें. म्हणजे शक्ती नाहींशा होत जात आहेत तों तों 'संपलें' म्हणजे मरण जवळ जवळ येत आहे हें त्यांनीं ओळखलें असतें. त्यांच्या घरांतील दिव्यांतील तेल संपत आलेलें त्यांनीं पाहिलें होतें आणि जों जों तें

संपावें तों तों दिव्याची ज्योत मंदावत चालली आहे हेंही त्यांनीं पाहिलें होतें. तेल पुरतें संपलें म्हणजे दिवा जातो हें त्यांना अनुभवानें माहीत झालें होतें. दिवा जातो त्यावेळीं दुसरें कांहीं होत नाहीं, तेल संपतें; आणि आतां हे शुष्क वृद्ध मरत आहेत तर दुसरें कांहीं होत नाहीं, तर केवळ तेल म्हणजे जीवनरस घटत आहे एवढेंच ते उमगले असते. शरीरांतून कोणी निघून गेलें असें त्यांस वाटावयाचें कारणच उद्भवलें नसतें. तेल संपलें, शक्ती संपल्या, एवढेंच त्यांना वाटलें असतें. ज्योत गेली एवढेंच त्यांनीं म्हटलें असतें; आत्मा निघून गेला असें त्यांच्या मनांत कधीं आलेंच नसतें. तें येण्याचें कारणच उद्भवलें नसतें. वस्तूंचे कार्यकारण-भाव त्यांच्या प्रत्ययाला आलेले होते आणि जीवनरस अल्पही टिकून होता तोंपर्यंत हीं माणसें जिवंत आहेत असें त्यांना वाटत होतें. असेंच सारखें होत राहिलें असतें व सर्व माणसें जख्ख होऊन मेलीं असतीं तर आत्म्याची कल्पना उद्भवलीच नसती. ती उद्भवण्याचें कारणच नव्हतें ! खरोखर मानवी जीविताच्या आरंभींच जर एवढें घडून आलें असतें तर काय बरें झालें असतें ! पिंजऱ्यांतून आत्मा उडून गेला ही भाषाच उद्भवली नसती.

असें झालें असतें म्हणजे मानवी जीवित निर्भय झालें असतें. देहांतून निघून भावी कालांत शिरणारा जर देहस्थ असा स्वतंत्र कोणी नाहीं ही भावनाच कायम झाली असती तर भ्यावयाचें कशासाठीं आणि कोणाला ? म्हणजे मग आपल्या जीवितांतील कितीतरी वाद उत्पन्नच झाले नसते. कितीतरी दुःखें मनाला शिवलीं नसतीं; कितीतरी आचारविचार, व्रतवैकल्यें, व नित्य-नैमित्यिकें यांची गर्दी जीवितांत झाली नसती. आपलें जीवित जास्त मोकळें, ऐसपैस, वादावादींतून अलिप्त झालें असतें. जर

शरीरांतून कोणी स्वतंत्र वस्तू मुक्त होतच नाहीं, तर ती जन्माच्या वेळीं तेथें निराळी आली होती असेंही कोणास वाटलें नसतें. जीवन-रस घटण्यानें ज्योत मावळली तशी तो जमा झाल्यानें ती आधीं लागली होती एवढेंच काय तें माणसांना वाटलें असतें. म्हणजे मी कोठून आलों हाही जिज्ञासेचा आक्रोश सुरूंच झाला नसता. अशा प्रकारें दोन्ही टोंकाला मोकळेपणा राहिल्यानें मनाचा व बुद्धीचा व्यापार अनिर्बंध-पणें चालला असता; व हे भयप्रद आणि आनंदकारक, अतिप्रचंड आणि अतिसूक्ष्म, तिमिरमय आणि प्रकाशयुक्त, वनस्पतींनीं फुललेलें आणि शिलारसांनीं सळसळत असलेलें, ज्याच्या बाह्य कोशाला मर्यादा नाहीं आणि ज्याच्या जीवितकाळाला सीमा नाहीं, ज्याच्या परिवारांत सहस्र सूर्यमाला केवळ काजव्यासारख्या होत आणि ज्यांतील मानव नांवाच्या प्राण्याचें अणुमात्र मन सागरापेक्षांही सखोल आहे तें हें विश्व कोणी उत्पन्न केलें, तो कोण आहे, त्याचें रूप काय आहे, ' सहस्रकोटि ब्रह्मांडनायक ' म्हणून ज्याला प्राचीनांनीं गौरविलें त्याच्या शुद्ध जिज्ञासापर चिंतनाला आपलीं मनें मोकळीं राहिलीं असतीं व त्या चिंतनांत शुद्ध शास्त्रीयपणा राहिला असता. सध्यां मात्र असें होतें कीं, आपला स्वतःचा भूतकाळ व भविष्यकाळ याच्या विचा-रानें आपलें मन कासावीस होतें व त्या आदिकारणाचें संशोधन करा-वयास तें दुर्बलतेमुळें अपात्र बनतें. जर आत्म्याची कल्पनाच निघाली नसती—जर सगळीं माणसें जख्ख होऊन मेलीं असतीं—तर हें सगळें साधलें असतें !

पण माणसें अकालींच मेलीं, तरणींताठीं असतांनाच मेलीं, एका तडाख्यांत मेलीं, अचानक मेलीं, जीवनरस उंचबळत असतां-नाच मेलीं, झेंडू फुटून मेलीं, ठेंच लागून मेलीं, सर्व शक्ति ' पणांत ' असतांनाच मेलीं; यामुळें तीं मेलीं यावर विश्वास बसेना. आतां

बोलत होता, तरवार परजीत होता, दंड ठोकीत होता, आणि मेला म्हणतां, तर तें खोटें असलें पाहिजे; तो जिवंत असला पाहिजे; ‘ मी मी ’ म्हणणारा कोणी तरी आंत होता तो उडाला असला पाहिजे; तो कोठेंतरी असलाच पाहिजे; अजून शरीरांतील रक्त कढत आहे आणि त्याचें कबंध रणांगणावर नाचत आहे; तो बाहेर कोठें तरी झटकलेला असला पाहिजे, अशी बुद्धि स्वाभाविकपणेंच उद्भवली. हिच्यांतूनच आत्म्याचा जन्म झाला. कोणाकोणाला तर तें शरीर गेलें हेंहि खरें वाटेना. तावडतोब नाश कसा होईल असें त्यांस वाटलें असावें. तो मृत माणूस सदेह शिल्लक असेलच असें त्यांच्या मनानें घेतलें. देह पडला हें दिसतच आहे; पण गूढस्थ कोणीतरी परागंदा होऊन स्वस्थानीं गेला असें ज्यांना वाटलें त्यांनीं आत्म्याचें तत्त्वज्ञान जन्माला घातलें; आणि ज्यांना तो देहसुद्धां शिल्लक असूं शकेल असें वाटलें त्यांनीं भूतयोनि जन्माला घातली. पण या दोहोंचें आरंभ-स्थान एकच आहे.

**या** आत्म्याच्या तत्त्वज्ञानानें व तदुत्पन्न आचारविचारांनीं व या भूतयोनीच्या जाणिवेनें आणि तदुत्पन्न भीति व बलिदानादि विचार यांनीं, आपल्या जीविताचें केवढें तरी आक्रमण केलें आणि तें आक्रमण आज शेंकडों शतकें चालूं आहे !

मला तरी खरें काय माहीत ? पण मनांत येतें तें असें आहे.

---

# ६. सायेबाला काळीजच न्हाई !

फूटपाथला लागूनच हें शिंप्याचें दुकान होतें. शिंपी चांगला कसबी होता. अर्थात् धंदा उत्तम चालत असल्यामुळें त्यानें हाताखालीं अनेक शिंपी ठेविले होते. फूटपाथच्या कांठाला ओळीनें सहा खण हें दुकान दिसत असे. सडकेकडे पाठ करून प्रत्येक खणांत एक एक शिंपी आपापल्या यंत्रावर बसून काम करीत असे. दुकानाला मोठमोठीं तावदानें लाविलीं होतीं; व मधून मधून आंतल्या अंगानें त्यांच्यावर रंगीबेरंगी कापडांचे नमुने लोंबविलेले असत. मुख्य मालकसाहेबांची झकपक विशेषच होती. दुकानांत येणाराजाणारांचा रुबाबही दुकानाच्या तोलाला शोभण्यासारखाच असे. पुढचा फूटपाथ अगदीं लखलखीत ठेवण्याच्या कामीं मालक मोठा दक्ष असे. या स्वच्छतेकडे, टापटिपीकडे, आणि बडेजावीकडे पाहून फूटपाथवरून जाणारे येणारे लोकसुद्धां बेतानेंच जात येत असत. भिकाऱ्यांना तर दुकानाच्या शेजारून जाण्याचीसुद्धां भीति वाटत असे. ते बापडे बिचकून सडकेवरूनच दयेची याचना करीत. या भिकाऱ्यांत मधूनमधून एकादी आंधळ्यांची माळकाहि येत असे.

आंधळ्यांची माळका म्हटली तरी तिच्यांतील आंधळे सगळे सारखेच आंधळे नसतात. कोणी ठार आंधळे, कोणी अर्ध आंधळे, कोणी चांचपडण्याइतपत आंधळे, आणि या सर्वांना काठीला बांधून नेणारे कोणी थोडेसे डोळस—असाच प्रकार बहुधा असतो. एकदां या दुकानावरून असलीच एक माळका चालली होती. मात्र तिच्यांत ज्या दोनतीनच बाया होत्या त्या आंधळ्या म्हटल्या तरी त्यांना थोडें दिसत होतें. आंधळेपणाच्या मुद्द्यावर याचनेचा हक्क

सांगणें त्यांना शोभून दिसे व कामचलाऊ दिसत असल्यामुळें तेवढ्या डोळसपणाचा उपयोगहि त्या करीत. दुकानासमोरून जातांना "आंदळ्याला धरम करा वो बाबा" अशी आरोळी त्यांनीं ठोकली आणि "झाडलोट करी जनी । केर भरी चक्रपानी" हा जनाबाईचा अभंग रेकत रेकत त्या चालूं लागल्या. या टोंकापासून त्या टोंकापर्यंत जातांना दुकानाकडे त्या सारख्या टक लावून पहात होत्या. मधेंच अवधान सुटलें तर त्या पुन्हां वळून दुकानाकडे पहात. होतां होतां दुकानाची लांबण संपली आणि त्या आपल्या मार्गाला लागल्या.

दुसरे दिवशीं त्या बाया पुन्हां आल्या आणि तशाच पहात पहात आणि न्याहाळीत दुकानासमोरून गेल्या. टाळांच्या ठोक्यावर तोंडानें पुढील अभंग चालू होता :—

**"लटकाचि केला; सोंग पसारा दाविला ।**
**दावियेला चाळा बहु दावूनि पुतळा ।"**

असे अभंग म्हणणारे दिवसांतून अनेकदां दुकानावरून जातात. अर्थात् या बायांच्याकडे दुकानांतील शिंप्यांनीं कधीं ढुंकूनहि पाहिलें नाहीं. पण त्या मात्र या टोंकापासून त्या टोंकापर्यंत अगदीं टक लावून, पण पापण्यांची पुन्हां पुन्हां उघडझांप करीत पहात गेल्या हें खरें. तोंडानें अभंगाचा ठोका चाललाच होता—

**"लटिकाची केला; सोंगपसारा दाविला ।**
**लावियेला चाळा बहु दावूनि पुतळा ॥"**

दुकान ओलांडून पुढें गेल्यावर त्या बायांना बोलल्याशिवाय रहावेना. भिक्षा मागावयाची खरी; पण भिक्षेकऱ्यांना सुद्धां मधून-मधून कांहीं निराळें बोलणें हवेंच असतें. त्यांच्यांतली एकजण म्हणाली—"बया दुकान दिसतंया बामनाचं; आन् दाराशीं सायेब उबा केलाया सायेब ! बाबा, आमी का तुझं उचलून नेतुया का

काय करतुया ? दुकानाम्होरं आल्याघरनं त्ये पार आल्याड पोचपातुर त्यो साहेब सारका टक लावून बघतुया ! अरं का र बाबा ? आमी तुजी पायरी चढलूं तर तुजा बोल लागल."

पारीनं उत्तर केलें, " पनू शिपीदादानं भयाबिया ठिवायचा यो सायेब कशापायीं ठिवला असल ग ? "

म्हातारीनं उत्तर केलें, " हां हये तर खरंच; पन शिरीमंताची गोष्ट हाये; बामन तालेवार झाल्याती; त्येनीं सायेबच दारावर ठिवलाया ! "

" याक अक्शार तरी कंदी बोलतुया का ? "

" अग अडान्यें, त्येला आपली बोली कुठली येनार ? अनू जर बोली येईना तर त्यो बोलनार कुठला ग ? "

" पण दिष्टीचा लई खोटा दिसतुया ! बाया मानसाकडं अक्शी सारका टक लावून बघतुया. "

" काय रांड, तूं कां राजाची रानी ! का कोन ? त्यो तुज्याकडं कशापायीं बघल ग ? त्यो समद्याकडच बघतुया. "

" अग म्हाताऱ्ये, त्येचा झोक तरी पघ, त्येच व्हट बग, पान खाल्ल्यावानी लाल चटक ! आनू त्याच्या गालावरचं क्यास बग "

इतकें भाषण होत आहे तों कुणीसा त्यांच्या परळांत पैसा टाकला. तो खणाणतांच " पुंडली गवरदेव हाऽरी इट्टल " ची गर्जना करून त्या पुढें निघून गेल्या.

पुन्हां दुसऱ्या दिवशीं दुकावरून जातांना त्या साहेबाकडे रोखून पाहूं लागल्या. पारी म्हणाली, " म्हाताऱ्ये, त्यो उलिसा हसतुया बी; आनू आपुन जावं तकडं तकडं दिष्टी वळवतुया ! "

" व्हय व्हय, पन त्येला बोलायचा मातुर हुकूम न्हाई ! बगितलंस पाऱ्ये, ह्यो अस्स; उबा पाऱ्याला, सत ना नित ! "

पण पारीच्या मनांत भलतेंच आलें. भिकाऱ्यांना भय कसलें ? कुठेंही आरोळी ठोकायची. पारी जोरानें ओरडली, " सायोब ! आंदळ्याला पैसा द्यावं ऽऽऽ—"

साहेब पहारेकरी किंचित् हंसला; पारीकडे टक लावून पहात राहिला ! तो कांहीं देतो आहे का हें पहाण्यासाठीं त्या आंधळ्या बाया थबकल्या आणि तो नुसताच रोखून पहात आहेसें दिसतांच त्याच्याकडे बघत बघत त्या पुढें गेल्या. पारी म्हणाली, " म्हातारे, या मानसाला काथी दयामाया तरी हाये का ग ? बया लस्करांत साय्बे लयी भेटत्याती तर त्ये कवा ना कवा आना दोन आनं देत्याती; पन ह्यो बाबा लई वंगाळ; डोळ वासून निसता पगतुया."

" पाऱ्ये, या सायेबाला काळीज न्हाई बरं ! मुडद्यावानी नुसता उबा ऱ्हातुया; वराड वराड वरडलं तरी हालंना का डोलंना ! मानसाची जात लई खट. यवढी हजार मानसं जात्यात येत्यात, आन् दुकानांत हजार रुपै दरुज येत्यात. पन् योक दमडा गरिबाच्या अंगावर ह्यो टाकतुया का बघ कीं ! ह्येला काळीजच न्हाई. नुसता टक लावून आमची गंमत बगतुया. कुनाला वाटल मातीचा करूनच उबा केलाया ! "

इतक्यांत कोणीसा म्हातारीच्या परळांत पैसा टाकला. " पुंडली गवरदे हारिऽ इट्टल; ज्ञानदेव तुकाराम " म्हातारीनें सरावाची आरोळी ठोकली. " बया ही गरीब वाटसरूच बरीं; पन् ह्ये शिरीमत सायेब नगत. मेला तोंडभर न्हाई सुद्धां म्हनना. त्येला देवानं घडला तवा त्यो काळीज घालायचं इसरला जनू ! "

हातांतला टाळ सुरू झाला.

**" लाटकाची केला, सोंग पसारा दाविला ।**
**लाविलेला चाळा बहु दावूनि पुतळा "**

संध्याकाळच्या वेळीं म्हातारी आणि पारी दुकानावरून आपल्या घराकडे चालल्या होत्या. त्यांची दृष्टि अगोदर अधू आणि त्यांत संध्याकाळ झालेली. त्यांना अगदीं अंधुक दिसत होतें. दुकानांतल्या साहेबाच्या समोर एक नोकर अदबीनें उभा होता व साहेबाच्या अंगावरचे कपडे काढीत होता.

"बघ पान्ये ! साहेबाचा तोरा बघ ! त्येच्या अंगावरचीं कापडं काढायला गडीमानूस ! सायेब ! आंदळ्याला धरम करा वो." नोकर हातांतलें काम टाकून पुढें आला आणि गादीवरून येऊन त्यानें एक पैसा म्हातारीच्या परळांत टाकला.

**"पुंडली गवरदे हारि इट्ठल !"**
**लटिकाचि केला; सोंग पसारा दाविला ॥**
**लावियेला चाळा; बहु दावूनि पुतळा ॥**

बाया दुकानासमोरून पुरत्या जाईपर्यंत तो नोकर खिन्न मनानें त्यांच्याकडे पहात उभा होता.

---

# ७. आमचा खंड्या !

आमचा खंड्या आम्हां मुलांपैकींच एक होता. इतकेंच कीं तो चार पायांवर चालत असे आणि त्याला बोलतां येत नसे. सगळ्या जन्मांत बापड्यानें एक अक्षर तोंडावाटे काढलें नाहीं. आम्हीं तो म्हसवडच्या बाजूनें आणला होता. म्हसवड म्हणजे माण देश आणि माणदेशाचें मुख्य वैभव म्हणजे कडक उन्हाची रणरण आणि कुसळांनीं भरलेले फोंडे माळ हें होय. पांच पांच कोस जमीन तुडवीत गेलांत तरी सावलीचें झाड भेटायचें नाहीं कीं पाण्याचा टिपूस सापडायचा नाहीं. असल्या बोडक्या आणि वैराण मुलखांत शिकार करणारीं कुत्रीं कसलीं असतील याची कल्पनाच करायला हवी. तीं उन्हानें पोपलेलीं असायचीं; त्यांचे जबडे उघडे पडलेले असायचे; त्यांच्या तांबूस लांब जिभा लळलळत असायच्या; गोमाशा झाडण्यासाठीं तीं पाय झाडीत असायचीं; आणि पोटें भकाटीला गेलेलीं असून काय खावें म्हणून तीं दीन मुद्रेनें आजूबाजूला बघत असायचीं. यांच्यांत निरनिराळीं बेणीं असतात. आमच्या खंड्याची जात कोणती होती तें मला आतां आठवत नाहीं. सामान्यतः शिकारी कुत्रीं लांब, चोपलेलीं, रोडकीं अशीं असतात. खंड्या तसा नव्हता.

आमच्या घरीं तो आला तेव्हां तो पिलासारखा दिसत होता तरी हाडापेरानें थोराड वाटे. वयाच्या मानानें दांड दिसत असे. अंगावरचे केस इतर कुत्र्यांच्या मानानें थोडे लांब असत. छाती, मांड्यांची मागची कड आणि मान यांवरचे केस विशेषच लांब होते. पण खंड्याची खरी शोभा म्हणजे त्याचे कान होते. आंतले कानाचे कोके फार मोठे होते असें नाहीं पण त्यांवर वाढलेले केंस एकाग्रा

गोसाव्याच्या दाढीसारखे लांबलचक असत. खालीं वाकून तो कांहीं हुंगीत असला तर त्याच्या त्या केंसांचीं टोकें भुईला लागत ! या लांब केसांमुळें खंड्याचा चेहरा मोठा गंभीर दिसे. गुलामाचे डोळे सुद्धां एकाद्या गांजेकस गोसाव्याच्या डोळ्यांसारखेच लालभडक असत. आपल्या इकडल्या कुत्र्यांपेक्षां त्याचें नाकोटें लांब असून त्यावर काळे-पांढरे केंस असत. पण मीं कितीही तपशिलानें या आमच्या लहान-पणच्या सोबत्याचें वर्णन केलें तरी त्याचा मोहरा वाचकांच्या डोळ्यांपुढें जसाचा तसा उभा रहाणें कठीण आहे. अशी कांहीं शोभा असतेच कीं जिच्यापर्यंत शब्द पोंचत नाहींत. या चतुष्पाद प्राण्याचें स्मरण मला आतां झालें म्हणजे तत्काळ ल्हानपणची माझ्या मनाची हुरहूर मला पुन्हां वाटूं लागते. एकादा अल्लड धाकटा भाऊ असावा तसा हा खंड्या होता. त्याला देवानें वाचा दिली नव्हती याचें मला फार वाईट वाटतें.

प्लेगाच्या दिवसांत आम्ही दरसाल रानांत रहायला जावयाचे. असला एक खंड्या राखणीला असला म्हणजे कोणीही बिनघोर घोरत पडावें ! चोरांनीं जर आमच्या ' बाडोत '——वाडग्यांत—— येण्याचें धाडस केलें असतें तर खंड्यानें या चोरांना फाडून खाल्लें असतें. नुसत्या उग्र मुद्रेच्या बळावरच तो माणसांना पंचवीस हात दूर उभें करी. सकाळीं साडेसाताच्या सुमारास वाडग्याच्या फाटकांतून बाहेर पडून तो सडकेवर जाई व पूर्वेकडे तोंड करून संथपणें उभा राही. कोणाला वाटलें असतें कीं हा सूर्याला नमन करीत आहे ! पण त्यांतलें कांहीं नव्हतें. तिकडून आमचा दूध-वाला येत असे ! खंड्या त्याची मार्गप्रतीक्षा करीत उभा रहावयाचा. पहिल्या पहिल्यानें दूधवाला पुढें येण्यालाच धजत नसे. अशी उग्र चर्या त्या कुत्र्याची होती. पुढें त्याला कळलें कीं एरवीं हा

कुत्रा कोंकरासारखा गरीब आहे. अंगणांत वाळत घातलेल्या सतरंजीवर वगैरे पोरें गंमतीनें पसरलेलीं असलीं म्हणजे त्यांच्यांत हा जावयाचा. तीं मुलेंही त्याला धरून लोळवीत, त्याला 'आ' करायला लावीत आणि त्याच्या त्या अक्राळविक्राळ तोंडांत खुशाल हात घालीत ! पण हा कुणाला कधीं चावला नाहीं कीं कुणाला त्यानें कधीं ओरखाडलें नाहीं.

पण लहान मुलांशीं कोंकरासारखा खेळणारा हा अस्राप जीव एक विशेष प्रकारची गर्जना कानीं आली म्हणजे एकाद्या सिंहाच्या छाव्याप्रमाणें भयंकर रूप धारण करी. अजिमतान्याच्या पूर्वेकडील पायथ्याला जें विस्तीर्ण मैदान आहे त्यावर आमच्या झोपड्या होत्या. किल्ल्याच्या पूर्वाभिमुख डोंगराचा उजवा हात वांकण घेत घेत खूप लांबवर गेलेला आहे. या वांकणांत मोठें जंगल असून हा सारा टापू झाडीनें भरून गेला आहे. शिकारी लोक इकडे पुष्कळदां येतात. एकदां शिकाऱ्यांनीं सकाळीं दहा वाजतांच रान उठवावयास सुरुवात केली. तो गोंगाट सुरू होतांच खंड्या मान वर करून तिकडल्या रोखानें पहात उभा राहिला. त्याच्या गळ्याला सांखळी होती. शिकारीचे आवाज त्याच्या ओळखीचे होते असें दिसतें. निरनिराळे कर्कश व भेसूर आवाज कानांत भरूं लागतांच त्यानें कानाचे बुंधे चाळवावयास सुरुवात केली आणि घशांतून एक चमत्कारिक गुरगुर तो काढूं लागला. होतां होतां त्याचें सगळें अंग थरथरूं लागलें ! पायाच्या नख्यांपासून तों नाकपुड्यापर्यंत त्याच्या अंगांतला चेव दिसूं लागला. तो सांखळीला हिसके मारूं लागला. जोरानें उडी मारावी अशा रीतीनें तो सगळेंच्या सगळें अंग पुढें झेपावूं लागला. साखळीच्या हिसक्यानें दर वेळीं तो मागें पडे; व पुन्हां तो पुढें झेप घाली. त्याला

अडवून धरणें अतःपर अशक्य होतें. तो त्या हिसक्यांनीं गळफास लागून मेला असता. गळ्याची कडी सोडतांच खंड्या वाऱ्यासारखा निघाला. त्याच्याबरोबर कोण धावणार! हां हां म्हणतां, मैदान ओलांडून तो झाडींत शिरला. आम्ही सगळे काळजींतच होतों. सुमारें तीन तासांनीं खंड्या परत आला. अंगावर कुसळें चिकटलेलीं: अंगाचे ओरखाडे निघालेले: केंस विसकटून गेलेले: तान्हेनें आणि भुकेनें थोपलेला आणि चोपलेला हा गडी दाराशीं येऊन उभा राहिला! या वेळीं त्याच्या अंगांतील आवेश आणि क्षात्रवृत्ति आमच्या प्रत्ययाला आली.

या प्राण्याला माणसाचें शहाणपण होतें. खरें म्हणजे शहाण्या माणसाचें शहाणपण त्याला होतें असें म्हटलें पाहिजे. आम्हीं ज्या घरांत होतों त्याचीं सारीं दारें एकासमोर एक अशीं ओटीपासून परसापर्यंत गेलेलीं होतीं. दरवाज्यांतून ओटीवर आलें कीं डाव्या हाताला सारी ओटी; पुन्हां समोरचें दार ओलांडून गेलें कीं डाव्या हाताला सारें माजघर असें शेवटच्या परसापर्यंत होतें. स्वयंपाकघरांत आम्हीं जेवायला बसत असूं. एखाद्या दिवशीं खंड्याच्या मनांत काय येई कोणास ठाऊक: पण परसांत परस्पर यायला जी वाट होती ती सोडून तो या अनेक दारांतून शिरत शिरत परसांत जाई. स्वयंपाकघरांत आमची पंगत बसलेली असायची. तो आमच्या समोरून जाई. पण या शहाण्या प्राण्यानें एकदांही कधीं आमच्या ताटाकडे किंवा स्वयंपाकाकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. मग थांबून भाकरीसाठीं शेपटी हलवणें लांबच राहिलें. हें त्याचें वर्तन खरोखर अगदीं शहाण्या माणसासारखेंच असे. हें त्याला कसें सुचत असे कोणास ठाऊक! पण ही निर्लोभ आणि बिनहावरी वृत्ति पाहून आम्हांला मोठें नवल वाटे. कितीतरी माणसांना

सुद्धां हें शहाणपण नसतें. खंड्या एकाद्या सुसंस्कृत माणसाप्रमाणें स्वयंपाकाकडे किंवा आमच्या पानाकडे न बघतां सरळ निघून जावयाचा. जणूं कांहीं तो मनांत म्हणत असे " आपणाला इकडे पाहून काय करावयाचं आहे ? आपल्याला जी भाकरी घालणार आहेत ती वेळेवर आपल्या पुढें येईलच. माझ्या धन्यांनो ! तुम्हीं स्वस्थ जेवा." खरोखर अशा प्राण्यापर्यंत आपलें ममत्व पोहोंचणें किती अवश्य आहे, तें पोचलें, तरच आपण खरे रसिक. दाव्याची सुटून इकडे तिकडे मोकाट हिंडू लागलेली गाय आडवून आडवून पुन्हां वाड्यांत आणून सोडण्याच्या कामांत तर तो एखाद्या गुराख्यापेक्षांही जास्त चतुर होता. खंड्या एक विश्वासू नोकरच होता. आमच्या गाईला गुराख्यापेक्षां खंड्याचीच खरी राखण होती, आणि भीतीही होती. याला जर बोलतां आलें असतें तर यानें चांगलाच पगार मिळविला असता आणि आम्ही तो संतोषानें दिला असता.

हा कुत्रा जातीचा शिकारी होता आणि अगदीं लहानपणीं त्याला इतर कांहीं खाद्य त्याच्या मालकाकडून मिळत असे. पण आमच्या घरीं आल्यापासून दूध भाकरी हेंच त्याचें खाणें होतें. एकदां आम्हीं रहात होतों त्या रानांत टोळ आले. टोळधाड म्हणजे काय हें प्रत्यक्षच पाहावयास हवें. तें शब्दांनीं कळावयाचें नाहीं. या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सर्व आभाळ टोळांनीं भरून गेलें. एक लालभडक छत आकाशाला दिलें आहे असें वाटूं लागलें. ढगामागें ढग येतात तशा टोळांच्या झुंडीच्या झुंडी एकामागून एक येत होत्या. यांतले लक्षावधी टोळ खालीं उतरत आणि उद्भी-ज्याचा फन्ना पाडीत. दोन दोन तासांच्या आंत, झाड-झाडोरा-पिकें-जिथें कोठें थोडाही वनस्पतीचा अंश असेल तिथें उतरून, हे

टोळ सारा मुलुख बोडका करून टाकीत. दोन तासांपूर्वी जेथें शोभा. मांगल्य, आणि जीवनाचा फुलोरा दिसे तिथें सुतक, क्षय, आणि बोडकेपणा यांचा अमंल चालू होई. आमच्या शेजारच्या भरगच्च पिकांवर टोळ उतरूं लागले. म्हणून आम्ही सारे लोक हातांत पोत्यांचे घडपे घेऊन तेथें गेलों आणि त्यांनीं टोळ झाडूं लागलों. वास्तविक हें कांहीं तरी होतें ! टोळांची दाटी आणि आमचे प्रयत्न यांत कांहींच प्रमाण नव्हतें. पण खंड्या आमच्या बरोबर आला, त्याला पोत्याच्या घडप्यांचा कांहींच उपयोग नव्हता. त्यानें नुसत्या उंच उंच उड्या मारून टोळ धरावयास सुरुवात केली. पण एक टोळ चावतांच त्याला रुचि लागली आणि मग उडया मार मारून त्यानें किती टोळ खाल्ले असतील कोणास ठाऊक ? मात्र हें रुचकर अन्न त्याला इतकें बाधलें कीं त्या उष्णतेनें त्याच्या अंगावरचे सगळे केंस गळून पडले. त्याच्या अंगावर जिकडे तिकडे खवंदें पडलीं आणि अनेक ठिकाणीं मासुर्डी दिसूं लागलीं. आम्हांला वाटलें कीं हा कुत्रा आतां मरतो. पण वैदूनें कडू तेलांत एक औषध करून दिलें. तें एक दोनदां लावतांच खंड्याला बरें वाटूं लागलें. कातड्याला गेलेले तडे भरून आले; केंस उगवले; आणि पंधरा दिवसांत केसांनीं पुन्हां भरून जाऊन कुत्रा काळा कुळकुळित दिसूं लागला. सगळ्या जन्मांत खंड्याच्या हातून चूक झाली असली तर येवढीच होय. टोळ खाऊं नयेत हें त्याला कळलें नाहीं. पण येवढयामुळें त्याला मूर्ख ठरविणें चूक होईल. चांगलीं शहाणीं माणसेंसुद्धां गोड लागलें म्हणून खात सुटतात आणि मागून कण्हत बसतात हें आपण पहातों. खंड्या फार झालें तर यांच्या इतकाच मूर्ख असेल.

पण खंड्याचें शहाणपण माणसांनासुद्धां लाजविणारें होतें याची एक साक्ष सांगतों. आम्ही रानांत रहात होतों तेथून. तीन

चार मैलांवर माझी बहिण दुसऱ्या एका रानांत, प्लेगनिमित्त, रहात असे. ती तेथें प्लेगनेंच वारली; म्हणून तिच्या घरच्या मंडळींना आम्ही आमच्याकडे घेऊन आलों. बरोबर त्यांचीं हांतरूण पांघरुणें होतीं. तीं घरांत घेणें धोक्याचें होतें. आमचें वाडगें खूप ऐसपैस म्हणजे चांगलें एक एकरभर होतें; म्हणून आमच्या झोपडीपासून बऱ्याच अंतरावर एका बाजल्यावर हीं सारीं चिरगुटें आम्हीं उन्हांत म्हणून ठेवून दिलीं. तीं तीनचार दिवस तेथेंच ठेवावयाचीं होतीं. वाडग्यांत येण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती. म्हणून रात्रींच्या वेळीं तीं कोणीं घेऊन जाईल असें आम्हांला कधीं वाटलेंच नाहीं. रात्र पडली; आम्ही झोपीं गेलों; खंड्या झोंपडीच्या बाहेर दाराशींच नेहमींप्रमाणें होता. सकाळीं उठून माणसें पहातात तों खंड्या अंगणांत नाहीं! आम्ही इकडे तिकडे पाहूं लागलों. जातां जातां त्या दूर टाकलेल्या कपड्यांकडे गेलों: तों त्या बाजल्याच्या शेजारीं नख्यांनीं काढलेल्या एका डबऱ्यांत खंड्या पाय पुढें पसरून बसलेला! धन्याचीं चिरगुटें झोपडीपासून लांब पडलेलीं होतीं तीं जातील ही खंड्याला भीति! म्हणून नेहमींचें अंगणांतील ठिकाण सोडून हा इमानी प्राणी त्या बाजल्यापाशीं रात्रभर बसून राहिला! थंडी लागत होती म्हणून त्यानें नख्यांनीं एक पसरट डबरा काढला आणि त्याच्या उबेंत कपड्यांवर खडा पहारा करीत हा आमचा मित्र सकाळपर्यंत ताटकळत राहिला होता. खरोखर माणसाच्या जातींतल्या चाकरानेंसुद्धां अशी धन्याच्या हिताची काळजी दाखविली नसती. त्याला सांगावें लागलें असतें कीं तूं येथें बसून रहा: आणि बसला असता तरी तो चडफडत बसला असता. खंड्याला कोणीं सांगितलें होतें? त्याला हें शहाणपण उपजतच होतें आणि हा विश्वासूपणा आणि मालकाच्या हिताची ही काळजी त्याच्या अंगीं उपजतच होती. खंड्या माणसांपेक्षां

कितीतरी शहाणा, इमानी, आणि सच्चा होता. त्याला जर बोलतां आलें असतें तर त्याची खरी योग्यता कळून आली असती.

खंड्याला जर बोलतां आलें असतें तर त्याची गणना चांगल्या चांगल्या माणसांत सहज करतां आली असती. तो कोठल्याहि म्युनिसिपॅलिटीचा मेंबरच काय पण अध्यक्षहि झाला असता; आणि मेंबर किंवा अध्यक्ष होऊनहि त्यानें संस्थेचा दर्जा किती तरी वाढविला असता. त्यानें आपल्याच घरापुढें कंदिलाचा खांब बसवून घेण्याचा आग्रह धरला नसता आणि घरचा गडगा कमिटीच्या नोकरांकडून लावून घेतला नसता; त्यानें म्युनिसिपॅलिटीच्या मालकीचीं लिंबाचीं झाडें तोडून आणून घरच्या चुलीला सरपण केलें नसतें आणि बैलांना घालावयाचा कडबा आपणच 'खाल्ला' नसता. त्यानें म्युनिसिपॅलिटीच्या बैलांना द्यावयाच्या मुगांत माती मिसळली नसती आणि म्युनिसिपल मालकीचा केर स्वतःच्या शेतांत खतांसाठीं फुकट ओतविला नसता. तो रजिस्ट्रार असता तर त्यानें मृत्युपत्र करतांना त्या मरणाराकडून पैसे मागितले नसते आणि फौजदार असता तर त्यानें लांच घेऊन पुरावा जाळून टाकला नसता. तो बातमीदार असता तर त्यानें खोटी बातमी दिली नसती आणि संपादक असता तर त्यानें असत्याचा हट्ट धरला नसता. मास्तर असता तर त्यानें आपल्या वह्या इमानानें तपासल्या असत्या आणि मुन्सब असता तर त्यानें न्यायाचा विक्रा मांडला नसता. तो भाजीवाला असता तर वजन करतांना त्यानें तागडीला झोका दिला नसता आणि दूधवाला असता तर त्यानें दुधांत पाणी घातलें नसतें. त्यानें आपलें इमान कधींही गमावलें नसतें. तो नेकीनें राहिला असता आणि आपल्या वाट्यांस आलेलें काम केवळ वेठ म्हणून नव्हे तर कर्तव्य म्हणून त्यानें केलें असतें. हें सारें घडलें असतें पण त्याला वाचा नव्हती आणि

यामुळें त्याचें थोर मनोगत जागच्या जागींच जिरून जात असे. त्याच्या मनाच्या ऊर्मि आणि आवेग इमानांतून निघालेल्या असत. त्याला फार झालें तर शेपटी हलवितां येई आणि उत्साहानें इकडे तिकडे उड्या मारतां येत. पण एवढ्यानें काय होणार? त्याच्या थोर भावना खरोखर अव्यक्तच रहात.

एकदां आमची गाय आम्ही वाडग्याच्या बाहेर चरणीला लावली होती. हिरवेंगार मैदान लांबवर पसरलेलें होतें. गाय चरणीस लावून मी तिथेंच हिरवळीवर पसरलों होतों. खंड्या शेजारीं होता. चरतां चरतां गाय बरीच दूरवर गेली. तिच्या शिंगाला लांबलचक दोरखंड बांधलेलें होतें. माझ्या अंगाला राहिलेलें त्याचें टोक धरून मी गाईला परत ओढूं लागलों. गाय जवळ येईना. मीं जोर करतांच गाय बेफाम बनली. गाय मोठी हलकी चपळ होती. तिचा मोहराही मोठा देखणा आणि मानी-पणाचा दिसे. मी परत ओढीत आहें हें तिला खपलें नाहीं. पाठीवर शेपटी घेऊन ती चारही पाय उचलून उड्या मारूं लागली. मी दोर ओढीतच होतों. या झटापटींत त्या लांबलचक दोराचे तीन चार विळखे माझ्या पायाच्या भोंवतीं पडले. गाय तर उड्या मारीत पळूं लागली. माझी फरपटच झाली. इमानी खंड्या शेजारीं होता. त्यानें माझी स्थिति ओळखली आणि तो गाईच्या समोर जाऊन तिला आडवूं लागला. गाय वळेल तिकडे खंड्या पुढें होई. त्यानें भुंकून भुंकून त्या गाईला मार्ग बंद करण्याची वेळ आणली. गाईला कुत्र्याइतकी अक्कल नसते. दोन्ही प्राणी माझ्या चांगल्या संवयीचे होते. पण एकानें माझी स्थिति अगदीं भयंकर करून सोडली व दुसऱ्यानें ती ओळखून मला वाचविण्याची शिकस्त केली. खंड्याच्या या पराक्रमाचें स्मरण मला चांगलेंच राहिलें आहे. माणसाला जरी

स्वकीयाबद्दल काळजी वाटावी तशी या कुत्र्याला वाटली आणि त्यानें त्या गाईला असें रेखून धरलें कीं तिला थांबणें भागच पडलें. त्या प्रसंगाच्या खुणा अजूनही माझ्या दंडावर आहेत आणि खंड्याच्या उपकाराचें स्मरणही माझ्या मनांत तितकेंच कायम आहे. चालू गोष्टींचें बरोबर आकलन होणें ही कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. मी दोर ओढीत होतों तोंपर्यंत खंड्या स्वस्थच होता, पण गाय बेफाम बनून माझ्या पायाला विळखे बसतांच मात्र 'आतां आपण कामाला लागलें पाहिजे' असा बुद्धिनिश्चय खंड्यानें केला व आपल्या पराक्रमानें त्यानें गाईला वठणीवर आणलें, ही समजशक्ति विशेष होय.

आम्हीं प्लेगचे दिवस रानांत काढले आणि प्लेग संपला म्हणून घरीं परत आलों. एक आठवडा गेला असेल. खंड्या गोठ्यांतील आपल्या जागेवरून एके दिवशीं सकाळीं बाहेर पडला नाहीं. थोडेंसें ढोसल्यावर तो बाहेर आला; पण मागले–पुढले पाय ताणताणून आळस देऊं लागला; डोळे आणि मान लांबवून नाकानें कांहीं चमत्कारिक फूत्कार करूं लागला. आम्हाला वाटलें खंड्याला थंडी झाली असावी आणि म्हणून तो आळसावला असावा. दुपारीं नेहमींप्रमाणें दूधभाकरीचा काला त्याच्या पुढें आणून ठेवला; पण खंड्यानें पडल्या पडल्याच मान वर करून त्या भांड्याकडे पाहिलें आणि तो पुन्हां मुरकटून पडला. त्याला मी पुष्कळ आंजारलें–गोंजारलें; खंड्या, खंड्या म्हटलें; पाठीवर थोपटून 'ऊठ ना' म्हणून दोन तीनदां जोरानें ओरडलों; पण घशांतून गुरगुर काढून तो अधिकच सताड पसरला. वाचकाला खोटें वाटेल पण खंड्याचें अंग तापलें होतें. माझ्या हाताला तें कळलें. तेव्हां मात्र आम्हांला निराळी शंका आली. काय करावें हें कळेना. खंड्याला बहुतेक प्लेग झाला असावा असें सर्वांना वाटूं लागलें. पण त्यावर कांहींहि

औषध नव्हतें. केवढीहि किंमत पडली असती तरी आम्हीं ती दिली असती. पण काय होतें हें पाहण्यापलीकडे कांहीं करतां येईना. त्यामुळें तर फारच दुःख वाटूं लागलें. संध्याकाळीं खंड्या अगदीं गळाठला. त्याची मान ठणकत होती. त्याला सांगतां येत नव्हतें पण त्याच्या चलनवलनावरून ध्यानांत आलें. मी हातानें त्याची मान चाचपून पाहिली तों आंब्याच्या कोयीसारखी गांठ हाताला लागली ! अरेरे ! खंड्या प्लेगनें मरणार हें आतां ठाम ठरलें. त्यानें अन्नपाणी सोडलेंच होतें. तो आतां डोळेहि उघडीना. खंड्या केवळ घरांतलें माणूस; पण मुकें माणूस इतकेंच काय तें. आणि म्हणून वाईट वाटूं लागलें. आम्ही सारीं कष्टी होऊन बसलों. प्लेगाच्या दिवसांत, चोराचिलटाच्या भयांतून खंड्यानें आम्हांला संभाळून घरीं आणलें आणि आतां आम्ही सारे सुखरूप झाल्यावर तो आपण स्वतः प्लेगानेंच मरत आहे हें पाहून तर आम्हांला पराकाष्ठेची हळहळ उत्पन्न झाली. माझा मधला भाऊ फारच मायाळु होता. तो अगदीं ओक्साबोक्शीं रडूं लागला. दुःखानें दुःख पसरत जातें. आम्हीं सारीं माणसें चांगलीं धष्टपुष्ट आणि दिसायला थोडींशीं उग्र. पण खंड्याच्या या दुखण्यानें आमच्या तोंडचें अगदीं पाणी पळालें. दुसऱ्या दिवशीं खंड्याचे पाय थडथडूं लागले : ते ताठही झाल्यासारखे वाटूं लागले : आतां त्याला शुद्ध नव्हती. दोन तासांनीं, म्हसवडकडच्या माळावरच्या गोठ्यांत जन्मलेला हा जीव, आमच्या घरीं सातान्यास वाढून, मौजेंत दिवस घालवून, प्लेगानें नाहींसा झाला.

ज्यांच्या घरीं मायेचीं जनावरें आहेत त्यांना मी काय म्हणतों तें कळेल. घरांतलें माणूस गेल्यानें मनाला जें दुःख होतें तेंच आम्हांला झालें आणि पुढें कित्येक दिवसपर्यंत या शूर, सुंदर, इमानी प्राण्याच्या आठवणी आम्ही एकमेकांना घोळघोळून सांगत होतों. आज

एकूणचाळीस चाळीस वर्षें झालीं; पण या श्वानयोनींत जन्माला आलेल्या आमच्या मित्राची माझी आठवण पहिल्या इतकीच ताजी आहे. आणि तो गेल्याचें माझें दुःख पहिल्या इतकेंच तीव्र आहे. माझ्या घरांतील जीं माणसें आजवर दिवंगत झालीं आहेत त्यांच्या स्मृतींची उजळणी जेव्हां एकाद्या वेळीं माझ्या मनांत चालू असते तेव्हां या अबोल प्राण्याचें स्मरणही मला होतेंच होतें. खरोखर याला जर बोलतां आलें असतें तर काय मौज झाली असती. मानवी कृतीच केवळ अपुऱ्या असतात असें नाहीं. विधात्याच्या कृतीसुद्धां किती टिकाणीं तरी अपुऱ्या दिसतात. हा सिद्धान्त सिद्ध करायला अजूनही कांहीं उदाहरणें हवींच असलीं तर आमच्या खंड्याचें उदाहरण सहज उपयोगी पडेल.

---

# ८. डाळं मुरमुरं, पोहं ! पोहं !

पुणेकरांच्या हें ध्यानांत आलें आहे कीं नाहीं कोणास ठाऊक पण " डाळं मुरमुरं ! पोहं, पोहं ! " ही थोडीशी सुस्वर गळ्यावर येणारी हांक आतांशा कानांवर पडेनाशी झाली आहे. आतां यापुढें तर ती पुन्हां केव्हांही पडणार नाहीं; कारण गंगाराम आतां अगदीं थकून गेला आहे. तो म्हणाला तरी त्याच्या घशांतून तो सुरेल स्वर आतां उमटावयाचा नाहीं. गंगाराम आतां साठीच्या पलीकडे गेला आहे. तथापि वयाच्या मानानें तो अगदीं झाल्यासारखा दिसतो. ' डाळं मुरमुरं, पोहं, पोहं ' या त्याच्या सुरेल हाकेनेंच तो माझ्या ओळखीचा झाला होता. मी टेबलाशीं बसलेला असलों म्हणजे नेमक्या वेळेला त्याची ती गोड हांक कानावर यावयाची. एखाद्या वेळेस मुद्दाम उठून मीं खिडकींतून त्याच्याकडे पाही. त्याची ती सुस्वर हांक, त्याचा तो निरागस धंदा, आणि त्याची ती उन्हानें रापलेली मुद्रा, यत्किंचितही माणुसकी अंगीं असलेल्या कोणाही माणसाला क्षणभर तरी गंभीर करील अशीच होती.

कल्हईवाला, पेरूवाली, बांगडीवाला, तांब्या-पितळेची मोडवाला, कांदेबटाटेवाला, डाळं-चुरमुरेवाला, तऱ्हेवार कापडवाला, लहान मुलांचे फ्रॉकवाला, मुळ्याची-टंबाट्याची-मेथीची भाजीवाली, जरीचे खणवाला, चंपीवाला, तूपवाला, लोणीवाला, गहूंवाला, डाळवाला, एखाद्या वेळीं खवावाला, ' कांहीं कागद आहेत का— वाला', डबाबाटलीवाली इतकेंच काय पण, केवळ 'भाकरी वाढा व ऽ ऽ ' म्हणून ओरडणारी भिकारीण जरी घेतली, तरी असें दिसेल कीं प्रत्येकाच्या आवाजाचें कांहीं एक स्वतंत्रपण असतें. आवाजावरूनच पाहिलें तर कोणी केविलवाणा, कोणी रंगेल, कोणी पहिल्या

पासूनच कंटाळलेला असे हे सर्वजण दिसतात. पण कांहींकांहींच्या आवाजांत मोठें लाघव असतें; आणि तो ऐकला कीं आपल्या मनांत चमत्कारिक चलबिचल चालू होते.

एक 'कल्हई'वाला आहे तो पूर्वीच्या गवयासारखा कानाशिलावर हात ठेवून मोठा करुणास्पद आक्रोश करतो; रांगोळीवालीच्या पल्लेदार आवाजाची फेंक कानांवर आली, कीं मुंबईची गाडी घाटाकडे तोंड करून जी दशदिशा निनादत जाणारी शीळ घालते तिचीच आठवण होते; डबाबाटलीवालीचा अनुनासिक आवाज तर इतका निर्मळ, कसदार, उंच, टोंकाकडे सहज निमुळता होत जाणारा, आणि शेवटपर्यंतचा आपला कणसुद्धां सुस्पष्ट ठेवणारा असतो, कीं ती किनार ऐकतांच लेखणी खालीं ठेवून तीच ऐकणें अवश्य आहेसें वाटतें. ती रांगोळीवाली आणि ही डबाबाटलीवाली यांना सडकेवर ओरडत ठेवण्याच्या ऐवजीं त्यांना गायनशाळेंत पाठविणें हेंच रास्त होईलसें वाटतें ! पण सगळ्यांत वाईट वाटतें तें 'गहूं घ्या गहूं ऽऽ' म्हणून आक्रंदन करणाऱ्या मुलाचें. बापाला हलकें पडावें म्हणून हा मुलगा ओरडण्याचें काम करतो. तो त्याचा बाळपणांतील कोमल आवाज ऐकला म्हणजे वाटतें, याला आतां शाळेंत घातलें पाहिजे. हा मुलगा समवयस्क मुलांच्या मेळांत वर्गांत बसलेला किंवा क्रीडांगणावर खेळत असलेलाच असावयास हवा. तो काव्यगायन अत्यंत मिष्ट असें करील आणि क्रिकेटच्या पटांगणावर 'बॉल हिअ ऽऽर' म्हणून त्यानें आरोळी ठोकली तर ती ऐकावयास गोड लागेल. पण तो गव्हाचें ओझें पाठीस घेऊन या वयांत आळोआळीं ओरडत फिरत असतो ! गंगाराम सुद्धां यांच्याच जातींतला आहे. 'डाळं मुरमुरं' ही हांक देतांना त्याचा आवाजसुद्धां असाच गोड लागत असे. विशेषतः या हांकेच्या पहिल्या अर्धुकानें गंगाराम आपला आवाज मोठ्या गंमतीनें

खेळवी व दुसऱ्या अर्धुकाचा शेवट मोठ्या शिताफीनें आवरता घेई. म्हणून तर माझें लक्ष तिकडे विशेष जाई.

गंगाराम मला सडकेवर भेटला म्हणजे थोडासा हसे, रामराम करी व चालूं लागे. असें अनेकदां झालें. मला वाटे हा एक भोळसट माणूस असावा; म्हणून दर वेळीं हसून हा रामराम करीत असेल. मग एके दिवशीं त्यानें रामराम करतांच मी थांबलों व म्हणालों, " काय रे बाबा ! तुझी माझी ओळख आहे का ? "

" आता का करावं ? " तारेच्या खांबाला हात देऊन गंगाराम म्हणाला, " दादा ! मी गंगाराम न्हवं का ! तुमी नाना-वाड्यांत व्हतां तवा मी तत संबुरच्या साळंत न्हवतु का ! मी तर तुमास्नी हररोज पगायचा ! वळाक इसारला जनूं ! "

" होय रे होय ! " म्हणून मी मनापासून हसलों. " आतां त्याला वीस वर्षे होऊन गेलीं; माझ्या ध्यानांतच राहिलं नाहीं. पण, बरे खुशाल ? "

" व्हय, आपल्या पायाच्या पुन्याइनं बरं हाये दादा ! " गंगारामानें उत्तर केलें.

मला माझ्या कामावर जावयाचें होतें म्हणून मी संभाषण संपविण्यासाठीं थोड्या आर्जवी आवाजानें म्हटलें, " गंगाराम, मी जातों आतां; पुन्हां भेटूं. "

" हां–हां; माजी तर दररोजची फेरी हाइच; हातच ऱ्हातासा न्हवं का जनूं ? "

" हो. " म्हणून शेजारच्या माडीकडे बोट दाखविलें व मी चालूं लागलों, आणि " डाळं मुरमुरं, पोहं पोहं " करीत गंगाराम आपल्या वाटेनें गेला.

मीं मागें वळून पाहिलें तों गंगाराम अगदीं संथपणानें चाललेला दिसला. वर्तमानपत्रें विकणारीं पोरें केवळ सायकलच्या नादानें पळत सुटतात आणि गिऱ्हाईक गमावतात. तसें हे फेरीवाले करीत नाहींत. गिऱ्हाइकाची हांक ऐकत ते संथपणानें चाललेले असतात. महात्मा गांधींनीं खादीची चळवळ सुरू केल्यावर ज्या लोकांना आपल्या धोरणाचा विजय झाला म्हणून आनंद वाटला असेल त्यांच्यांतच गंगारामाची गणना करावयास हवी. गंगारामानें अंगावर खादीशिवाय कधीं कांहीं घातलें नाहीं. कमरेला पांचहाती 'पंजी', अंगांत खांद्याकडील बिरड्यांची 'पैरन', अन्, डुइला चार हात पट्याची टापशी—हा त्याचा पोशाख पहिल्यानें कोणी ठरविला होता कोणास ठाऊक ! त्याची त्यालासुद्धां आठवण नसेल. पण आज त्याची सगळी हयात संपत आली आहे तरी या त्याच्या पोशाखांत कसलाही फरक पडलेला नाहीं. कमरेचें 'पंजी' पांच-हातीच, पण गंगारामाला तेंहि लांब वाटतें. पुढे येणारा त्याचा लहानसा सोगासुद्धां तो डावीकडे खोंचून घेतो. शिवाय गंगाराम भारीच ठेंगणा आहे. सगळें नेसण आवरून घेण्याकडे त्याची प्रवृत्ति फार. अर्थात् गुडघ्यांपासून त्याचे दोन्ही पाय अगदीं साफ उघडे असतात. खादीची खरी शोभा तिच्या मलिनपणांतच असते ! तरच ती खादी आहेसें वाटतें. गंगारामाला हें मर्म चांगलें उमगलें होतें. शिवाय दिवसाच्या कांठीं सहा—सात तास रस्त्यांतून हिंडा-वयाचें व तेंही अगदीं सानकाश ! स्वाभाविकच त्याचीं सगळीं कांबुरणें धुळीनें भरलेलीं असत. पायांची निगा ठेवण्याचें त्याच्या गांवींही नसे. ते नेहमीं पांढरसर, किटलेले, व ओरखाडे उठलेले असत. त्याच्या पायांत पायताण वगैरे मीं कित्येक वर्षांत पाहिलेलें

नाहीं. वयानुरूप गंगारामाचे केंस पांढरे झाले आहेत; आणि इजामतीचा संस्कार तो कधीं एखाद्या वेळीं करतो. असें हें गरीब आणि भोळें ध्यान डोईवर पिशव्या–पिशव्यांची पाटी घेऊन ' डाळं मुरमुरं! पोहं, पोहं ' करीत आज कित्येक वर्षें पुण्याच्या रस्त्यांवरून हिंडत होतें. आतां मात्र तें घरीं बसलें आहे!

यापुढें मग मी गंगारामाला डाळयामुरमुऱ्यांसाठीं पुष्कळदां वर हांका मारूं लागलों. जेवढें घ्यावयाचें असेल तेवढें घेऊन झालें म्हणजे गंगाराम खाऱ्या दाण्याच्या पिशवींत चार बोटें घाली व थोडेसे वर काढून मधूच्या पुढें करी. मधू माझ्याकडे पाही व मीं ' घे घे ' म्हटलें म्हणजे घेई.

" दादा, एवढाच त्योक तुम्हांला ? "

मीं " होय " म्हटलें म्हणजे " बरं; देव त्येला म्हातारा करू " असा आशीर्वाद देऊन गंगाराम पाटीला हात घाली.

असें पुष्कळदां झालें. मग एकदां आमच्या कॉलेजच्या पटांगणावर क्रिकेटची मॅच चालू असतांना त्याची अन् माझी गाठ पडली. पटांगणाच्या भोंवतीं पोरांची थाप उभी होती. खेळ अगदीं रंगांत आला होता. गंगाराम आणि मी गुल्नार झाडाच्या सावलींत बैठक मारून बसलों. त्यानें पाटींतून चार फक्या चुरमुरे अन् खारे दाणे माझ्यापुढें कागदावर ठेवले अन् मीहि, तो नको नको म्हणतां म्हणतां, त्याच्या पिशवींत चार पैसे टाकून दिले. गोष्टीवरून गोष्टी निघाल्या. आणि गंगारामानें आपलें मन अगदीं खुलें केलें. आपण शाळेंत कशी नोकरी धरली येथपासून त्यानें आपली हकीकत सांगावयास आरंभ केला. मधून मधून क्रिकेटच्या पटांगणावरून जयघोष ऐकूं येत व स्वाभाविकपणेंच त्याच्यापेक्षां माझें लक्ष तिकडे जाई. त्याला मात्र एक धाक असे; तो हा कीं, चहाला नाहीं तर

टिफिनला गडी गेले तर लोकांची पांगापांग होईल आणि तेव्हां लक्ष नसलें तर आपलें गिऱ्हाईक जाईल. पण येवढी काळजी सोडली तर गंगाराम आपली हकीकत अगदीं मन लावून सांगत होता.

" तुमी काइ बी म्हना दादा; पन् मानसाला चार पैस मिळालऽ तर त्येला त्याज ऱ्हातया; न्हाइतर कुत्रं आन् मानुस याकुच पगा. "

" अगदी बराबर बोललां तुम्ही गंगाराम. पैशावांचून माणसाचं जिणं व्यर्थ आहे. आपल्याला कोणी विचारीत नाहीं. "

" आतां दादा, तुमीच बगत व्हता, मी क्ययवढ्या इतमामांत वागत होतुंः आँ? यवढ्या साळच सायेब, पन् गंगारामावाचून काई होत नवतं बगा. गंगाराम, ह्यो कागद कुटं हाइरं, गंगाराम, त्यो कागद कुटं हाइरं, आज ह्यो सायब आला, उंद्यां त्यो रावसाएब आला; पन् आपला गंगाराम म्होरं! काय शिवीगाळ न्हाइ का आरऽ तुर न्हाई ! अशी माजी तालेवारी व्हती! काय धनी? चार शिपाई हाताखालीं; त्येनी म्हनावं नाइकसाब, नाइकसाब ! ह्यो माजा रुबाब ! तुमी बगतच व्हता कीं दादा ! "

" खरी गोष्ट."

पूर्वीच्या आपल्या आश्रमांत परत प्रवेश करून गंगाराम तेव्हांचें अधिकाराचें व मानाचें वैभव भोगत बोलत होता.

" गंगाराम, तुमची ऐट मोठीच होती तेव्हां ! साहेब यायचा म्हणजे तुम्ही अंगांत तो जरीच्या पट्ट्याचा अंगरखा घातला अन् ती पिळाची पगडी घातली म्हणजे, तुमचा झोक कांहीं विलक्षणच दिसायचा ! "

" व्हय, व्हय." गंगाराम हंसून म्हणाला, " म्यां घरीं बसायचं ठरावलं तवा सायबानी त्यो अंगारखा आन् ती पगडी मला

बक्षीश दिली. दादा ! कारबारीन येकांद्या वक्ती म्हनं त्येवडीं कांबुनें घालाना का सनासुदीला. मी म्हनं तुला का याड लागलं ? अग त्ये समदं साळंत ग्वाड दिसतंया ! घरीं घालून कुनाला दावाव ! ”

गंगारामाला प्रापंचिक सुखाची भावना पुन्हा प्रतीत झाली आणि त्याच्या डोळ्यांला पाणी आलें.

त्याचा आवेग जाऊं देऊन मी विचारलें, “ आतां त्याहि थकल्या असतील ? ”

“ दादा, थकल्या कशापायीं म्हनूतां ! त्येनी आपलं आवारलं आमच्या आंदीच; आमी आपलं बसलुया ‘ डाळं मुरमुरं ’ ओपीत ! ”

“ अरे अरे ! ”

“ दादा तिनं माजी राकन लइ दिस क्येली. ”

एका पलीकडून जाणाऱ्या पोराकडे हात करून तो म्हणाला, “ मी या पोराच्या शिनचा असन बगा, तवा माजं लगीन झालं. तवापास्नं दादा, गुदस्ताच्या सक्रातीपातुर आमी दोग आमच्या पल्याडल्या माळींत नांदत व्हतों.बाकीच्यांनीं मातुर मला आंदीच सोडलं. ”

गंगारामाकडे लक्षपूर्वक पाहून मीं विचारलें, “ बाकीचे कोण ? ”

आपल्या पांढऱ्या मिशींत बोटें घालून तो थोडा हसला, आणि म्हणाला, “ दादा, आमचं त्ये तुमच्या ध्येनांत न्हाई यायाचं ! ”

मी अधिकच गोंधळलों व त्याच्याकडे नुसतेंच पाहिलें.

“ दादा, मला यवढीच कारबारीन न्हवती ! ”

“ आणखी कुणी होतं वाटतं ? ”

आतां मात्र गंगाराम अगदींच ढेपाळला. त्याच्या आचाराविषयीं भलतीच शंका मनांत येऊन माझा चेहरा जरा बदलला. त्याच्या तें ताबडतोब ध्यानांत आलें म्हणून चटकन् सावरून तो म्हणाला, “ दादा दुसरं-तिसरं काय बीं न्हाई ! ”

" मग काय आणखी एक कुटुंब होतं ?"

" दादा, याकच का म्हनता ?"

" म्हणजे !"

" अव, मला चार बायका हुत्या !"

" काय, म्हणतां काय गंगाराम तुम्ही !"

" व्हय्, व्हय्, आमाला चार बायका व्हत्या; पन् ल्येकरू मातुर येकीला याकू, अन् येकीला याकू."

" पण गंगाराम, तुम्ही चार बायका कशासाठीं केल्या ?"

" अव, ह्ये बगा; मी साळंत नाइक, माजी पत लय; साये-बास्नी तर गंगारामाबिगर मिलिट जायाच न्हाइ. माज्या हाताखालीं चार मानसं; त्येनी नाइक म्हून सलाम करावा. माजी पत लई !"

" मग ह्यासाठीं बायका जास्त केल्यात ?"

गंगाराम हंसून म्हणाला, " अव दादा, मंग मानसं म्हनाया लागलीं, आमची पुरगी करा नाईक; आमची ल्येक करा नाईक; असं हुता हुता चार बायका झाल्या !"

" भले गंगाराम ! पण इतक्यांना पोसायचं म्हणजे तुम्हांला केवढं संकट !"

" छ्या छ्या ! आमच्या बायका काय तुमच्यावानी बसून खात्याती व्हय ? हिनं चार मशी ठिवल्या; तिनं चार ठिवल्या; कुनी गवतकाडी वगातिया; कुनी गवऱ्या लावतीया; कुनी दुद घालतीया; अंगावर कुनीच न्हाइ !"

" पण मग घरांत भांडणाचा सुकाळ झाला असेल गंगाराम ?"

" हां—जरा वाइच कळवंडत बी हुत्या; पन् आमी समद्यास्नी संबाळून नेयाचं."

" पण शेवटीं तुम्हांला कुणी राहिलं नाहीं ! असं झालं नाहीं ?"

" हां; म्हातारपनी मी यकलाच!"

" अरेरे! पण मग गंगाराम तुम्ही हे श्रम कां करतां? रोज पाटी डोक्यावर घ्यायची अन् ' डाळं मुरमुरं ' करीत फिरायचं; हें कशाला करतां? तुम्ही कांहीं कुणावर अवलंबून नाहीं!"

तो कांहींशा आवेशानें व स्वाभिमानानें म्हणाला, " छ्या, छ्या! दादा, मी कुनाच्या अंगावर न्हाइ आ; माजा मला जागा हाया; माझी पेंडशल मला हाइ; मी काय कुनाचा तुकडा फुकट खायाचा न्हवं; अवं मीच घा मानसांचा पोशिंदा; त्यो मी, काइ कुनाचा मिंदा न्हातुया का?"

" हो; मी तरी तेंच म्हणतों; मग हे कष्ट जिवाला कां देतां?"

" काय सांगावं दादा! माज्या कपाळांतच ह्ये म्हातारपनचं कष्ट लिवल्यात बगा!"

" बायका तर सगळया गेल्या; लेक खडकीला मिळविता आहे. अन् मग...?"

" अवऽ माज नातवांड कुटं सोडूं? मगा बोललूं का, की मदल्या बायकुला याक पुरगी व्हती म्हनुनशान्? ती मंचरच्या जगदाळयाकडं दिल्याली. दादा मानसं पोरींचा पैका करत्यात! पन तुमच्या पायाची आन, म्यां योक पैसा काय मागितला न्हाइ. इवाइ मानसं लइ ब्येस; पन त्या पोरीला काय ग्वाड वाटना. अवशादं क्येली, द्येवरुशी बी क्येलं; याक पोरगा तिला झाला, आन ती गाजरावानी लाल पुरगी पालीवानी पांडरीशिपट झाली!"

" अरेरे! तुमच्याबरोबर केव्हां केव्हां तो गोरटेला दिसतो तोच तुमचा नातू वाटतं?"

" हां हां, त्योच; पण माझी ल्येक त्याच्यापरास लइ नामी व्हती. तीन वर्सं गेल्या चैताला झाली, माज्या पदरांत ह्ये प्वार टाकलं आन आपन मरून गेली."

गंगारामाला हुंदका आवरेना. मलाही वाईट वाटलें.

" बरं त्येचा बा त्येला घिऊन जाईल म्हनावं तर त्यो बी गेल्या सालीं चैतांतच उलातला; आतां ह्यो पोर कुटं सोडूं ? "

" त्याच्यासाठीं हें डाळं मुरमुरं करीत फिरतां ना गंगाराम ? "

" न कराव तर काय कराव ? प्येंडसलीचं तीन रुपई शारच्या वस्तीला मला लागत्यात; पन् पोराला काइ लागतंच का न्हाइ ? ल्योक बापडा चांगला हाय; त्यो म्हनतो तुमी कष्ट करू नगा; माजा भाचा मला काय जड हाय का ? पन् आपून वळाकलं पाइज्ये दादा ! खरं का खोटं ? सूनबाई धुसपूस करती; आमचा पैका खराचत्यो म्हन्ती ! तवा उलिसं रामपाऱ्यांत आन् उलिसं सांचीपारनं हाकुंटच असा फेरी करतों. पांच सात आन्याच पैस जमा हुत्यात; त्येवडं नातवंडाचं चालत; भैऱ्या बी..."

इतक्यांत 'ओहो' करून मैदानावर मोठी प्रचंड गर्जना झाली आणि प्रेक्षकांची गर्दी झपाट्यानें फुटूं लागली. त्यासरसा मी उठलों. गंगाराम म्हणाला " बसा कीं दादा. "

माझें धोरण मला संभाळणें अवश्य होतेंच. म्हणून मी त्याला म्हटलें, " आतां मुलं भेळ घेण्यासाठीं तुमच्याकडे येतील; मी इथं असलों म्हणजे तीं बिचकतील म्हणून मी जातों " असें म्हणून मी घराकडे झटकलों.

**या**नंतर चांगला वर्षभरानें, परवां नानावटी कॉलनींतून चाललों होतों तेव्हां जातां जातां गंगाराम भेटला. एका वर्षांत त्याच्यांत पुष्कळच फरक पडला. माणूस थकूं लागलें म्हणजे झपाट्यानें थकतें. त्याला आवरशक्तीच रहात नाहीं ! गंगारामाचीं गात्रें आतां अगदीं लुलीं झालेलीं दिसलीं. एक म्हसरूं पुढें घालून तिच्या ढुंगणाला चिपाड टोचीत गंगाराम चालला होता. मला पहातांच तो थांबला;

विनय दाखविण्यासाठीं त्यानें आपले खांदे लवते केले आणि हंसत-मुखानें मला त्यानें दोन्ही हातांनीं नमस्कार केला. त्याला पाहून मलाही हर्ष झाला. मींही हास्यपूर्वक त्याला नमस्कार केला आणि विचारलें,

" काय गंगाराम, अलीकडे फेरी बंद झालेली दिसताहे ! होय ना ? "

" व्हय दादा ! आता कष्ट व्हतं न्हाइती. पावसानं बी जिकीर व्हती. पैरन भिजतिया; सडकनं बी पानी; माल बी भिजतुया; आन् मला आता कष्ट व्हत न्हाइती. "

" खरी गोष्ट गंगाराम ! आतां किती दिवस फिराल ? तुमच्या वयाला मला तर जागचं हालवायाचंसुद्धां नाहीं ! बरं पण, आता आपले बसून राहतां होय ना ? "

" हां, पन् आपलं उलीसं करतूं ? "

" आतां काय करतां ? "

" हं याक मस ठिवलिया; वैरानकाडी बगतूं ; जरा वाइच हिंडिवतूं ; भैऱ्या दूद निऊनशान घालतु; चाललया. "

" पण आतां पुरे की. "

" असं कसं म्हनता दादा ! ह्ये नातवंड पोसाया तर होवं ! ह्येचं त्वांड बगितलं मंजी मंजुळाची आटवान व्हती; मंजुळा आटावली मंजी तिची आई आटावती ! झालं—आमचं बी भरत आलं. मस घरीं बांदतु; मारुतीला जाऊनशान् घरीं येतूं ; तुकडा खातुं आन् पडवीला बसतु रामराम करीत ! पन दादा—"

इतक्यांत त्याचें तें म्हसरूं पलीकडच्या वाडभ्यांत शिरूं लागलें; तें पाहतांच 'थ्रू थ्रू' करून त्यानें एक दगड उचलून

तिच्याकडे फेकला. तो तिच्या शिंगावर काडकन् वाजला. मग त्याला सोडविण्यासाठीं मीं म्हटलें,

"गंगाराम, मी जातों आतां. मला काम आहे आतां !"

"ब ऽ रं दादा; आतां कवा भेटला तर भेटलां; ल्योक बरा हाइ का ?"

इतकें विचारून तो माझ्याकडे न बघतांच जलदीनें म्हशीच्या मागें निघून गेला ! गंगाराम फेरीवाला ! डाळं मुरमुरं ! पोहं पोहं !

# १. देवाचे खरे लाडके कोण ?

" मी पक्षी असतों तर " या नांवाची एक कविता फार वर्षांमागें मुलांना शिकविल्याचें मला आठवतें. तेव्हांपासून माणसाच्या जातीला पंख नाहींत याचें तीव्र वैषम्य मला वाटत आलें आहे. विधात्यानें ज्या अनेक चुका केल्या आहेत त्यांपैकींच ही एक आहे, कीं माणसाला पंख देण्याचें काम त्याला सुचलें नाहीं. माणूस हा विधात्याचा फार लाडका प्राणी आहे असें म्हणण्याची वहिवाट आहे. परंतु अनुभवानें तसें दिसत नाहीं. मनुष्यप्राण्याला जन्म देण्याच्या कामीं ख्रिस्ती देवाला विश्वसंस्थेंत केवढी प्रास्ताविक ढवळाढवळ करावी लागली हें आपल्याला माहीत आहे. आपल्याकडे तर चवऱ्यांयशीं लक्ष योनी हिंडाव्या तेव्हां जीवाला मानवाची कुडी प्राप्त होते ! अशी ही आमच्या विधात्याची चेंगट योजना आहे. हें धडधडीत दिसत असतांना माणसाची जात देवाची फार लाडकी आहे असें म्हणण्याचें धाडस आपण करावें याचें मोठें नवल वाटतें ! पण ही आपली कोडगी संवय फार दिवसांची आहे. आपले युरोपांतील नातेवाईक जे ज्यू ते स्वतःला परमेश्वराचे फार लाडके म्हणून समजतात. पण गेलीं हजारपंधराशें वर्षें या ज्यू लोकांच्या जीविताची जी दुर्दशा उडाली आहे ती पाहिली म्हणजे या लाडकेपणाचा अर्थ बरोबर समजतो ! न्यायमूर्ती रानडे यांनीं आपणां हिंदु लोकांनासुद्धां ' परमेश्वराच्या पसंतीची प्रजा ' असें नांव दिलें होतें, आणि जुन्या शास्त्रकारांनीं भरतखंडांत जन्मसुद्धां दुर्लभ असतो असा येथल्या प्रजेचा महिमा वर्णिलेला आहे. पण इतिहास पाहिला तर ध्यानांत येतें कीं या भरतखंडांतच जन्माला आल्यामुळें कोट्यवधि लोकांच्या जिवाची कित्येक शतकेंपर्यंत परवड चालली आहे !

तेव्हां ही लाडकेपणाची बढाई जशी कांहीं लोकांच्या बाबतींत खोटी आहे तशी माणसाच्या जातीसंबंधानेंही खोटी आहे. ती जर विधात्याची खरोखर लाडकी असती तर त्यानें तिला पंख दिले नसते का ? ती लाडकी नसल्यामुळें सृष्टिकर्त्याचें तिच्याकडे विशेष लक्ष गेलेंच नाहीं. अर्थात् तिला पंख देण्याचेंही त्याच्या हातून राहून गेलें.

या आपल्या 'लाडक्या' प्राण्याला विधात्यानें किती दुबळें ठेवलें आहे पहा ! माणसाच्या चालण्याकडे लक्ष द्या; म्हणजे हें त्याचें दुबळेपण ध्यानांत येईल. एक पाय पुढें करायचा, पाऊल खालीं टेकावयाचें; मग अवसान धरून मागला पाय उचलायचा आणि त्याचें पाऊल टेकावयाचें ! असें आळीपाळीनें करीत बसायचें. दोन पाय, पण तेसुद्धां त्याला एकदम उचलतां येत नाहींत. त्याच्या जागीं पाखरांचें पहा; तीं दुबक्या उड्या टाकीत चाललेलीं असतात. असल्या या चालण्याच्या साधनानें माणूस चालणार तरी किती ? सबंध दिवसांत दहा कोस जमीन चालून झाली म्हणजे त्याला धन्यता वाटते ! किती अल्पसंतुष्ट आहे हा माणसाचा जीव ! पण याच्या ध्यानांत येत नाहीं कीं तुझ्या या दहा कोस जमिनीचा प्रवास घोड्या-सारखा धडधडीत पशु अवघ्या दोन तासांत लीलेनें करतो, आणि ज्याला तूं पक्षी म्हणून हेटाळतोस तो तर अर्ध्या तासांतसुद्धां करतो. तरीही माणसाला स्वतःची घमेंड आहेच ! वास्तविक पहातां याला जर पंख असते तर त्यानें हा प्रवास किती जलदीनें केला असता. आणि त्याचीं कामेंही किती भरार्भर उरकलीं असतीं. पण त्याचें दुर्दैव कीं हें देणें देवानें त्याला दिलें नाहीं. विमानविद्या प्राप्त झाल्यापासून माणसाला मोठी ऐट वाटूं लागली आहे. आणि आपण पक्ष्याप्रमाणें वायुमंडळही जिंकल्याची जाणीव त्याला आतां उत्पन्न झाली आहे. पण ही ऐट मारतांना त्याला

लाज वाटावयास हवी. एका एका दमांत पांचपांशें मैल जाणें हा पराक्रम त्याला **आज** साधला आहे आणि पक्षी तर हा पराक्रम जगाच्या आरंभापासून करीत आहेत ! पक्षी व आपण यामधील हें अंतर तोडावयास माणसाला सहज दहा सहस्र वर्षांची किंमत द्यावी लागलेली आहे. ब्रह्मदेवानें आपल्याला किती मागासलेले ठेवले आहेत ! माणसाची प्रौढी काय ती पहा—कीं असले पक्षी आम्ही रोज भाजून खातों. ही प्रौढी नव्हे, ही रानटीपणाची कबुली आहे. सृष्टीची ही सपक्ष प्रजा त्याच्याहून कितीतरी श्रेष्ठ आहे. साधी मासोळी ती काय ! पण तीसुद्धां पाण्यांत वाटेल तशी वेगानें धांवत जाते. माणसाला मात्र पोहणें ही कला म्हणून शिकावी लागते आणि मासोळीसारखें पाण्याच्या पोटांतून जाण्याचा त्यानें थोडाहि हिय्या केला तर त्याला तडफडून वर यावें लागतें ! हें काय देवाच्या लाडाचें लक्षण आहे काय ?

पक्ष्यावर तर आहेच आहे, पण पशूवरसुद्धां विधात्याची मेहरनजर जास्त आहे. दोघेही त्याचे खरे लाडके आहेत. ही त्याची लाडकी प्रजा किती लवकर शहाणी होते; आणि किती जलदीनें स्वावलंबी बनते पहा. बाराबारा महिने अन् कांहीं कांहीं वेळां तर दोनदोन वर्षेंसुद्धां आमचीं पोरें जमिनीवरच लोळत असतात. तीं जागचीं उठतच नाहींत. उठून एकएक पाऊल टाकूं लागलीं म्हणजे आम्हांला केवढा आनंद होतो. पण गाईचें वासरूं पहा. चारसहा दिवस झाले नाहींत तों इकडेतिकडे बागडूं लागतें. म्हैस हें जनावर किती अर्बुज असतें ? पण तिचें तें रेडकूंसुद्धां आमच्या पोरापेक्षां जास्त चलाख असतें. या वासरांच्या आणि रेडकांच्या आयांनीं, त्यांचीं बोटें धरून, ‘ आमचा बाबू चालला, आम्हीं नाहीं पाहिला ! ’ असें म्हणत, चुचकारत; त्यांना कधीं चालावयास

शिकविलें आहे काय ? सृष्टि या पशुपक्ष्यांच्या बाबतींत धडधडीत पक्षपाती आहे. आमचीं पोरें पहा. वीसवीस, पंचवीस–पंचवीस वर्षे घरांत तुरमुंडी देऊन बसतात. निराळे व्हायची त्यांची छातीच होत नाहीं; कारण पोटाला मिळविण्याचें शहाणपणच त्यांना येत नाहीं. तीच पक्ष्यांचीं पिलें पहा. जरा डोळे उघडले कीं, आईबरोबर या फांदीवरून त्या फांदीवर अशी टुणूटुणू उडूं लागतात आणि दोनचार महिन्यांच्या आंत आपला निराळा संसार थाटतात. आईबापांना जिकीर नाहीं, त्यांना जिकीर नाहीं. मुलांच्या प्रपंचावर आईबापांचें कसलेंहि आक्रमण नाहीं. तेंच माणसांच्या पिलांचें पहा. त्यांना भारी उमेदवारी करावी लागते आणि तरीहि आपल्या श्रेष्ठपणाची माणसाची आढ्यता आहेच. पक्ष्यांचें एक वेळ असो; पण पशूंनींसुद्धां माणसा-वर ताण करावी याची लाज वाटते. पाठीवर एकाद्या लहानशा वारुळा-सारखें वशिंड बाळगणारा बैल, नाहीं तर तो विशाल–देह हत्ती, यांची थोरवी काय करावी ! त्यांच्या स्नायूंचें बळ केवढें अचाट असतें ! एका धडाक्यासरशी हे प्राणी माणसाला हेलपाटून टाकतात. सृष्टीची त्यांच्या-वर मर्जीच आहे. हे पशु कधीं तालीम करायला गेले होते काय ? यांनीं कधीं तालिमखाने किंवा व्यायाम–मंडळें काढलीं होतीं काय ? त्यांना हें बळ आपोआपच येतें. मग सृष्टि त्यांचा पक्षपात करते असें कां म्हणूं नये ? तेंच माणसांचें पहा. शक्ति वाढविण्याचे स्वतंत्र यत्न जेव्हां करावे तेव्हां त्याचें चालतें आणि इतकी यातायात करूनहि त्याला कितीशी शक्ति प्राप्त होते तें दिसतच आहे. एकाद्या बलाढ्य राजालासुद्धां हत्तीचें पोर भिंतीशीं चिरडून टाकतें. माणसाची ऐट काय ती ही कीं असले बैल अन् घोडे अन् हत्ती आम्ही गाडीला जुंपतों आणि आम्हाला हवें आहे तसें त्यांना पळवितों. पण येथें त्याच्या ध्यानांत हवें कीं रस्त्याचें अंतर झटांझट तुटत जातें तें तूं वर बसला

आहेस म्हणून नव्हे तर बैल, घोडा पळत आहेत म्हणून होय. हा वेग त्यांना सृष्टीनेंच दिला आहे. माणूस कितीही बढाई मारो. एक बरें आहे कीं आपलें कमीपण तो पुष्कळदां मोकळेपणानें व्यक्त करतो असें आपल्याला दिसून येतें. आपल्यापैकीं जर कोणी विशेष शक्तिमान् असला, ईर्षावान् असला, किंवा झडपदार असला, तर तो म्हणतो, ' हा वाघासारखा शूर आहे, हा हत्तीसारखा बलवान् आहे, हा गरुडासारखी झेप घालतो. ' माणूस जर या पशुपक्ष्यांपेक्षां खराखरा श्रेष्ठ असता तर त्यानें स्वतःला यांच्या उपमा घेतल्या असल्या काय ! यावरून माणसाची किंमत काय आहे तें आपोआप ठरतें.

आपल्या बुद्धिबळाची बढाई माणूस वाजवीपेक्षां जास्त मारतो. पक्षी तर त्याला खरोखर हंसत असतील. माणसानें विमानानें पहिलें उड्डाण केलें तेव्हां पृथ्वीवरील सर्व देशांत मोठमोठ्या सभा भरल्या आणि ज्या संशोधकांनीं ही उड्डाण-विद्या हस्तगत केली त्यांचें सर्वांनीं कौतुक केलें. खरोखर या सभांचीं वर्तमानपत्रांत आलेलीं वर्णनें पाहून डोंगराच्या पठारावर भरलेल्या गरुडसभा थट्टेनें हंसल्या असतील; आकाशाच्या पटांगणांत कवायत करीत असलेल्या कांड्याकुरकुच्यांनीं कलकलाट करून या सभावाल्यांची फजितीच केली असेल; इतकेंच काय, पण वठलेल्या पिंपळाच्या उंच शेंड्यावर बसलेल्या एकेका कावळ्यानेंसुद्धां माणसाच्या या पराक्रमाची केवळ कावकाव करून सोडली असेल. तरी माणसाला आपली प्रौढी सुटतच नाहीं. आपलें वैगुण्य त्याच्या ध्यानांत आलेलें नाहीं असें नाहीं. आपल्याला उडण्यासारखे पंख नाहींतच, पण त्या पंखांनीं पक्ष्यांचें जें इतर कांम होतें तेंही करून घ्यायला आपल्यापाशीं स्वाभाविक साधन कांहीं नाहीं, याची त्याला खंतीच वाटते. याची भरपाई करण्याचे त्याचे मार्ग तरी किती रानटी आहेत ! बापडीं मेंढरें आपापले भरगच्च

लोकरीचे डगले अंगांत घालून रानावनांतून चरत हिंडत होतीं. पण माणसानें त्यांनाच धरलें आणि त्यांच्या अंगावरचे केंस कापून आणून त्यांचे डगले त्यानें आपल्याला केले ! आणि याला त्यानें आपल्या पुस्तकांत 'संस्कृति' हें बढाईखोर नांव दिलें आहे. वास्तविक पहातां, आपली लाज लपविण्याची ही खटपट त्यानें केली. पंख नाहीं तर नाहीं, पण पंखांनीं होणारें रक्षणाचें काम करण्याची कांहीं व्यवस्था करून त्यानें आपली लाज राखली. कोठें झाडाच्या साली ओरबडून आण, कोठें कापसाचीं बोंडें उपस, कोठें किड्यांच्या अंगांतलीं जळमटें जमीव, असला उद्योग माणसाला करावा लागावा याचें वाईट वाटतें. पक्ष्यांना यांतलें कांहींच करावें लागत नाहीं. मग सृष्टीची कृपा त्यांच्यावर माणसापेक्षां जास्त आहे असें कां म्हणूं नये ? आपण हें तरी करतों म्हणून बरें आहे. कपड्यांच्या गवसणींत घातलेलीं आपलीं अंगें मूळचीं किती विद्रूप आणि कवकवीत असतात ! त्यांच्यावर केंस नांवाचें चरबट गवत उगवलेलें असतें आणि तेंही पुन्हा पुन्हा काढल्याशिवाय त्याला चैन पडत नाहीं. हीं आपलीं सौंदर्यशून्य अंगें झाकावीं व गोजिरवाणीं दिसावीं म्हणून माणसाची काय खटपट चाललेली असते ! तो वस्त्रें बनवितो आणि पक्ष्यांकडे पाहून तो या वस्त्रांना नानाप्रकारचे रंग देतो. पण सृष्टीनें पक्ष्यांना हें वैभव आपल्या हातानेंच दिलेलें असतें.

आपल्या या सपक्ष मित्रांकडे पहा. त्यांच्याकडे पाहिल्यावर ज्याच्या मनांत मत्सराची भावना उठत नाहीं तो माणूसच नव्हे. तो विहिरींत घुमणारा पारवा एक मूठभर प्राणी असतो. पण त्याचें अंग किती निर्मळ, जिल्हई दिल्यासारखें आणि तुकतुकीत असतें ! त्याच्यावर बारीकबारीक छिद्रांची कलाकुसर केलेली असते आणि त्याचा रंग तर असा कीं आकाशांतून कोरून काढलेल्या आकृती-

प्रमाणें तो दिसतो. आवाजांत जशी कसलीही खर नाहीं तसा अंगावर कसलाही बुऱ्हा नाहीं. अशा या रूपसुंदर पक्ष्यांना 'होलगड' म्हणून अवहेलणाऱ्या मानवप्राण्याच्या रसिकतेची तारीफ करावी तेवढी थोडीच होणार आहे. तो तास पक्षी पाहिलात का ? त्याच्या पंखांची शोभा तर पहा. पण त्याचा श्रीमंत मित्र तो भारद्वाज म्हणजे तर रसिकाच्या दृष्टीनें जिवंत रसविलासच आहे. याच्या पंखांत तो सोनेरी वर्ख सृष्टीनें कोणच्या लहरींत चोळला असावा बरें ? आपल्या या वैभवाची जाणीव त्याला आहे काय ? नाहीं तर तो ते आपले लखलखणारे पंख पुन्हा पुन्हा कां फडफडावत असतो ? माणसाला सोन्याचा लोभ तरी केवढा असतो ! या भारद्वाजाच्या पंखाला केवळ सोनेरी रंग असलेला दिसतो म्हणून माणसानें त्याचें दर्शन शुभकारक मानलें आहे. दरिद्री माणसा ! तुझी किंमत काय ती कळली. अरे तें सोनें नव्हे, तो सोनेरी रंग आहे. पण आपल्या एका लाडक्या प्रजेच्या पंखाला तो लावून सृष्टीनें तुझें विडंबन मांडलें आहे ! आणि तरीही ' मीच सृष्टीचा लाडका ' म्हणून शेखी मिरवितोस, तर तुला म्हणावें तरी काय ? तो पंचरंगी पोपट पाहिलास का ! आपल्या हातांशीं नाना प्रकारचे रंग ठेवून विधात्यानें याचें अंग किती चित्र-विचित्र केलें आहे पहा ! त्याच्या अंगकांतीवर तुझी दृष्टीही ठरायची नाहीं ! तुझें तें ओखटवाणें अंग पहा आणि शंभरदां धुवावीं तेव्हां एकदां स्वच्छ होणारीं तुझीं तीं वस्त्रें—म्हणजे लक्तरें पहा. या पोपटाचे पंख कुणी धुतले आहेत का ? याच्या पंखांचा रंग कधीं विटला आहे का ? त्याच्या गळपट्ट्याकडे तर लक्ष दे. त्याच्या प्रियेनें त्याच्यासाठीं हा केव्हां विणला बरें ? आणि त्याचें साहित्य तरी तिनें कोठून पैदा केलें बरें ? बघ ! सृष्टि त्यांच्यावर केवढी फिदा आहे. आपल्या या रंगसंपत्तीवर खुष होऊन हा पोपट मौजेनें शीळ

घालतो तेव्हां त्याचा चेहरा पाहाण्यासारखा असतो. तो शीळ घालतो तो तुमच्यासाठीं घालीत नाहीं. त्याला कसलें तरी स्मरण होत असलें पाहिजे. आपल्या पीतवर्ण पायांचा अभिमान बाळगणारी साळुंकी त्याला तेव्हां आठवत असावी. ती साळुंकी तरी तूं कधीं नीट पाहिली आहेस का ? तुझे ते गवई गोड ललकाऱ्या मारतात ना ? पण त्यांचा मूळ पुरुष त्या कोणापासून शिकला, तुला माहित आहे काय ? तो आपल्या ललकाऱ्या या साळुंकीपासून शिकला ! त्या साळुंकीचें सौंदर्य-वैभव पहा. तिचे गोजिरवाणे पिवळेधमक पाय, तिनें अंगावर घेतलेला चाकोलेट रंगाचा नाहीं तर अंजिरी रंगाचा शालू, तिची विडा खाल्ल्यासारखी सुरंगी जिवणी ही पाहिल्यावर तुला खास वाटेल कीं हे पक्षीच सृष्टीचे खरे लाडके आहेत. पण आपला माणसाचा गर्व हरण करणारा तो प्रचंड गरुड पाहिलास का ? आपल्या विस्तीर्ण पंखांचा फडत्कार करीत योजनेंच्या योजनें आकाशांतून झेपावत जाणाऱ्या या पक्षिराजाची थोरवी तर पहा. सृष्टीनें त्याला काय काय सामर्थ्य दिलें आहे ! खालीं येऊन त्यानें जर तुला आपल्या नखांत धरलें तर केवळ एका घटकेंत तो तुला हिमालयावर घेऊन जाईल ! त्याचे पंख पहा. सामर्थ्य व शोभा यांचा विस्मयकारक मिलाफ त्यांत झालेला आहे. तूं कधीं रानावनांतून हिंडला आहेस काय ? सृष्टीचा अत्यन्त लाडका पुत्र तुला तेथें कोठेंतरी पहावयास सांपडला असेल. तो चालूं लागला म्हणजे पदलालित्याचा मनोरम नमुना तुला दिसेल. या मयूर-पक्ष्याला बनवितांना सृष्टी फार खुषींत असली पाहिजे. त्याच्या डोक्यावर तिनें आपल्या हातानें काय सुंदर तुरा खोविला आहे. तिनें त्याच्या कानांत, प्रत्येक पदन्यासाबरोबर डुलणारे डूल घातले आहेत. तिनें

त्याच्या मानेवर व बाहूंवर हर तऱ्हेच्या रंगांचीं मिश्रणें लाविलीं आहेत. पण त्याचा पिसारा रचतांना सृष्टीनें आपलें सारें धन कोशागारांतून बाहेर काढलें असलें पाहिजे. त्याला एकदां हर्ष होऊं दे. तुला हर्ष झाला तर तूं फार म्हणजे आपलें तोंड सबंध वासशील, डोळे बारीक करशील, नाक आहे त्यापेक्षां रुंद करशील, गालाला चुण्या पाडशील, आपल्या काळ्या हिरड्या बाहेर दाखविशील, पाण्यानें डोळे तेलकट झाल्यासारखे दाखविशील, घाणेरड्या दातांचें प्रदर्शन करशील, घशांतून हिडिसफिडिस ध्वनि काढशील आणि आहेस त्यापेक्षां शतपट कुरूप दिसशील. सृष्टि तुझ्याशीं कशी वागली आहे पहा. आनंद व्यक्त करायला ती तुला कुरूप बनावयास लावते! पण मोराचें पहा, आकाशांत एकदां मेघमंडळ जमा झालें आणि त्यानें आपल्या गर्जि-ताला आरंभ केला म्हणजे या मोराला अत्यानंद होतो. त्याला आनंद होण्यालासुद्धां येवढें विशाल कारण लागतें. आणि तो झाला म्हणजे तो आपला भव्य पिसारा पसरतो! या वेळीं सौंदर्याचें सगळें विश्व उभें रहातें. सहस्र-नेत्र बनून तो पक्षी आपल्या प्रियेकडे पाहूं लागतो. सृष्टीचें देणें असें असावें.

या दृष्टीनें पहातां मला कित्येकदां वाटतें कीं आप-ल्याला जर पंख असते तर फार चांगलें झालें असतें. निरानिराळ्या रंगाचे लांब–आंखूड असे पंख आपल्याला हवे होते. शुभ्र, काळे, गुलाबी, लाल, हिरवे, पिवळे, अस्मानी, नाना प्रकारचे पंख अस-लेले पुढारी आणि अनुयायी एखाद्या सभेला आले असते म्हणजे काय बहार उडाली असती! वक्तृत्व करतांना पुढाऱ्यानें आपले पंख पसरले असते आणि आपल्या माना पंखांत रोवून श्रोत्यांनीं गंभीर-पणानें त्याचें भाषण ऐकलें असतें. कॉलेजांत शिकवितांना 'गाउन' नांवाच्या कळकट पडदाण्या अंगाभोंवतीं लोक सध्यां गुंडाळतात

त्याऐवजीं वर सांगितल्यासारखे पंख असते तर त्या शिक्षकाचा दिमाख किती वाढला असता. त्यांतच मग सृष्टीच्या मर्जीची भर पडली असती. कुणाला शुभ्र पंख, कुणाला गुलाबी पंख, कुणाला काळे पंख, कुणाला पंचरंगी पंख—असा गमतीचा देखावा दिसला असता. विद्यार्थ्यांत सौंदर्याची लयलूट झाली असती. विद्यार्थिनींच्या बाजूला तर इंद्रधनुष्याचीं बेटेंच उभीं राहिलीं असतीं. टाळ्या वाजविण्याच्या ऐवजीं या सर्वांनीं पंखाचेच फडत्कार केले असते, आणि पुन्हा पुन्हा पंख सावरून घेण्याच्या त्यांच्या लीलांनीं सर्वत्र मोहजाल पसरलें गेलें असतें. सध्यां गांवातून इकडे तिकडे फिरतांना सारा कळकटपणा दिसतो. पोषाखांत एक तऱ्हेचा राखी—गाढवी—रंग उमटलेला असतो. सर्वत्र मलिनपणा दिसतो. आपल्याला जर रंगीबेरंगी पंख असते तर जीवितांत आल्हाद पसरला असता. याहीपेक्षां सोय तर केवढी झाली असती! आपलें चालणें म्हणजे एक अत्यन्त मागासलेपणाचें लक्षणच मला वाटतें. हा एक अगदीं प्राथमिक, रानटी अवस्थेंतला चलनवलनाचा प्रकार आहे. जेवणें हा जसा एक यांत्रिक असंस्कृत प्रकार आहे तसाच हा आहे. पाणी तापवावयाच्या बंबांत तपेलीनें पाणी भरणें आणि जेवणें यांत कांहींच फरक नाहीं. माणसाचा दर्जा वाटतो तितका जर खरोखरच मोठा असेल तर अन्नग्रहणाची पद्धति सध्यांच्याहून जास्त सुबक, सफाईदार, आणि मोहक असावयास हवी होती. तें असो; पण पंख असते तर आपल्याला भराभर उड्डाणें करतां आलीं असतीं आणि कामें भराभर आवरलीं असतीं. त्या मानानें आपली प्रगति सध्यांच्यापेक्षां जास्त झाली असती. पंख नसल्यानें आपलें मोठेंच नुकसान झालें आहे; आपण कुरूप आणि मंद राहिलों आहों.

पण आतां सृष्टीच्या या चुकीची दुरुस्ती आपण खास करूं असें वाटतें. तिनें आपल्या डोक्यांत जी एक निराळीच जादू ठेविली आहे

तिच्या बळावर हें काम होण्यासारखें आहे. विमानांतून उड्डाण करणें हे पुढेंपुढें कमी होत जाईल. निदान नित्याच्या व्यवहारांत तरी विमानें कोणी वापरणार नाहीं. लहानलहान विजेच्या पेट्या आपल्या काखेंत ठेवतां येतील व नाना प्रकारचे लहान मोठे पंख आपल्या बाहूंवरून बसवितां येतील. विजेच्या शक्तीनें हे पंख सहज फडफडवितां आले म्हणजे भराभर उड्डाणें करावयास हरकत पडणार नाहीं. ज्या मानानें लांबचा किंवा जवळचा प्रवास असेल त्या मानानें विजेच्या डब्या भरून घेतल्या म्हणजे झालें. पंखांचें आकारमानसुद्धां यावरच ठरवावें लागेल. व्यापारी लोक यांचीं दुकानें काढतील. विजेच्य पेट्यांचे व लहानमोठ्या पंखांचे संच ते भाड्यानें किंवा विक्रीला ठेवतील. ज्याला जसे हवेत तसे तो घेईल. अंगांत व पायांभोंवतीं उबदार विजारी किंवा वस्त्रवेष्टणें असलीं आणि या पेट्या व हे पंख बसविले कीं चित्रांत काढलेल्या यक्ष, गंधर्व, किन्नरांप्रमाणें किंवा पऱ्यां-प्रमाणें आपल्याला हवेंतून भराभर जातां येईल. आपले गोजिरवाणे पाय या भुईला लावतो कोण ! अशी मौज होईल. अर्थात् कृत्रिमच करावयाचें तर तें हरतऱ्हेचें व रंगाचें करण्याची इच्छा होईलच होईल. मग कोणी पोपटाचे पंख घेतील, कोणी साळुंकीचे घेतील, कोणी गरुडाचे घेतील, कोणी निरनिराळ्या चित्रविचित्र मिश्रणांचे घेतील. खालीं उतरलें कीं पंखजोडी खुंटीला लावून ठेवावी, विजेची पेटी कपाटांत ठेवावी आणि इतर कामाला लागावें असा प्रकार सुरू होईल. हें घडून यावयास आतां फारसे दिवस लागणार नाहींत असें वाटतें.

खरोखर येवढें झालें म्हणजे विधात्याची चूक दुरुस्त झालीसें ठरेल आणि जीवित अत्यंत रसराशित, कान्तिमान, आल्हादप्रद, आणि गतिमान् होईल.

---

# १० एका वृद्धाश्रमाची वाताहात !

समाजाचें अवलोकन विशेष बारकाईनें करणाऱ्या एका धंदेवाल्या धनिकानें विचार कर-करून आपल्या मनाशीं एक योजना निश्चित केली. एक वृद्धाश्रम स्थापन करावा असें त्यानें आपल्या मनाशीं ठरविलें व वर्तमानपत्रांत त्यानें तशी घोषणाही केली. हा गृहस्थ नुसताच मार्मिक नव्हता; तो रसिकही होता आणि त्याची ममत्वबुद्धि सर्वांच्या जीवितांत झुळझुळत प्रवेश करी. लहान मुलें सर्वांनाच आवडतात आणि तारुण्याचा विचार, त्यांतील सूक्ष्म निशेमुळें, सर्वांनाच प्रियकर वाटतो; पण वृद्धांच्या संबंधानें अनुकूलतेनें बोलणारे फार थोडे. वार्धक्याची थट्टा करणारेच फार असतात. जणूं कांहीं त्यांना म्हातारें व्हावयाचें नसतें. सर्वांत गमतीची गोष्ट ही कीं, खुद्द म्हातारीं माणसेंच वृद्ध लोकांची थट्टा करतांना दिसतात ! "त्या थेरड्याच्या येवढें ध्यानांत येऊं नये का ?" "त्याच्या तोंडाचं बोळकं झालं आहे तरी तो असले शब्द बोलतच असतो !" असलीं वाक्यें वृद्धांच्याच तोंडून निघालेलीं ऐकलीं म्हणजे नवल वाटतें. पण समाजांत असें कांहीं कांहीं वेळां घडतें कीं, माणसें सजातीयाचाच तिरस्कार करतात. अशिक्षित स्त्रिया, गांजलेल्या सुना, टाकलेल्या बायका, आणि आपद्ग्रस्त विधवा यांच्यासंबंधानें साऱ्याच स्त्रियांना किती ममत्व वाटावें! पण बारकाईनें बघत राहा म्हणजे दिसेल कीं, मनांतून त्यांचा तिरस्कार करणाऱ्या आणि त्यांना दूर लेखणाऱ्या स्त्रिया कितीतरी सांपडतात. एक गरीब दुसऱ्या गरिबाचा, त्याच्या गरिबीबद्दलच, तिरस्कार करतो. वृद्धांचें असेंच आहे. वृद्ध वृद्धांचाच तिटकारा करतात. समाजाची अशी प्रवृत्ति असतांना मध्यमवयीन बंडोपंतांनीं वृद्धाश्रमाची कल्पना काढावी हें विशेष होतें.

पण मीं आत्तांच सांगितलें कीं, बंडोपंतांची ममत्वबुद्धि सर्वगामी होती. त्यांना वाटे कीं, कित्येक म्हाताऱ्या माणसांची समाजांत फार आबळ होते; अनेकांच्यापाशीं चांगली पुंजी असते पण घरांतल्या माणसांच्याशीं त्यांचें जमत नाहीं; बायको मेल्यामुळें कित्येक वृद्ध खिन्न होऊन गेलेले असतात, आणि त्यांची निगाही नीट राहत नाहीं; अशा लोकांना जर एखादें चांगलें ठिकाण उत्पन्न करून दिलें तर त्यांना सुख लागेल. पुष्कळांना परमार्थ–वाचनाची रुचि असते व आवश्यकताहि भासते, पण दृष्टि अधु झाल्यानें हें काम त्यांना साधत नाहीं; अर्थात् अनेकांना मिळून एक वाचक ठेवला तर सर्वांचेंच काम होईल. औषधपाण्याचेंसुद्धां असेंच असतें; दहांनीं दहा वैद्यांकडे धांवत जाणें यापेक्षां एकच वैद्य दहांना येऊन भेटण्याची व्यवस्था करणें अधिक सोयीचें होईल असें बंडोपंतांना वाटे. पुष्कळ वृद्ध लोकांना कांहीं निरनिराळ्या रुचीचें खावेंसें वाटतें, पण घरच्या गोपाळकाल्यांत तें त्यांना मिळत नाहीं; स्वतंत्र आश्रम असला म्हणजे हें सारें साधेल. अशी मनाची खात्री होऊन बंडोपंतांनीं वर्तमानपत्रांतून ‘ वृद्धाश्रमाची स्थापना ’ अशी घोषणाही केली. जाहिरातींत त्यांनीं दिलेला तपशील सांगत बसण्याची आवश्यकता नाहीं. पण ती प्रसिद्ध होतांच आपली कल्पना बरोबर आहे याचा प्रत्यय बंडोपंतांना एकदम आला.

महाराष्ट्रांतील किती तरी वृद्धांनीं ही बंडोपंतांची घोषणा पुन्हा पुन्हा वाचली. मनुष्य-योनींत न फसणारे जर कोणी असले तर ते आपण असा म्हाताऱ्या माणसांचा नेहमींचा समज असतो. त्यांनीं बंडोपंतांची योजना वाचली; पुन्हां वाचली; आणखी एकदां वाचली; आणि त्यांना ती मनापासून आवडली. पुराणश्रवणाला गेले असतांना, बँकेंतून व्याज आणावयास जात असतांना, मंडईतून भाजी

आणतांना, राजकारणाच्या सभेंतील मुद्धां पुढच्या खुर्च्या आधींच हस्तगत करून बसले असतांना, अंगावरील कपड्याची चांगली जेरबंदी करून पहांटेच्या वेळीं फिरावयास गेले असतांना, आणि आपल्यापैकीं कोणाच्या तरी अंगणांत संध्याकाळच्या वेळीं बसून राजकीय पुढाऱ्यांच्या शहाणपणाचें मोजमाप घेत असतांना, अनेक ठिकाणच्या अनेक वृद्ध सुखवस्तूंनीं या जाहिरातीची माहिती एक-मेकांना विसरतेपणीं पुन्हां पुन्हां दिली व ती त्यांनींहि ऐकली; त्यांनीं तिची चर्चा केली; त्यांनीं शंका काढल्या; निरसनें केलीं; बंडोपंतांना यांत काय लभ्यांश याचेंहि ऑडिट केलें; हवामानाची माहिती काढली; खर्चवेंचाचे अंदाज घेतले; हें सगळें त्यांनीं अनेकदां केलें आणि त्यांना खरोखरच असें वाटूं लागलें कीं, या आश्रमांत आपण जावें. अर्थात् ज्यांच्यापाशीं चांगली पुंजी होती, किंवा ज्यांना रगड पेणसलें होतीं, किंवा ज्यांना पेढीवरून पैसा येत असे, किंवा ज्याना शेतावरचे खंड येत, किंवा ज्यांना संस्थानांतून तनखे येत असत त्यांनाच हें शक्य होतें. बाकीच्या वृद्धांना ही सोय कितीहि सोयस्कर वाटली तरी त्यांना तिचा कांहीं उपयोग नव्हता. ज्यांना शक्य होतें त्यांनीं मात्र बंडोपंतांशीं पत्रव्यवहार चालू केला.

बंडोपंतांचा आश्रम तर सुरेख थाटला. पहिल्या महिन्यांत सुमारें साठ वृद्धांची सोय त्यांना करावी लागली. आश्रमाची जागा गांवापासून दूर असलेल्या एका लहानशा टेकडीवर होती. वर जाण्याचा रस्ता अगदीं साधा असून चढ-उताराची कसलीही बाधा न होईल असा केलेला होता. कोणा तरी एका पारशाचा तो बंगला होता. तो त्यानें ओसाड कां टाकला होता कोणास ठाऊक; पण बंडोपंतांनीं तो स्वस्तांत मिळविला आणि अवश्य ती डागडुजी करून त्यांनीं तो आश्रमाला सोयीचा बनविला. बाहेर बागबगीचा, पाण्याची उत्तम

सोय, हवा खात बसावयास वाटेल तितकीं ठिकाणें, वाचनाची सोय, वाचकांची सोय, ठराविक वेळीं गायनाची सोय, बातमीची सोय, टपालाची सोय, दार बंद केलें कीं आपले आपण स्वतंत्र ही सोय— बंडोपंतांनीं सर्व सोयींनीं हें ठिकाण अगदीं सुसज्ज करून टाकलें होतें. एक डॉक्टर व एक वैद्य प्रतिदिवशीं सकाळीं यावयाचे, प्रत्येक खोलींत जाऊन थोडा वेळ विचारपूस करून जावयाचे. वृद्ध खुष, बंडोपंत खुष. आपण एक नवी कल्पना काढली आणि ती इतकी यशस्वी ठरली या जाणिवेनें बंडोपंतांना खरोखरच धन्यता वाटूं लागली.

आज वृद्धाश्रमाच्या बंगल्यावर जिकडे तिकडे उल्हास पसरलेला होता. एकंदर साठ लोकांनीं नांवें घातलीं होतीं आणि विशेष गोष्ट ही कीं, साठच्या साठ मेंबर्स पहिल्या दिवशीं उपस्थित होते. बंडोपंतहि खुषींत होते. बंगल्यांतल्या मधल्या विस्तृत दालनांत छानदार बैठक घातलेली होती. रुजामे पसरलेले होते. आणि तक्क्यांची फरड लावलेली होती. आपापल्या खोल्यांतून झाडून सर्व मंडळी बैठकींत येऊन दाखल झाली. न जाणो आपण कदा-चित् कमी दिसूं या भयानें जो तो मोठा दिमाखदार पोषाख करून आला होता. कोणालाच कांहीं कमी नव्हतें. म्हणून तर महिना पाऊणशें रुपये देण्याचें पतकरून हे वृद्ध येथें आले होते. परस्परां-कडे पाहून अनेकांनीं एकमेकांना नमस्कार केले. हास्यविनोद झाले. "आम्हांला नाहीं वाटलं तुम्ही याल म्हणून!" असे शेरे एकमेकांवर अनेकांनीं मारले. अपरिचितांच्या ओळखी करून देण्याचें काम ओळखीच्या माणसांनीं हौसेनें केलें. उभ्या उभ्याच इकडच्या तिकडच्या गोष्टी चालूं झाल्या. बंडोपंतांची नवी कल्पना सर्वांनाच मोठी आवडली होती. जो तो त्यांची तारीफ करीत

होता. बंडोपंत त्यांच्या घोळक्यांतून इकडून तिकडे, तिकडून इकडे करीत हास्यवदनानें ती तारीफ ऐकत होते.

"खोल्याही चांगल्या आहेत."

"उजेड, हवा भरपूर बरं!"

"अन्, पुन्हा प्रशस्त!"

"त्या पारशानं येवढा बंगला मोकळा कां टाकला न कळे?"

"बंडोपंतांनीं पार्टिशन्स वगैरे घातलेलीं आहेत."

"हो, हो; तें हवंच होतं करायला."

"राममंदिर पाहिलंत का काय सुबक केलं आहे तें!"

"हो हो बागेंतल्या पुष्करिणी तरी किती सुंदर आहेत!"

"आमच्या रामभाऊंना म्हणावं खा आतां हवा वाटेल तितकी!!"

"व्यासपीठाची ही योजना दिसती आहे! वाः छान!!"

"नुसता पैसा काढायला नाहीं हा निघाला गृहस्थ!"

"आचारी अस्सल पुण्याचे बरं!"

"नानाबोवांना म्हणावं आतां खा आळवाची भाजी वाटेल तितकी."

अशा तऱ्हेचे संवाद, थट्टामस्कऱ्या चालू होत्या; इतक्यांत बाहेरच्या कमानींत घंटा झाली. "चला बसा."

"वा त्याची ही घंटा वाटतं?" असें म्हणून मंडळी भराभर तक्याला टेकून बसली. ताबडतोब सर्वांच्या पुढें चहा, कॉफी, कोको, दूध, फळें जें हवें तें भराभर दाखल झालें. मागोमाग लवंगा, वेलदोडा, सुपारी इत्यादींचीं तबकें आलीं. सर्व मंडळी संतुष्ट झाली. बंडोपंत उभेच राहिलेले होते. त्यांनीं हात जोडले, ते म्हणाले, "माझ्याकडून सर्व कांहीं नीट करतों. पण कांहीं कमी पडलं तर सांगावं,

माझ्याकडून करून घ्यावं, मी लहान आहें, आपण सर्व वडील आहां, मला सांगितल्याचा राग नाहीं."

"शाबास !"

"माझे वडील आपल्या या मेळांत असते तर मला काय आनंद वाटला असता !"

"अरेरे !"

मंडळी गहिंवरली. हा छोटासा समारंभ संपला. वृद्ध आपापल्या खोल्यांवर गेले.

प्रत्येक खोलींतील व्यवस्था नमुनेदार होती. कांहींही करावयाचें म्हणून राहिलें नव्हतें. कित्येक आडगांवच्या लोकांना तर इतके सोपस्कार अन् इतकीं व्यवधानें नकोशींच होतीं ! जिकडे तिकडे स्वच्छता, टापटीप हीं राखण्याची शिकस्त नोकर लोक करीत. बंडोपंतांचीही अधूनमधून एकादी फेरी असेच. पहांटेची घंटा होती खरी, पण ती ज्याच्या त्याच्या बिछान्याशीं बेतानें वाजावयाची व्यवस्था होती; इतर कोणाला तिचा उपद्रव नसावयाचा. शरीर-शुद्धि, मुखमार्जन, नामस्मरण, वाटल्यास तेव्हांच्या तेव्हां स्नान, मंदिरांत पूजा, एक तास अमृतानुभव, दहापासून जेवणाची सोय, वामकुक्षी, सामुदायिक करमणुकीचीं साधनें, वाचनालय, वर्तमानपत्रें, चहापान, वाटल्यास फराळ, फलाहार, वनविहार, उपवनांत प्रशस्त बैठक, संध्याकाळचा वेदघोष, भोजन, तांबूलभक्षण, तपकीर, तमाखू, धूम्रपान ज्याच्या त्याच्या खोलींत, केव्हां गाणें बजावणें, केव्हां कीर्तन, केव्हां भजन, झोंप असा नित्याचा कार्यक्रम चालू असे. टपालाची उत्तम सोय केलेली होती. एकंदरीनें पाहतां सारी मंडळी खुष झालेली होती. पैसा असून सुख नाहीं; कारण नसतां भोंवतीं माणसांची गर्दी, याचें हें कर, त्याचें तें कर, नित्य

उठून तोंडाची टकळी वाजवावी तेव्हां काम व्हायचं, तें घालून पाडून बोलणंही नको अन् कांहींच नको, अष्टौप्रहर पोरांची किरकिर, आमचं खायचं अन् आमच्यावरच कुरघोडी ! आतां म्हणावं पाहा काय काय जमतं तें !—अशा अनेक बारीक आवाजांतल्या मिट• लेल्या तक्रारी या वृद्धांच्या तोंडून बाहेर पडत होत्या. पण आतां ते सारे सुखी झाले होते. बंडोपंतांनीं वृद्धाश्रम काढला होता आणि हे सारे वृद्ध समाधान पावले होते. पलीकडून धांवणाऱ्या आगगाडींतले लोक या बंगल्याच्या झगझगाटाकडे संध्याकाळच्या वेळीं मोठ्या कौतुकानें पाहात आणि त्यांचीं मुलें "वृ-द्धा-श्र-म" हीं पाटीवरील अक्षरें प्रत्येक वेळीं मोठ्यानें वाचीत.

*    *    *

दिवसामागें दिवस जाऊं लागले. आनंदाचें भांडें भरलें होतें. कांहीं दिवस तें शांत राहिलें होतें. आतां तें डुचमळण्याचें उरलें होतें. आश्रमांतील जीवनक्रमाचा दोरीबंदपणा हळूहळू सर्वांच्याच प्रत्ययाला येऊं लागला; प्रत्ययाला येतां येतां तो जाणवूं लागला; होतां होतां तो तापदायक बनूं लागला. ही नसती ब्याद आहेसें अत्रस्थांना वाटूं लागलें.

व्यवस्था, टापटीप, व वक्तशीरपणा हे गुण चांगले खरे; पण त्यांच्या ताब्यांत जाणें माणसाला नको असतें. त्यांचा सासुरवास नको असतो. जिथें तिथें व्यवस्था म्हणजे काय ? उठल्या बसल्या टापटीप कसली ? एकादें काम वेळेवर न झालें म्हणून काय झालें ? असा प्रश्न प्रत्येकाच्या मनांत येतो. माणसाला स्वतःची मर्जी म्हणून कांहीं आहेच कीं नाहीं ? घड्याळाप्रमाणें आतां अमुक करावयास हवें, पण मनाला कांहीं तें भावत नाहीं. तर मग आपण काय म्हणून तें करावयाचें ? कां घड्याळ सांगतें म्हणून

करावयाचें? पुष्कळदां आळसानें जांभया देत बसण्यांतच माणसाला सुख वाटतें! सारें सुखासाठींच करायचें असतें, तर हेंहि सुखच असतें! घरांतील माणसें पुन्हा पुन्हा 'उठा' म्हणत आहेत; आपण 'होय होय' करीत आहों; यांतही कांहीं विशेष मौज आहे! मुलांना तर या दोरीबंदपणाचा फारच उपद्रव होतो. तसाच म्हाताऱ्या माणसांनाहि होतो. आणि त्यांतून लोकांचें ऐकायची त्यांची संवय अगदींच लोपलेली असल्यामुळें ते या सासुरवासाला कंटाळतात, इतकेंच नव्हे तर त्यानें ते संतापतातसुद्धां. वृद्धाश्रमाची पहिली नवती मोठी खरपूस वाटली. पण हळूहळू तेथील शिस्तीचा कांच अनेक वृद्धांना मोठा जाचक वाटूं लागला. "म्हणे घंटा झाली! झाली असेल! आतां पहांटे कोठें डोळा लागतो आहे तों यांची घंटा झाली म्हणे! रात्रीं घंटा वाजविलीत म्हणून काय झोंप येते असें यांना वाटतं कीं काय? पहांटे पुन्हां वाजविलीत म्हणजे तीं गेली पाहिजे असं ठरलं आहे कीं काय?" "म्हणे साडे सहा ते सात शरीरशुद्धी! अन् होत नसलं तर? तें काय घंटेवर आहे काय?" "एकाद्या वेळीं भूक लागलेली नसते. मग काय तुमची वेळ झाली म्हणून पंगतीला बसायचं कीं काय? घरीं हा जाच नाहीं! रागावतात, आदळतात, आपटतात पण हवं तेव्हां ताजं करून घालतात. पण इथं जरा उशीर झाला अन् दीड वाजला कीं ते रावसाहेब 'सदोबा' खांद्यावर पंचा टाकून स्वयंपाकघरांतून बाहेर पडलेच. मग तुम्ही खा शिळवड! यासाठीं पाऊणशें रुपये देतों काय?" असे संवाद वृद्ध मंडळींत हळूहळू चालू झाले. बंडोपंतांच्या कानांवरही ते केव्हां केव्हां पडत; पण प्रत्येकाची प्रत्येक वेळची मर्जी राखणें आणि मिजास चालविणें आपल्याला अशक्य आहे, हें बंडोपंत जाणून होते; आणि त्यांना अशक्य आहे हें तक्रारखोर वृद्धही जाणून होते.

बंडोपंतांनीं आचारी, वाढपी, व नोकर-चाकर यांना सक्त बजावून ठेवलें होतें कीं कोणी मेंबरानं चालढकल केली, शिस्त मोडली, कोणी खेंसकला, अपशब्द बोलला, कोणी तेंच तेंच काम पुन्हां पुन्हां सांगितलं, बोलावण्याची घंटा फार वेळां वाजविली तरी प्रत्युत्तर करायचं नाहीं, दुरुत्तर तर नाहींच नाहीं, हंसतमुखानं होय म्हणायचं. सेवकवर्ग बापडा सेवकवर्गच होता. कोणी कांहीं म्हणाले तरी सौम्यपणानें उत्तर करावें आणि बंडोपंतांची मर्जी संपादावी हें त्यांचें कामच होतें. याप्रमाणें दिवसांमागें दिवस चालले होते.

* * *

एकदां बंडोपंत आपल्या कामांत मग्न असतांना खिडकीच्या खालीं कोणी तरी दोघे-तिघे रात्रीं अकराच्या सुमाराला एकमेकांत कांहीं कुजबुजतांना त्यांनीं ऐकलें. जागचे उठून ते तावदानाच्या भुऱ्या दाराआड उभे राहिले आणि ऐकूं लागले:—

जंगल:—न्यानू, आपनास्नी ह्ये काम नगं. तूं म्हंगालास कीं, काम लइ ब्येस, तवा म्यां घरचं काम सोल्डं आन् हातं आलुं. पन् न्यान्या, ह्ये काम लइ कसनुसं.

ज्ञानू:—अरं व्हय, अमास्नीबी नगं. म्यां तरी काय पायलं व्हतं काय ? या संकऱ्यानं सांगितलं तवा म्यां तुला सांगितलं.

जंगल:—व्हय रं संकऱ्या ! गाडीच्या, त्वां तरी पायलं हुतं का ?

शंकर:—अरं, न्हाय रं ! काय तिची भनी युकत्यात् आन्—

ज्ञानू:—वकत्यात् , अन् दरवक्तीं म्हनूत्यात् ' ए थुक्नूशान् आन् ' आतां बग थुशीलां तरी किल्यान् ?

जंगल:—अर, त्यो वइला म्हातारा ?

शंकर:—त्यो शेलाटा ऊच ?

जंगल:—हां, हां, त्यो थोबाडांतन समदं दात काडल्यो !

शं. :—समदं दात काडत्यो ? ह्ये आपलं दात ?

जं. :—व्हय व्हय, ह्ये दात ! आनू मन्तो " थुऊनूशानू आनू " आतां मातुर कार झाला ! काय संकूऱ्या ?

शं. :—अनू त्यो कुबडा ? त्येच्या पंजीला अशी थानू मारतीया ! त्ये थुनं बी नग आनू ही चाकरी बी नग अस हुतया ! आनू ग्वाड लागत न्हाइ पग ! आनू त्येका, भाइर पल्डा मंजी कुपीतंन कायनु काडतु आनू कांबुरनास्नी लावतु. मंग मातुर जकडं तकडं घमघम करतया !

जंगलः—पनू, गड्या संभदी थानू पग अवशी ! हातांतनीं पांडरीं थडपीं घेत्यात, आनू येळतिंदां त्यांतच नाकं शिकारत्यात, आनू गुंडाळून ठिवूनशानू देत्यात आनू मंत्यात लेका नीट कां थुइत न्हाइस र ! आतां आमी कां परीट म्हनावं कां काइ म्हनावं ? देवाच्यानू आनू ग्वाड लागत न्हाइ पग.

शं. :—मालकास्नी गाटूनशानी एकदां सांगाव, न्हाय का ?

ज्ञा. :—हां, पनू त्यो तरी काय करनार र ! ह्ये पैसे देत्यात आनू चाकरी करा मंत्यात !

अकराचा ठोका पडला आणि नोकर माणसें तंबाकूच्या फक्या मारून निघून गेलीं. बंडोपंतही एक घुटका गिळून आपल्या खुर्चीवर जाऊन बसले.

* * *

बंडोपंत असेच एकदां कचेरींत असतांना हरिहरपंत त्यांच्याकडे आले. या बसा झाल्यावर हरिहरपंतांनीं वांबाळ पडल्याचें वर्तमान बंडोपंतास सांगितलें. जांभई देऊन, चुटक्या वाजविल्यानंतर, आज 'भ्रष्पतवारच' ना म्हणून त्यांना विचारलें. बंडोपंतांना बसल्या बसल्या नसें काढण्याची संवय होती. हरिहर-

पंताकडे न बघतांच ते म्हणाले,

" बरं ! आणखी काय विशेष ? "

पण हें होईपर्यंत अर्धा तास गेला होता.

हरिहरपंत म्हणाले, " अशासाठीं आलों होतों कीं, तुम्हांला एक विचारावें ! आमच्या शेजारच्या खोलींत ते एक नवे गृहस्थ आपण आणून ठेवले आहेत ना त्यांचा मला फारच उपसर्ग होतो. "

बंडोपंत म्हणाले, " अहो ! तो तर फार गरीब माणूस ! कुणाच्या डोळ्यांत घातला तरी खुपायचा नाहीं, अन् तुम्ही म्हणतां तो फार उपसर्ग देतो ! "

" तुमच्या ध्यानांत नाहीं आलं बंडोपंत ! " हरिहरपंत उद्गारले,

" उपसर्ग म्हणजे असा कीं, त्यांना कफ झाला आहे असें दिसतें. मी इकडं चहा घेऊं लागलों कीं त्यांना तिकडं उबळ येते. आणि त्यांच्या घशांत तो कफ गडगडूं लागला कीं मला इकडे चहा घेणें नकोसें वाटूं लागतें. मी तरी त्याला काय करूं? मेहरबानी करून या म्हाताऱ्याला तुम्ही दुसरीकडच्या एखाद्या खोलींत नेऊन घाला! "

" वाः हरिहरपंत मी तरी याला काय करूं ? त्यांना कुठेंही ठेवलें तरी शेजारचा माणूस ही तक्रार करणारच ! "

हरिहरपंतांनीं यावर इलाज सुचविला. ते म्हणाले,

" त्या जिन्याच्या शेजारीं दोन खोल्या आहेत; त्यांतल्या एकींत याला ठेवा, कारण त्या दुसऱ्या खोलींतला तो उंचेला म्हातारा आहे ना ! तो बहिरा आहे ! "

बंडोपंत मनापासून हसूं लागले.

हरिहरपंत म्हणाले, " तुम्हीच विचार करून पाहा ! मला तो चहा नकोसा होतो. शिवाय एकदां त्या गोष्टीकडे लक्ष द्यायचं

असं ठरल्यासारखं झालं म्हणजे तिकडं किती जरी दुर्लक्ष करायचं म्हटलं तरी जमत नाहीं !"

बंडोपंत जरा बेटचेपे झाले आहेत हें पाहतांच हरिहरपंतांनीं आपला मुद्दा जास्तच दाबीत नेला. शेवटीं बंडोपंतांनीं कांहीं ना कांहीं सबब सांगून त्या म्हाताऱ्याला त्यांच्या शेजारांतून खरोखरच काढलें व त्या बहिऱ्याच्या शेजारीं नेऊन घातलें.

एकंदरीनें बंडोपंतांना मोठी काळजी उत्पन्न झाली. आपली ही कल्पना यशस्वी झाली असें वाटत होतें पण तें अनुभवानें खरें ठरत नाहीं असें त्यांना दिसूं लागलें. नोकर लोकांत कुरकुर सुरू झाली होती; आणि ती वाढत चालली होती. आतां कोणीही माणूस खोलींत आला तरी तो कांहींतरी तक्रार घेऊनच आला असेल असें त्यांना वाटूं लागलें. तथापि आरंभलेलें काम उतावीळ-पणानें विसकटून टाकणें बरें नव्हे असें त्यांनीं ठरविलें. काय काय घडत जातें तें तर पाहूं असें म्हणून ते नित्यक्रमाला लागले.

* * *

आणखी पंधरावीस दिवस गेले आणि दार किलकिलें करून, बहिरोपंत बंडोपंताच्या खोलींत आले. बराच वेळ बसल्यावर बंडोपंत म्हणाले " काका ! कां आलां होता ? एरवीच ना ? "

" हां एरवीच; एरवीच म्हणजे तसं थोडं काम होतं. "

" मग सांगा ना काय तें ! "

" मी आपला थोडा भाबडा आहें, पण बोलतोंच. हें बघा ! बंडोपंत, मला इथं जास्त थकल्यासारखं वाटूं लागलं आहे. "

" म्हणजे ? अहो इथं तर हवा चांगली ! पाणी काय ? अन्न काय ? काळजी नाहीं. "

" खरं, हें सारं खरं; पण सकाळीं, संध्याकाळीं, देवळांतून आम्ही सगळेजण परत जाऊं लागलों म्हणजे मला जास्त थकल्या-सारखं वाटतं. एक रामसीता—लक्ष्मणांच्या त्या सुंदर मूर्तीकडं तरी पाहावं, कोणी कांहीं म्हणणारा आला असला तर त्याच्याकडे पाहावं, नाहींतर...नाहींतर तुमच्याकडे तरी पाहावं असं मला वाटतं. बाकीच्या सभेकडे पहाणं नकोसं वाटतं. त्यानं मी जास्तच थकतों."

" हें थकण्याचं नवीनच कारण तुम्हीं सांगितलंत ! "

" अहो, विजेचा दिवा मंद झाला म्हणजे जशी उदासीनता येते तशी या लोकांच्या तोंडाकडे पाहिल्यानं मला येते. याला काय करावं ? हे सारे लोक कुणाचा तरी निरोप घेत आहेत असं मला सारखं वाटत असतं. हे हसूं लागले तरी त्यांना तो ठसका लागल्याबरोबर अन् त्यांनीं तीं तस्तं उचलल्याबरोबर मला वाटतं कीं, ह्यांनीं हसूं नये. यांच्या हसण्यानें भलतेंच कांहीं तरी आठवतें. किती कसदार सुग्रास अन्न ! पण एक एक घांस हे पन्नास वेळां घोळतात. हें पाहिलं म्हणजे मला थिजल्यासारखं होतं. यांना तुम्ही साबण देतां; पण अहो, जिथं त्वचाच सुरकुतूं लागली आणि तजेला गमावूं लागली तिथं त्या फेसानं काय होणार ! न झाडलेलीं धूत वस्त्रें वाळत घातलीं म्हणजे तीं पाहून जसं वाईट वाटतं तसं यांच्या अंगाकडे पाहून मला वाटतं. यानं मी जास्तच लवकर थकेन."

" काका ! माझंही मग असंच होईल का ? "

" यांत काय संशय ! बंडोपंत तुम्ही या वार्धक्याच्या सावटींत राहूं नका. तुम्ही थकाल ! वेड्याच्या इस्पितळांतला नोकर जसा वेडा बनूं लागतो तसे तुम्ही या जरेच्या जन्तुवर्षावांत थकूं लागाल."

" बंडोपंत, तुम्हांला वाटत असेल पण माझा अंदाज असा आहे कीं, ही जमा झालेली मंडळी येथें फार दिवस राहावयाची नाहींत. मला तर ती नकोशीं झाली आहेतच. पण ती एकमेकांला हळूहळू नकोशी वाटूं लागतील. हे एकमेकांकडे पाहावयास कंटाळणार नाहींत का? उसना उल्हास, कृत्रिम आनंद, आणि बेगडी खुशाली येथें पसरली आहे. आणि सर्वांचें सर्वांना हें माहित आहे. हळूहळू या तुमच्या वृद्धाश्रमाचें इस्पितळ बनेल. सकाळच्या सूर्यप्रकाशानें आणि तुमच्या बिजलीच्या झगझगाटानें येथें उजेड पसरतो. पण ज्यांच्या मनावर निरुत्साहाचें तिमिर पसरूं लागलें त्यांना या उजेडानें काय होणार? यांच्या मनाला कोळी धरला आहे ! हा झाडावयाचा इलाज म्हणजे या सर्वांना एकत्र आणणें हा नव्हे ! यांना एकमेकांपासून दूर करावें आणि निराळ्या संगतींत ठेवावें हा होय. बंडोपंत तुम्हांला नवल वाटेल, पण हे लोक मनांतून सर्द झालेले असतील. मी तर झालों आहें ! काय त्यांचीं ध्यानें ! काय त्यांचीं रूपडीं ! यांना एकमेकांचीच भीति वाटूं लागेल ! अन् मला वाईट वाटतं बंडोपंत, तुमच्यासारखा तरणा, हंसतमुख, रसरशित माणूस अकालीं वृद्ध दिसूं लागेल ! "—

ओलसर डोळे होऊन बाहिरोपंत खोलींतून जलदीनें बाहेर पडले. बंडोपंत सुन्न होऊन खिडकींतून बाहेर पहात उभे राहिले.

* * *

एके दिवशीं बंडोपंत आपल्या कचेरींत स्वस्थ बसून खिडकींतून दिसणाऱ्या आभाळाकडे पहात होते तों सदोबा आंत आला. हाताखालच्या माणसांना कामाला लावून सदोबांची स्वारी थोडी फणफणतच इकडे आली होती. सदोबाची चर्या पाहून बंडोपंत म्हणाले " काय ! कांहीं विशेष आहे कीं काय ? "

दाढवणांतील तंबाकूचा गुळणा दाबून धरून सदोबा म्हणाला, "काकासाहेब! मला तुम्ही रागें भराल पण या मेंबरांनीं फळ्यावरच्या कागदांत काय काय लिहिलें आहे तें पहा! हें सारें आम्ही करावें तरी केव्हां?" आणि त्यानें हातांतील कागद बंडोपंतांच्या टेबलावर सारला. बंडोपंतांनीं अशी एक व्यवस्था केली होती कीं, रोज सकाळीं प्रत्येक मेंबरानें आपल्याला काय हवें असेल तें फळ्यावरील कागदावर लिहावयाचें. सदोबानें अनेक दिवसपर्यंत वृद्ध लोकांच्या या नोंदीचा परामर्ष घेतला; पण अलीकडे अलीकडे तें त्याला अनावर होऊं लागलें होतें. बंडोपंतांच्या टेबलावर पडलेल्या कागदावरच्या नोंदी पहाण्यासारख्या होत्या:—

१ सुंठीचें चाटण हवें आहे, त्यांत गूळ जास्त घालावा— खोली ३, ता. क. चाटणाला तूप साजूक असावें.

२ जेवल्याबरोबर पोटिस हवें आहे. खो. ५ ता. क. रात्रींच्या जेवणानंतरही हवें आहे.

३ पांढऱ्या वसूची मुळी उगाळून हवी, शिंपल्यांत दोन तोळे तरी गंध हवें— खोली नं. १५

४ घसा बसला आहे, निजण्यापूर्वी कढत दूध— हळद घसा शेकत शेकत पिईन म्हणतों—खोली २७

५ घशाला बांधायला कढत सांजा हवा. खोली नं. ३७

बंडोपंतः—काय हो सदोबा! ३७ व्या खोलींत कोण राहतो हो?

सदोबाः—आपले ते नानाबोवा—!

बंडोपंतः—हां: हां: बरं पुढें!

६ बिब्याच्या काढ्याचें आणखी एक सातरें घेणार आहें. खो. नं. ४३.

७ इसबाला बांधायला तुरीची डाळ वाटून हवी. खोली नं. ९

बंडोपंतः—अहो, ही यादी भली मोठी आहे कीं !

सदोबाः—तेंच ना! काकासाहेब, हें माझ्याच्यानें कसें जमेल! हा वृद्धाश्रम आहे का हें इस्पितळ आहे? हें पाहा, हें औषधपाण्याचं झालं पण ही दुसरी यादी पाहा :

सदोबानें दुसरी यादी टेबलावर ठेवली. बंडोपंत वाचूं लागले:

१ तोंडाला चव नाहीं : थोडं घिरडं टाकावं. खो. नं. १०

२ एरंडेल सोडून तुरीच्या डाळीच्या पिठाचें घिरडें टाकावें. खो. १४

३ तोंड आलें आहे: मला पदार्थ आळणी काढून ठेवा. खो. नं. ३

४ पदार्थ आळणी होतात: तोंडाला चव नसते: थोडें तिखट जास्त टाकावें. खोली नं. २१

५ बटाट्यांच्या फोडींचा लगदा होतो: त्यांत कवळी आवळते: इतकें शिजवूं नये. खो. २७

६ भाजीच्या फोडी टचटचीत राहतात : जास्त शिजवाव्या. खोली नं. २८

बंडोपंतः—अरे राम, राम.

सदोबाः—तेंच ना काकासाहेब. पण अजून पुढें बघा.

७ पोळी थोडी जाड मऊ करा : कुसकरतां आली पाहिजे. खो. ३९

८ पोळी पातळ करीत जा. खो. ४०

सदोबाः—आपल्या बापाच्या हातानं हें काम निभायचं नाहीं. बरं, बोलावं तर जो तो खेकसतो कीं, काय फुकट करतां काय! आम्ही चव्वल मोजतों ते काय फुकट मोजतों काय! अरे

नोकऱ्या करतां ना ? आम्हीं कशा केल्या असतील ? साहेबाला खुष ठेवणं सोपं नव्हतं बाबा ! अरे ही नोकरी आहे !

बंडोपंतः—बरं पाहतों : जा तुम्ही आतां.

* * *

आतांपर्यंत बंडोपंतांना अशीं, फार थोडीं पत्रें येत. आश्रमांत राहाणाऱ्यां वृद्धांचींच बहुतेक सारीं असत. पण अलीकडे अलीकडे असें होऊं लागलें कीं, वृद्धांच्या पत्रांची संख्या कमी होऊं लागली आणि बंडोपंतांच्या नांवावर येणारांची संख्या वाढत चालली. आश्रमांतून घरीं, मित्रांकडे, यात्रेला, देवदर्शनाला, समारंभाला, नैमित्तिकाला जाणारे जास्त जास्त होऊं लागले; व गेलेले लोक परत येण्याला वेळ लावूं लावले. आपण कां गुंतून पडलों आहों याचीं कारणें कथन करण्यासाठीं पत्रें लिहिण्याचा क्रम त्यांनीं चालू केला. या पत्रांची आवक बंडोपंतांना मोठी उद्वेगकारक होऊं लागली. हे म्हातारे परत येतात कीं नाहीं अशी शंका त्यांना वाटूं लागली. आश्रमाचें आसन डळमळूं लागल्याचा भास त्यांना वरचेवर होऊं लागला आवक पत्रांतील कांहीं पत्रें पहाः—

१ "श्री. बंडोपंत यांस सा. न. वि. वि. आम्ही इकडे सुखरूप आहों. आश्रमांत येत्या एकादशीच्या सुमारास येईन म्हणत होतों; परंतु आमचा नातू चि. बग्या याची मुंज ठरली असल्यामुळें मला येथेंच राहाणें भाग आहे. मुंजीनंतर तिकडे येईन. पण चि. माधवराव यांच्या धाकट्या मुलीचें लग्न ठरत आहे. जमल्यास वैशाखानंतर तेंही उरकून घेऊं व मगच तिकडे येऊं म्हणतों."

बंडोपंतः—अन् तोंवर आम्ही काय करायचं ?

"श्री. नानाबुवा, दिगंबरपंत, यांना नमस्कार."

बं.—खरं आहे ! पण हे तुमचे नानाबुवा अन् दिगंबरपंत तुमच्यासारखेच पळाले आहेत ना !

२ श्री. बंडोपंत यांस सा. न. वि. वि. इकडे आल्यापासून घसा बरा आहे. रथसप्तमीलाच परत येणार होतों पण जेबुन्निसाच्या तालमी चालू आहेत. तें काम अर्धवट टाकतां येत नाहीं. जेबुन्निसाचा कंठ म्हणजे कोकिळेचा. तान म्हणजे भिंगरी. गंडा बांधला आहे. एखाद्या तांबूसगुलाबी सुरईच्या पोटांतून जसा आवाज यावा तशी तिची तान येते; अन् तानेच्या शेवटीं शेवटीं तिचा डोळा किंचित् तिरपा झाला म्हणजे बंडोपंत, खरोखर ब्रह्म आठवतें. मैफल फार रंगते...

बंडोपंतः—हा म्हातारा तिकडंच रंगलेला दिसतो.

"जातों म्हटलें तरी जेबुन्निसा सोडीत नाहीं. तत्राप लवकरच येतों."

बंडोपंतः—चला, याचा निकाल लागला म्हणायचा !

३ श्री. बंडोपंत यांस सा. न. वि. वि. आपला निरोप घेऊन निघालों तो काल सायंकाळीं येथें सुखरूप येऊन पोंचलों. घरांतील मंडळींना स्वाभाविकपणेंच आनंद झाला. जो तो म्हणूं लागला कीं काका तुमची प्रकृति छान आहे ! मी सांगितलें कीं याचें सारें श्रेय बंडोपंतांस आहे. देव तुमचें बरें करो. तुम्ही हा आश्रम काढलांत हे आम्हांसारख्यांवर महत् उपकार आहेत. ठरल्याप्रमाणें कुळें आजच येऊन भेटलीं. माणसें चांगलीं भलीं आहेत. आज हुरडा खाण्यास जाणार आहें. दोन चार दिवसांनीं रताळ्याची उकडहंडी करणार आहेत. मला तुमची फार आठवण होते. मात्र येत्या सोमवारींच परत येतां येईलसें दिसत नाहीं. मला पहातांच धाकट्या नातीनें माझ्या धोतराचे सोगे धरून माझ्या गुडघ्यांना जी मिठी मारली ती ती सोडीनाच. काका, तुम्ही तिकडे कां जातां हो ? कां जातां हो ? आम्ही तुम्हांला जाऊं देणार नाहीं !

आम्ही तुम्हांला जाऊं देणार नाहीं ! असें म्हणत म्हणत तिनें मला जसें बांधून घातलें आहे. मोठी चणचणीत पोर आहे. तुम्ही पाहिलीत तर तुम्हांलासुद्धां ती भारी आवडेल. त्यांतही अजून थोडी बोबडं बोलते. जेवण झाल्यावर जरा लवंडलों तो हलकेंच येऊन माझ्या पाठीलाच रेलून बसली अन् पाहिलीच्या पुस्तकांतील कविता म्हणण्याचा घडाका चालू केलान्. डोळे मिटल्या मिटल्याच मी ऐकत होतों. शेवटीं मी डोळे पुसले अन् तिला पुढें घेऊन गाणें म्हणायला सांगितलें...

बंडोपंतः—मला नाहीं वाटत हा गृहस्थ लवकर परत येईल अन् आला तरी येथें फार दिवस टिकेल !

४ वृद्धाश्रमाचे चालक यांस सा. न. वि. वि. मला इकडे येऊन बरेच दिवस झाले. मी अजून परत कां येत नाहीं असें आपणांस वाटत असेल. पण एकाच्या पुढें दुसरें असें कांहीं ना कांहीं निघत राहिल्यानें मला येथून बाहेर पडावयास सवडच होत नाहीं. शिवाय आणखी एक प्रकरण चालूं झालें आहे. माझा आतां तसला कांहीं हेतू नाहीं हें तुम्हांला मी एकदां सहजासहजीं बोललों होतोंच. आपल्या आश्रमांत जमा झालेल्या लोकांत मी अजून शोभण्यासारखा नाहीं असें मात्र तुम्ही मला म्हणालां होतां. तें खरेंच आहे. केवळ वर्षेंच मोजलीं तर मला वयस्कर म्हणतां येईल. पण एरवी माझ्या अंगांत चांगली ताकद आहे, मनाला उत्साह आहे. बरें, छबीही तशी विशेषशी बदललेली नाहीं. मी निश्चय केलेला होता कीं, आपण आतां हें मनांत आणायचं नाहीं. पण तुम्ही साडू म्हणून सांगायला संकोच वाटत नाहीं की—कुसाताईचा आग्रह चालला आहे की दादा, तुम्ही असे राहूं नका ! आतां काय करावं ? बरं, परवां बापूशास्त्री आले होते ते याच्याहि

पुढचं बोलूं लागले ! मी गप्पच बसलों ! बापूशास्त्र्यांची पुतणी आहे. मोठी आहे. वीस वर्षांची आहे. वळण बापूंचं. सगळं करतां येत आहे. बरं, गरीब आहे. पण बंडोपंत ! वयाकडे कांहीं पाहायला नको का ? माझं कांहीं चालेना—(बंडोपंत, " अरेरे ")—शेवटीं या लोकांनीं मला घोड्यावर घातलें. आणि मी बापूशास्त्र्यांच्या भावाच्या बिऱ्हाडीं गेलों. मुलगी विनयशील; तिनं माझ्याकडं मान वर करून सुद्धां कांहीं पाहिलं नाहीं. देण्याघेण्याचा प्रश्नच नाहीं. दिवस हे असे. अर्थात् समारंभ आणि जेवणीं-खाणीं हीं बेतानेंच व्हायचीं. हें सारं खरं. पण माझ्या निश्चयाची आठवण मला सारखी होत असते. मुलीची आई माजघरांतून म्हणाली, " हिला येवढी पदरांत घेतलीत तर बरं होईल." बंडोपंत ! त्यांचे ते शब्द ऐकून मी गहिंवरलों. घरची गरिबी, प्रसंग सर्वांवरच असतो. बरं, माणसं कुलीन, घरंदाज. आतां थोडे वाईट दिवस आलेले, हा भाग अलाहिदा. असा तिढ्यांत सांपडलों आहें. इकडे कुसाताईचा आग्रह चालूच आहे. तिनं आपल्या नणदेची मुलगी आणायचं ठरविलं आहे. दोन-चार दिवसांत तीं माणसं इथं येतील. आतां या पेचांतून मी कसा बाहेर पडणार असं मला झालं आहे...

बंडोपंतः—आलं ध्यानांत एकंदरीत. हा म्हातारा पुन्हां चतुर्भुज होणार.

५ रा. रा. बंडोपंत यांस कृ. सा. न. वि. वि. यानंतर इकडील मजकूर तरी आजपावेतों सुखरूप असो विशेष. आपलें पत्र पोचलें. लिहिला अर्थ विदित झाला. येथचें काम आवरलें म्हणजे येतों. पण मी इकडे आलों तें बरें झालें असें मला वाटूं लागलें आहे. तुम्ही म्हणत होतां कीं, परत कशाला-

जातां ! घरचीं माणसें आहेत तीं सगळें कांहीं पाहतील; आतां तिकडचा नाद सोडा. पण नाद सोडा कसा ! येवढें शरीरकष्ट करून बागशाही केली होती ती डोळ्यापुढें रोज दिसत होती. रोज वाटे कीं, झाडांचं काय झालं असेल. इथं येऊन पाहतों तों वाटलं होतं तेंच झालं. झाडाचे खराटे झाले आहेत. पारख कर—करून एक एक रोप पैदा केललं होतं. पण या अर्बुजांना त्याची काय किंमत ! वेलांनीं माना टाकल्या, आणि केळी पिंगट होऊन गेल्या. पडूं लागलेले घड तिथल्या तिथें थबकल्यासारखे झाले. देवदयेनें येवढी विहीर पाण्यानं डबडबलेली पण चार घागरी ओढून झाडांना घालाव्या अन् जीव जगवावे ही वासना यांना नाहीं. मी आल्यापासून हातांत खराटा घेऊन बागेतून सारखा हिंडतों आहें. झाडांचीं, वेलांचीं, केळींचीं आळीं नीट केलीं, पाट केले, आणि झेपलें तेव्हां तेव्हां रहाटाचें पाणी पाटांत सोडूं लागलों. आठ दिवसांत परड्याची सारी कळा बदलली. या पोरांना वाटत होतें कीं, मोगरे मेले आहेत. मरतील कसे ? वसंताचा वारा लागला अन् त्यांना पाणी मिळालें कीं ते फुललेच पाहिजेत. आतां मोगऱ्यांना कळ्या लागत आहेत. सारें परसूं वासानं दरवळून जात आहे. या माझ्या केळींकडे वर खालीं पाहतांना माझा किती तरी वेळ जाई. पण या माणसांना त्याचं काय होय ? त्यांनीं त्या करपूं दिल्या ! खरोखर हीं माणसं आपल्या पोरांना तरी नीट संभाळतील कीं नाहीं कोणास ठाऊक ! अहो ! यांनीं प्रत्यक्ष केळी करपूं दिल्या ! पण आतां पाणी पोंचूं लागतांच त्यांना काय टवटवी आली आहे पाहा ! या केळी मी कधींही मरूं देणार नाहीं. त्यांच्या बेटांतील पहिली केळ सौभाग्यवतीनं लावलेली होती. त्याच केळीचे हे सारे अंकुर आहेत. ते

तिचेच आहेत. ती असतांना ती व मी जोडीनं पाणी घालीत असूं. पण आतां तिच्या पश्चात् मी पाणी घालीन आणि ते अंकुर मोठे करीन असं मनांत म्हणालों अन् त्याप्रमाणं केलंही. पण या लोकांना त्याचं काय ! त्यांनीं ते करपूं दिले. आता त्यांना कांति आली आहे. मी खस्ता खात असलों म्हणजे चिरंजीव माडी-वरच्या खिडकींतून, बुकांतली मान वर करून, अन् सूनबाई भरत-कामांतून नजर काढून खालीं पाहत असतात ! वंडोपंत, आतां पहातों केव्हां निघतां येईल तें. पण या झाडांचं काय करावं कळत नाहीं. तुमच्या तिथंही झाडं आहेतच, पण हीं झाडं सौभाग्य-वतीनं अन् मीं लावलेलीं आहेत. तुमच्या तेथलीं एका खिस्ती माळ्यानं ठाकरांकडून घेतलेल्या रोपट्यांचीं वाढविलेलीं आहेत ! तथापि आपल्याला लवकरच लिहितों......

वंडोपंतः—–वृद्ध माणसा ! न का येईनास ? तुझीं रोपटीं अन् तुझ्या त्या केळी पोसत तूं घरींच राहा.

६ रा. रा. चालक, वृद्धाश्रम यांस साष्टांग दंडवत विनंति विशेष. आम्हाला इकडे येऊन बरेंच दिवस झाले. आपलं टपालही पोंचलं. आम्ही सोयीसोयीनं येऊं. इतक्यात येत नाहीं. परत आलों तों शेतावर हरभरा, गहूं, काढणीला आलेला. पंचवीस माणूस राबत असलेलं पाहिलं. लेक-सून भेटलीं. तीं म्हणालीं, " सगळं चांगलं आहे. पण आपण नसल्यानं वाईट वाटतं. आपण हें सारं केलं अन् नशिबाची सुगी सुरू झाली असतांना आपण मात्र इथं नाहीं यामुळं हळहळ वाटते ! " सून माझी लाडकी आहे; ती म्हणाली, " मामंजी, तिथं तीं नोकर माणसं आपली चाकरी किती करतील ! माझ्यासारखी करतील का ? इथं घरींच राहिलं पाहिजे. हा कोवळा

हरभरा, या गव्हाच्या ओंब्या, आम्हींच खायच्या का? वाटेकरी म्हणतात कीं, अष्टौप्रहर मोट चालली तरी विहिरीचं पाणी वीतभर कांहीं खालीं जात नाहीं. सगळ्या मळ्यांत पाट खळखळत असतात. एकूण एक झाडांनीं फळं धरलीं आहेत. हे म्हणतात, 'फळं आलीं आहेत खरीं, पण बाबा इथं नाहींत.' माझ्यासाठीं नसलं तरी आपण यांच्यासाठीं घरींच राहिलं पाहिजे." बंडोपंत, या घरगुती बाबी मी तुम्हांला लिहूं नयेत, पण माझ्या इतक्यांत न येण्याचं इतर कोणचंही कारण तुम्हांला पटण्यासारखं नाहीं. म्हणून खरं तेंच सांगतों. माझ्या वडिलांनीं आपल्या लहानपणीं लावलेल्या आंब्याचा विस्तार आतां येवढा झाला आहे कीं, त्याच्या सावलींतच मळ्यावरच्या साऱ्या गोष्टी चालतात. आंबा शेंदऱ्या फळांनीं असा लकडला आहे कीं, त्याला पाहणाराची दृष्टच लागेलसें वाटतें. मी रात्रीचा घरीं जातच नाहीं. चव्हाणाचें घराणें आज सहा पिढ्यांचें आमचें वांटेकरी आहे. रामा चव्हाण हा माझा लहानपणचा मैतर. तो अन् मी इथंच विहिरीच्या पलीकडे मोटेखालीं वाहणाऱ्या पाटाच्या कांठीं मध्यान्हीपर्यंत बोलत बसतों; अन् कंटाळलों म्हणजे शेजारच्या कोपींत जाऊन निजतों. मोटेच्या गाण्यानें अन् कुरकुरीनें झोंप येते आणि मोटेच्या गाण्यानें आणि कुरकुरीनेंच ती जाते! पण मी फार लिहीत बसलों आहें. सध्यां तरी तुम्हांला इतकेंच कळवितों कीं; या महिन्यांत तर मी परत येत नाहीं. तुमचे पैसे मात्र वक्तशीर येत जातील."

हीं पत्रें वाचून बंडोपंत मोठे चिंतातुर झाले. पण त्यांच्या चेहऱ्यावर रागाची छाया मात्र मुळींच दिसली नाहीं. शेजारीं अजून पत्रव्यवहाराचा ढीग बराच पडला होता. पण रुचिपालट म्हणून त्यांनीं त्यांतील "आडवळणी" नांवाचें एक वर्तमानपत्र उचललें

आणि तें फोडून पाहूं लागले. पाहतां पाहतां नेहमींच्या 'फेरफटका' रकान्याकडे त्यांची नजर गेली आणि ते लक्षपूर्वक वाचूं लागले :—

७ "अलीकडे बरेच दिवस दिसेनासा झालेला एक गुलजार म्हातारा येथें पुन्हा दिसूं लागला आहे. गुलमिशांचा थाट तोच आहे; रेशीमकांठीं उपरण्याच्या चुन्यांची घडी काखेंत ठेवण्याची ढब तीच आहे. हातांतील काठीची चांदीची मूठ नाकाकडे पुन्हां पुनः नेण्याची ऐट तीच आहे. म्हातारा अजून पहिल्याच रोखानें पाहत असतो. देवळाच्या समोरच पंपूशेठ गंध्यांच्या दुकानावरचा अड्डा पहिल्यासारखाच भरत असतो आणि ही स्वारी तेथें सहाच्या सुमाराला हटकून येत असते. देवळाच्या दाराकडे पाहत पाहत तोंडाला दोन बोटांचे गज लावून त्यांतून पिचकाऱ्या मारण्याचा छंदही तोच आहे. "बरी पिडा टळली होती. पुन्हां परत आली वाटतं" असे शब्द देवळांत जाणाऱ्या आणि देवळांतून बाहेर पडणाऱ्या स्त्रियांच्या तोंडून बाहेर पडतांना कोणाकोणाच्या कानीं येतात. लोक बोलतात कीं, हे राजेश्री एका वृद्धाश्रमांत राहावयास गेले होते. पण चैत्र मासांत हे येथें पुन्हां दाखल झाले आहेत ! हळदीकुंकवाला बायका सायंकाळच्या वेळीं फिरूं लागल्या कीं हे इकडून तिकडे अन् तिकडून इकडे, खाकरत खोकरत आणि कानांतला फाया हुंगत हुंगत, हेलपाटे घालीत असतात. अन् शेवटीं गंध्यांच्या अड्ड्यावर जेठा मारून बसतात. गंध्यांच्या दुकानावरून जातांना मी यांच्याकडे दोन-चार वेळां जरा लक्ष लावून पाहिलं तेव्हां हे थोडे चमकल्यासारखे झाले ! अशा आमच्या गांवच्या मौजा आहेत..."

बंडोपंत मनांत म्हणाले "हा गुलजार म्हातारा म्हणजे आमचे रंगरावच ! स्वारी मोठी छटेल दिसते. हा या माझ्या

आश्रमांतून असाच पळ काढीत राहणार ! एकंदरीनं पाहतां या मंडळींना इथं डांबून धरणं मला कठिणच जाणार." बंडोपंतांनीं वाचलेलीं पत्रें जरी बरींच असलीं तरी त्यांतील आणखी दोनच येथें देतों :

८ रा. चालक, वृद्धाश्रम यांस सा. न. वि. वि. आजोबा इकडे आले त्याला बरेच दिवस झाले. आपलीं दोनतीन पत्रें आलीं तीं पावलीं. आजोबांनीं मलाच उत्तर लिहिण्यास सांगितल्यावरून लिहीत आहें. वास्तविक पाहतां आजोबांचा अन् आमचा कांहींच संबंध नाहीं. पण ते आमच्या खऱ्या आजोबांचे स्नेही म्हणून आम्ही त्यांनाही आजोबा म्हणूं लागलों. येथें वरल्या आळीला त्यांचें घर आहे. पण आतां त्यांचें कोणीही उरलेलें नाहीं. आल्यापासून ते आमचेकडेच आहेत. मधून मधून घरीं जातात. घरांत आतां कोणीही नाहीं. परसांत पणजोबांची समाधि आहे, तिला वंदन करतात, प्रदक्षणा घालतात. भिंतीला लावलेल्या तसबिरींवरची व छायाचित्रांवरची धूळ झटकतात. ओसरीवर एक मळका तक्क्या असतो त्याला टेकून कांहीं वेळ बसतात. चष्मा लावून, मान वळवून भिंतीवरील फोटोकडे टक लावून पाहातात. मुलगा, सून, व नातवंडें यांच्या चित्रांकडे फार वेळ पाहतात आणि मग मोठी झपक्याची नथ, ठुशा, गोठपाटल्या, बुगड्यांचे वेल घातलेल्या एका फोटोकडे नजर वळवितात. असें नेहमीं चालतें. तें झालें म्हणजे आमच्याकडे येतात. माझ्या धाकट्या मुलांना ते मोठ्या आवडीनें कवटाळतात आणि तींही त्यांच्याजवळ जाऊन, त्यांच्या मांडीवर कोपर टेकून, माना वांकड्या करून, प्रश्न विचारून विचारून त्यांना भंडावतात. परवांच्या दिवशीं आजोबांनीं पांच रुपयांचे पेरू आणले, ते घेऊन ते शाळेंत गेले आणि शाळा

सुटतांच प्रत्येक मुलाला एक एक असे सारे पेरू त्यांनी वांटून टाकले. पेरू मिळतांच मुलें अशीं हुरळून गेलीं कीं, शाळेचें अंगण त्या चिमण्या पोरांनीं आपल्या कलकलाटानं भरून सोडलं. हेडमास्तर आणि आजोबा हंसत उभे होते ! गेल्या सोमवारीं आमच्या येथें बालदिन होता. आजोबांनीं दहा रुपयांचे पेढे बरोबर नेले. अन् वर्गातच वाटले. शिवाय ते घरीं न्यायचे नाहींत हा त्यांचा आग्रह ! इथंच खाल्ले पाहिजेत ! सगळे वर्ग पेढे खाण्यांत दंग झालेले पाहून आजोबांचे डोळे पाण्यानें भरून आले. एका मुलाकडे बोट दाखवून ते मास्तरांना म्हणाले, "आमचा दिनू याच वयाचा होता, नाहीं हो ? असाच दिसायचा !" मास्तर थोडें गाहिंवरून नुसतेच हंसले. मी आजोबांना आपल्या पत्रांची आठवण करून देतों; पण ते म्हणतात कीं, जाऊं आतां, इतक्यांत काय गडबड आहे ? त्यांच्या सांगण्याप्रमाणें आपलें मागच्या महिन्याचें द्रव्य व पुढचें आगाऊ सोबत धाडलें आहे. कळावें, ही विनंति.

९ सा. न. वि. वि. वडील अजून आळंदीहून आले नाहींत. आज आळंदी तर उद्यां देहू असें त्यांचें सारखें चाललेलें असतें. त्यांना इतर ठिकाणीं चैनच पडत नाहीं. येथें होते तेव्हां आळंदी-देहूला मधून मधून जात असत. पण आपल्या आश्रमांत राहूं लागल्यापासून त्यांची वृत्ति अगदींच बदललेली दिसते. इकडे आल्यावर ते म्हणत होते कीं, "आश्रमांतलें राहणें परमार्थाला सोयीचें नाहीं. तेथें हास्यविनोद फार, थट्टामस्करी फार. साहेबांच्या अन् कचेरींतल्या गोष्टी फार. पैसेवाले, उत्पन्नदार, आणि बडे पेणसलदार यांना म्हातारपणींही गुर्मी फार. प्रथम वाटत होतें कीं, संध्याकाळीं अन् रात्रीं कांहीं माणसें तरी नियमानें भजन करतील, योगवासिष्ठ ऐकतील, पण तसें दिसेना. वर्तमानपत्रांतल्या

बाताच फार मारतात. त्यांतल्या त्यांत जे दुबळे त्यांची टर उडविण्याची प्रवृत्ति याही वयांत अनेकांच्या ठिकाणीं दिसून येते. मला गरिबाला तिथं कसं चैन पडेल ? मी रात्रीं टाळावर भजन करूं लागलों म्हणजे हे लोक कातावतात आणि मॅनेजरकडे तक्रार करतात कीं, हा म्हातारा टाळकुट्या येथें नको, हा आमची झोंपमोड करतो. आपण वचन दिलें आहे त्याप्रमाणें वर्षाचे पैसे भरीत राहूं. पण मला तेथलें राहणें मानवावयाचें नाहीं. माझा जीव ज्ञानोबाच्या समाधीपुढें अन् तुकोबाच्या रंगशिळेशेजारीं समाधान पावतो. म्हणून तिथेंच राहतों." वडिलांची मनःप्रकृति काय आहे हें यावरून दिसून येईल. आपली चालू महिन्याची बाकी व पुढील महिन्याचे पैसै आगाऊ सोबत पाठविले आहेत. क. ही. वि.

बंडोपंतांच्या मनाची अवस्था वर्णन करणें कठिण आहे. तेही पुन्हां पुन्हां पुण्याला जाऊं लागले. त्यांच्या खेपा उरल्या-सुरल्यांच्या ध्यानांत आल्या. नोकर भेटेनासे होऊन नाहींसे होऊं लागले. झाडें वाळूं लागलीं. आश्रमाला ओंगळपणा व पूर्वीचा जुनेपणा परत येऊं लागला. एके दिवशीं आगगाडींतील माणसें म्हणालीं, "अरे, आज एकही दिवा दिसत नाहीं ! सडकेकांठची पाटीही दिसत नाहीं ! याचें झालें तरी काय ?" नेहमींप्रमाणें संध्या-समयीं वेदघोषासाठीं भटजी आले होते, पण तेथें शुकशुकाट पाहून ते परत वळले; आणि जातांना येवढेंच म्हणाले कीं, ॐ शांति : शांति : शांति : !

# ११. सगाजीबोवा

" त्ये खडाकवासल्याचं धरान् हाय ना ? त्ये वक्तीं मी बगा ह्या पोराच्या शिनचा असनू." शेजारच्या एका अठरावीस वर्षांच्या पोराकडे हात दाखवून सगाजीबोवा मला म्हणाले. सगाजी-बोवा म्हणजे त्या मांगवाड्यांतलें एक अपूरुपाचें माणूस होतें. सगळ्या आळींत सगाजीबोवासंबंधानें कोणी कधीं एक शब्द वाईट बोललेलें मला आठवत नाहीं. सगाजी तसाच अस्राप होता. शिवाय आळींतला कोणचाहि माणूस तुम्ही काढलांत तरी तो सगाजीपेक्षां लहान असायचाच. खडकवासल्याचं धरण झालं तेव्हां सगाजी वीस वर्षांचा होता. यावरूनच त्याचें वय ध्यानांत येण्या-सारखें होतें. त्याच्या डोळ्यापुढें मांगवाड्यांतल्या तीन चार पिढ्या तरी गेलेल्या होत्या. सडकेकांठचें प्रत्येक घर पहिलें कुणाचें, सध्यांच्या माणसांकडे तें कसें आलें, निर्वंश कुणाचा झाला, रामाचा 'ल्योक' सध्यां कुठं असतो, आणि 'गुइंदाची भावज' सासवडच्या सैन्या मांगाची, ही सारी माहिती सगाजीच्या आठवणखान्यांत भरलेली असायची. पण सगाजी नेहमीं गप्प असायचा. त्याच्या बरोबरीचीं माणसं कोणीच उरलेलीं नव्हतीं. उदासपणानें सगाजी आळींतल्या रस्त्यानें जात, येत असे. त्याला पाहिलें कीं या वस्ती-तलीं माणसं मग तीं कोणीहि असोत, 'बाबा' म्हणून त्याला रामराम केल्याशिवाय पुढं जायचीं नाहींत. तोही भलेपणानें त्यांच्या-कडे पहात पुढें निघून जायचा. पण कोणाकडेहि त्याचें लक्ष ममत्वाचें नसे.

मी स्वतः सगाजीला पंचवीस वर्षें तरी पहात होतों. पण एवढ्या काळांत त्यानें अमक्या माणसाबद्दल विशेष जवळपणा

दाखविला असें मी पाहिलेंच नाहीं. माझी आणि त्याची ओळख झाली तेव्हां तो चांगला म्हातारा होता. तेव्हांपासूनची त्याची ती निर्विकार वृत्ति मी पंचवीस वर्षें पहात होतों. माळरानावर लावलेल्या अन् पावसाविणें होरपळलेल्या बाजरीच्या सरमडांत पैरण घातलेलें एकादें वेडेंवाकडें बुजगावणें उभें असावें तसा सगाजी त्या लोकवस्तींत होता. त्याचें नांव सगाजी; म्हणजे सखाजी; पण तो कुणाचा सखा उरला नव्हता. कारण त्याच्या ओळखीचें कोणी राहिलेलेंच नव्हतें. हा माणूस केव्हांचा आहे, याची चवकशी भोंवतालच्या माणसांनीं कधीं केली नाहीं. कारण लोक पहात होते तसा तो आळींत होताच. सगाजीच्या घरासमोर एक अस्मान-उंच पण रोडका पिंपळ होता; आणि त्या पिंपळाचा पार चारही अंगांनीं ढांसळलेला होता. या पिंपळाची अन् पाराची चवकशी जशी कधीं कोणी करीत नसत तशीच सगाजीचीही करीत नसत. तो आपला होता इतकेंच काय तें.

माझी ओळख झाली तेव्हांच सगाजीची कंबर दुमडलेली होती. पण एकदां दुमडल्यावर ती त्या घाटावर पंचवीस वर्षें तरी कायम राहिली होती. सगाजीची इमारत फार लहान होती. सगाजी खुजा होता. पण जेव्हां केव्हां तो तरणा असेल तेव्हां तो अंगानें चांगला जाडजूड आणि भक्कम असला पाहिजे. त्याच्या जोड्याचें वयोमान सगाजीच्या वयोमानाइतकेंच असावें असा अंदाज होतो; आणि त्या तांबड्या मुंडास्याची वेटोळीं त्यानें केव्हां कायम केलीं होतीं हें सांगणें तर अशक्य होतें. पिंवळसर झालेल्या कंसाच्या आकाराच्या त्याच्या पांढऱ्या दिशा खालच्या ओंठावर येऊन पोंचलेल्या असत; यामुळें सगाजी बरींच वर्षें बोथरा बनलेला होता, हें त्याच्या उच्चारां-

वरूनच केवळ कळत असे. दोन हात पाठीवर घेऊन सगाजी पुढें कललेल्या आपल्या इमारतीचा तोल संभाळीत असे. वाचून नवल वाटेल पण हा वृद्ध मांग अंगांत अंगरखा घालीत असे! त्याचें बिरडें नेहमीं तुटलेलें असे. असें हें वृद्ध, मळीण, उदासवाणें आणि असाप ध्यान मधून अधून गांवांत जाई आणि दिवसा-उजेडी परत येई. सगाजी थोडा जिवट असावा. या वयांत त्यांच्या हातून कांहीं कामधंदा होत नव्हता. पण त्यानें कोणापाशीं कधीं कांहीं मागितलें नाहीं कीं कोणाची उचापत केली नाहीं. यावरून वाटतें कीं त्याच्यापाशीं कांहींतरी असावें. सगाजीचें घरही भोंवतालच्या घरांच्या मानानें चांगलें होतें. दोन खणी दुघई दीड मजल्याची होती. दुसरा मजला बसकट होता. रस्त्याकडे तोंड करून त्याला एकच खिडकी होती. खालून वर जाण्याला एक शिडी लावलेली असे. घरांत भाकरी-तुकडा झाला कीं सगाजीबाबा कळकाच्या शिडीवरून त्या घरट्यांत जाऊन बसत आणि तेथून बाहेर काय चाललें असेल त्याकडे लुकुलुकु पहात असत.

पण एक गोष्ट सांगितलीच पाहिजे. पिंपळाच्या पारावर मी शाळा काढली तेव्हां जी याची आणि माझी ओळख झाली ती झाली. आळींत कोणी मुलें दिसलीं नाहींत म्हणजे मी म्हणें, “काय सगाजीबाबा! अहो पोरं कुठं आहेत?” आपला लांडा हात उभवून तो एक ठराविक उत्तर करी: “गेलीं असत्याल कुनी ओठेलांत, कुनी कुटं, कुनी कुटं: येत्यांल आतां: बसा वाइच.” माझी ओळख सगाजी कधीं विसरला नाहीं. त्याची गांठ केव्हांही, कुठेंहि पडो; “मास्तरजी!” असें म्हणून लवून नमस्कार केल्यावांचून सगाजी कधीं पुढें गेला नाहीं. शेवटीं शेवटीं कित्येक दिवस सगाजीची अन् माझी गांठ पडली नव्हती. म्हणून मी मुद्दामच

त्याच्याकडे गेलों. नवीन घर्तीनं बांधलेल्या आपल्या लहानशा घरांत सगाजी बसला होता. दारापुढें जाऊन " सगाजी " म्हणून मी हांक मारली. तों त्याची वयस्कर लेक बाहेर आली. तिनें मला या बसा केलें; अन् आंत जाऊन ती सगाजीला घेऊन आली. बाहेरच्या लहानशा कट्ट्यावर आम्ही बसलों. सगाजी आतां अगदीं जरब्ख झाला होता. माझ्याकडे पहावयास त्याला वळावें लागूं नये म्हणून मी त्याच्यासमोरच उभा राहिलों व पुन्हां एकदां मी त्याला 'सगाजी' म्हणून हांक मारली.

सगाजी लेकीला म्हणतो, " कोन् हाइ ग ? "

लेक :—" अव, त्ये आपल मास्तरजी न्हवत कां ! "

सगाजी :—" मास्तरजी ? कोन् मास्तरजी ? "

सगाजी माझ्याकडे पहात होता. पण त्याला मी दिसत नव्हतों ! त्याचे डोळे उघडे होते. पण त्यांतील दृष्टि गेलेली होती ! माझ्या आवाजाच्या रोखानें तो पहात होता. पण त्याला दिसत नव्हतें. सगाजीचें आवरत आलें होतें.

मी :— सगाजीबाबा ! अहो, आपला तो पार नव्हता का ?

सगाजी :—हां, हां.

मी :—त्याच्यावर आपली शाळा नव्हती का ?

सगाजी :—हां, हां.

मी :—अन् मी रोज येत नव्हतों का ?

सगाजी गप्प बसला अन् खजील होऊन, लेकीकडे वळून म्हणतो, " कोन बोलतया कायनु ? "

अरेरे, पंचवीस वर्षेंपर्यंत जो मला कधींहि विसरला नव्हता तो आतां इतका थकला होता कीं माझें नांवही त्याला आठवेना !

त्याच्या सर्व शक्ति थिजत चालल्या होत्या. थोड्याच दिवसांत कळलें कीं सगाजीबावांचा अवतार संपला आहे.

सगाजीच्या चरित्राची हकीकत येवढीच आहे. पंचवीस वर्षांच्या ओळखींत मला त्याचें निराळें किंवा ज्यास्त कांहींहि कळलें नाहीं. मरतांना याचें वय शंभरावर असावें. माणूस शंभर वर्षें जगतें हें वेदवाक्य त्यानें कधींहि ऐकलें नव्हतें; पण त्याप्रमाणें तो सहजगत्याच वागला होता. खडकवासल्याचें धरण बांधलें तेव्हां तो चांगला टगक होता. तेव्हांच्या आठवणी तो सांगे आणि जी त्याची लेक ती रेमार्केटच्या जागीं पाहिल्यानें बाग कशी होती याची हकीकत सांगे! काळप्रवाहाचा केवढा सुदीर्घ लोंढा सगाजीच्या अंगावरून वहात गेला होता! सगाजीला त्याची दाद नव्हती. तेव्हां त्याच्या ओंठांवर मिसरुड नव्हतें, तें फुटलें; सगाजी बापई झाला; सगाजी प्रपंच करूं लागला; सगाजी कुंचे, चराटें, केरसुण्या विकूं लागला; सगाजी मोलमजुरी करूं लागला; सगाजी थकला; सगाजी गप्प बसूं लागला; सगाजी सगळें विसरूं लागला; सगाजी मरून गेला! सगाजीनें मांगवाड्यांतील एकूण चार पिढ्या पाहिल्या. पण सगाजीच्या जीवितांत कसलाहि फरक पडला नाहीं. ऐशीं-पंचायशीं वर्षें एक वेळापत्रक चालूं होतें. न बोलावतां नवा दिवस येई आणि जुना होऊन तो निरोप न घेतां निघून जाई. असे कित्येक सहस्र दिवस आले आणि गेले. सगाजीला त्याची दाद नव्हती. एक सबंध मानवप्राणी शंभर वर्षें या पृथ्वीवर राहिला अन् कशाचीहि दाद न लागतां निघून गेला. त्याला मन होतें; त्याला बुद्धि होती; त्याला भावना होती; त्याला आकांक्षा होती; त्याला ईर्षा आणि असूयाहि असली पाहिजे. त्याला हास्य होतें आणि त्याला प्रपंचाची हौस होती. पण या सर्वांचें केवळ अणुरेणू त्याच्या

पिंडांत होते; त्यानें पुस्तकें वाचलीं असतीं; लिहिलीं असतीं, समजून सांगितलीं असतीं. त्यानें सभेंत उभें राहून गर्जना केल्या असत्या; आणि शेताच्या बांदावर उभे राहून सरकारी कर-वसुलीसाठीं आलेल्या कामगारांना त्यानें ढेंकूळ भिरकावून मारलें असतें. त्यानें रणावरचा गणवेष चढविला असता आणि खांद्यावर बंदुक टाकून त्यानें बॉक्सर बंडांत गोळीही चालविली असती. त्यानें कदाचित् व्याकरण शिकविलें असतें आणि समोर बसलेल्या विद्यार्थ्यांनीं त्याच्या तोंडून कदाचित् अमृतानुभवाचें प्रतिपादन ऐकलें असतें. पण सगाजीचें यांतलें कांहींच झालें नाहीं. माडीवरच्या झरोकेवजा खिडकींतून तो जगाकडे नुसता लुकुलुकु करीत राहिला होता. कावळा शंभर वर्षे जगतो असें सांगतात. सगाजी शंभर वर्षे जगला होता. पण सगळे कावळे सारखेच असतात. त्यांच्यांत प्रतवारी नाहीं. मानव प्राण्यांत प्रतवारी असते; आढ्यता असते, हयगय असते, अरेरावी असते, तुटसपणा असतो, तिटकारा असतो, माणसांच्यांत धर्माचें ढोंग असतें, तत्त्वज्ञानाचा बडिवार असतो, विद्वत्वाचा डौल असतो, माणसांत प्रतवारी असते. पण सगाजीची अडचण याच्याहि पुढची होती. त्याला मानव-कोटीच्या पाहिल्या रस्त्यावर पाऊल टाकायलासुद्धां संधी नव्हती. तो अस्पृश्य होता. एक उभा मानव-प्राणी शंभर वर्षे जगला आणि जगाकडे लांबून पहात पहात, शेवटीं थिजलेल्या डोळ्यांचे विरलेले जीर्ण पडदे त्यानें कायमचे लावून घेतले.

दरम्यान इकडे केवढाल्या गोष्टी झालेल्या होत्या. सगाजीच्या अंगावरून सत्तावन सालचें क्रान्तियुद्ध गेलें होतें. पण त्यानें हूं कां चूं केलें नाहीं. सारें उत्तर हिंदुस्थान गडाडलें पण सगाजी आपल्या घरांत शांत होता. सगळ्या आशिया खंडाची झोंपमोड करणारें रुसो–जपानी युद्ध त्याच्या कानांवर आलेंच नाहीं. देशोदेशींचे लोक

आक्रंदून सांगतात कीं आमची शतकानुशतकांची झोंप मुकडेनच्या तोफखान्यानें मोडली आणि राशियन आर्माड्याबरोबरच आमच्या औदासिन्यालाहि जलसमाधि मिळाली. हें झालेंही असेल. पण सगाजीला त्याचें काय होय ? त्याची ती एक फर्लांगाची आळी, त्याचें तें दु-खणी घर, त्याची ती कळकाची शिडी आणि त्याची ती गवाक्षवजा खिडकी जशीच्या तशी कायम होती. तिच्यांत कसलाही फरक पडला नाहीं; आणि यांत सगाजीचा कसलाही दोष नव्हता. तो अस्पृश्याच्या कुळांत जन्माला आलेला होता. हा गुन्हा त्यानें न कळत केलेला होता. तरी त्याचें फळ तो भोगतच होता. सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणीं परमेश्वरी साक्षात्कार पाहणाऱ्या धर्मानें त्याचें मन, त्याची बुद्धि, आणि त्याच्या इंद्रियांच्या शक्तीही जणूं हिरावून घेतल्या होत्या. सगाजीला सारें आभाळ झांकाळल्यासारखें होतें. क्षितिज कशाला म्हणतात हें त्याला माहित नव्हतें. पण तें त्याच्या नाकापासून फारसें दूर नव्हतें.

एकोणीसशें चौदा सालीं सगळ्या पृथ्वीवर हैदोस झाला. युरोपांतले मस्तवाल दैत्य एकमेकांवर गदा घेऊन उठले. चार वर्षें-पर्यंत रगतसांड चालली होती. तोफांच्या गोळ्यांनीं आकाशाच्या ठिकऱ्या उडाल्या. दर्यावर डोंगरासारख्या नौका पिचून गेल्या. हॅप्सबर्ग राजघराणें उध्वस्त झालें. ऑस्ट्रियाचें साम्राज्य भग्न होऊन त्याचे खरोखरच तीन तेरा झाले. बर्लिनचा बादशहा सिंहासनावरून उडी टाकून पळून गेला. तुर्की साम्राज्याचा धुरोळा झाला; आणि खिलाफतीची चटणी उडाली. पण सगाजीला त्याची वार्ताहि नव्हती. तो आपल्या माळीवरील खुराड्यांत बसून बाहेरच्या पिंपळाकडे बघत राहिला होता. पाठीवर हात टाकून तो त्या हांकभराच्या रस्त्यांतून उदासपणानें मधून मधून जात—येत होता. एवढं महायुद्ध होऊन न

होऊन सारखेंच ठरलें. सगाजीची शांति अढळच राहिली. हें एवढें प्रलयपर्व आलें व गेलें, पण त्याला त्याची वार्ताच लागली नाहीं. मानव-योनींत जन्माला आलेला हा मन-बुद्धि-भावनांनीं युक्त प्राणी ! पण पाऊण कोट लोक मेले तरी त्याला त्याची दादच लागली नाहीं.

१९१७ सालीं उरल पर्वताच्या आणि व्होल्गा नदीच्या पश्चिमेला सारें आभाळ कडाडलें. मगरमस्त झारचें सिंहासन नरसिंहाच्या खांबासारखें काडकन् फाटलें आणि त्यांतून एक प्रचंड, तांबडी ज्वाला धगधगत बाहेर पडली. जग अजूनही तिच्याकडे भयचकित नजरेनें, कदाचित् आदरानें, कदाचित् आशेनें पहात आहे. सर्व युरोपखंड डळमळूं लागलें. पण ती गोष्ट सगाजीच्या गांवींही नव्हती. तो आपला दिडक्या माळीच्या गवाक्षांतून बाहेरच्या रस्त्याकडे लुकलुकत पहात बसला होता. अरे सगाजी ! तिकडे अवघी पृथ्वी दणकून गेली कि रे ! माणसाची जात खालीं डोकें, वर पाय करून उभी राहिली ! तूं इथं काय बघत राहिला आहेस ? पण हें त्याला विचारून काय फायदा ? सगाजीला हा प्रश्नही कधीं ऐकूं गेला नाहीं आणि गेला असता तरी त्याला तो कळलाही नसता. समोरच्या पिंपळाच्या शेंडक्यावर बसलेला कावळा उडाला हें पाहून सगाजी कदाचित् जास्त लक्ष देऊन पाहूं लागला असेल. बाकी त्याच्यांत कांहींही फरक पडला नाहीं. आणि तरी हा मानवप्राणी होता. माणसाची जात आत्मद्रोही आहे. ती आपल्यांतील अनेकांचा द्रोह करते. सगाजीला हें कळलें नव्हतें. पण फारसें कळत नसल्यामुळेंच सगाजी सुखी होता. तो आपल्या झरोकेवजा खिडकींतून सडकेकडे, पिंपळाकडे पहात बसत असे. पिंपळ वठत चालला होता, आणि सडकेवर नेहमींचाच शून्याकार होता. पावसाळ्यांत तिचा ओढा बनत असे. उन्हाळ्यांत तेथें पोरें गोट्या खेळत असत. रशियांत 'करि डळमळ भूमंडळ' अशी अवस्था

प्राप्त झाली होती. पण सगाजी त्या करपत चाललेल्या पिंपळाकडे आणि गोट्या खेळणाऱ्या पोरांकडे पहात होता. तथापि सगाजी एक मानवप्राणी होता.

सगाजीच्या जीवितांत प्रचंड क्रांति झाली ती येवढीच कीं, म्युनिसिपालिटीनें नव्या घरांची बांधणी केली तेव्हां तो आपल्या त्या जुन्या खुराड्यांतून उडून त्या नव्या खुराड्यांत जाऊन बसला. या अद्भुत क्रांतीनें सगाजी कित्येक दिवस अस्वस्थ झालेला होता. "मुन्शीपाटलीला ह्यो उद्योग कुनी सांगतला?" तो त्वेषानें विचारी. "माजी माळी काय ब्येस होती पन् ह्ये येवस्ता करत्यात! इक्ती वर्सं हातं राह्यलों होतों त्यो काय मेलों होतों?" त्याच्या चित्तांत प्रलय झाला तो येवढाच. बाकी सर्व सामसूम होतें. आपल्या नित्याच्या संवयीप्रमाणें अशींच वीस वर्षें आलीं आणि गेलीं. सगाजी भक्कम उभा होता. पुन्हां एकदां ज्याला तुम्ही महायुद्ध म्हणतां तें सुरू झालें. जग हादरलें, कोलमडलें, कोसळलें. माणसें मुंग्यासारखीं मेलीं. सप्त सागरांत माणसांच्या प्राणज्योतींचीं चिरखदानें लागलीं. हिटलरच्या आणि स्टॅलिनच्या अग्निवर्षावांनीं नगरांचीं स्मशानें झालीं; आणि उपवनांचे खराटे बनले. पृथ्वीवरचे अब्जावधि लोक रोज सकाळीं उठून या त्रिखंड उत्पाताकडे भयानें पहात उभे राहूं लागले. त्यांचे जीव कासावीस झाले, त्यांचें अन्न तुटलें, पस्तीस—पस्तीस लाख लोक अन्नावांचून तडफडून मेले. टिकून राहण्याची संवय झालेलें इंग्रजांचें साम्राज्य पुन्हां पुन्हां थरथरून कंप पावूं लागलें. केवळ जगावयास सांपडावें म्हणून सर्वांनीं उच्चनीच भाव सोडून दिले. कामरूप धारण करून इंग्रजांना झुकांडी दिलेला हिंदुस्थानचा वीरमाणि कामरूपांत म्हणजे आसामांत प्राप्त झाला. हिंदुस्थानांत एकच झुंबड उडाली.

पण सगाजी आपल्या कुटिरांत स्वस्थ बसला होता. त्याचे डोळे थिजूं लागले होते. विस्मरणामुळें त्याचा जीव शांत होऊं लागला होता. जगाचा आणि त्याचा जो कांहीं अल्पस्वल्प संबंध होता तोही घटत चालला. एके दिवशीं सगाजीचें नश्वर कलेवर धरणीवर राहिलें; आणि ज्याचें नांव सखा पण ज्याच्याशीं विश्वानें मात्र कसलेंही सख्य केलें नाहीं तो हा सुन्न जीव जीर्ण झालेल्या पिंजऱ्यांतून उडून गेला. पुढें दशसूर्यांचें तेज एक करणारा परमाणु जपानांत उडाला आणि जगाच्या कानठळ्या बसल्या. पण सगाजीला आतां त्याचें काय होय? जिवंत असतांना सहस्र लोकांच्या धडाक्यानें आणि क्रांतीच्या घोषणांनीं जो जागा झाला नाहीं तो मेल्यावर, कल्पांत उडवील असा स्फोट झाला तरी, कसा जागा होणार?

सगाजी असतांनाहि नसल्यासारखाच होता, आतां नसल्यावर तर तो नसणारच! पण ज्या लहान मुलांच्याकडे तो उदासपणानें बघत असे तीं मात्र भावी काळांत असल्या मरणानें कधींही मरणार नाहींत हें निश्चित समजावें.

# १२. काखेंतील कोंबडा !

आगूचा नवरा भला चांगला घडधाकट होता. लहानपणा-पासून आप्पा पैलवानाच्या तालमींत तो तयार झाला होता. जरा टणक झालीं कीं गांवांतलीं सगळीं मुलें आप्पा पैलवानाच्या तालमींत जायचीं हें ठरलेलेंच असे. अमूक अमक्या जातीचा अन् तमूक तमक्या जातीचा असली भानगड नसायची. एकमेकाला मालिस्ती करावयाची, डाव शिकवायचे, हाडपेर मोडलें तर मातींत घालून दाबायचें, डोळ्यांत माती उडाली तर फुंकर घालायचा, मार लागला तर फडक्याचा बोळा तोंडाच्या वाफेनें उबवून त्यानें डोळा शेकायचा, आपल्या तालमींतल्या पोराची कुस्ती कुठें ठरली असली तर सर्वांनीं त्याच्याबरोबर जायचें हे सगळे प्रकार अगदीं सरामिसळीनें चालावयाचे. आप्पा पैलवान हा वाळत चाललेला वस्ताद हौद्याच्या कांठावर बसलेला असे; त्याच्या पायाला हात लावून पोरांनीं कुस्तीला उतरावयाचें. शिकाऊ मुलें खूप होतीं. पण दौलत हा पायाला हात लावायला आला म्हणजे वस्तादाला फार आनंद वाटे. सुपारीचें लहानगें झाड जसें रसरशीत दिसतें तसा दौलत्या तजेलदार दिसायचा. लहान-लहान म्हणतां म्हणतां दौलती सरळत चालला होता. होतां होतां तो चांगला निबर झाला अन् लहानसहान फडावर कुस्त्या मारूं लागला. आप्पा पैलवान म्हणे, "ह्यो पोरगा माज्या आखाड्याचं नांव समद्या मानदेशांत गाजवील."

दौलतीला घरीं खायला जरी बेताचें असे तरी त्याची भरपाई दुसरीकडून होई. त्याची मावळण मोठी गबर होती. तिनें त्याला एक "गै" दिली होती. खेडेगांवाला गाय पाळणें म्हणजे

कांहीं फारसें अवघड नसतें. पण दौलतीची मावळणच त्या गाईचें सगळें करी. मात्र सकाळ-संध्याकाळ दौलती धारोष्ण दुधाची ताजी चरवी तेवढी झोकून जाई. दौलती दोन वाजेपर्यंत आपला धंदा करी. त्या दिवसांत दर डोईला केवळ एक पैसा मिळत असे. मोठीं माणसें दोन पैसे देत. एकादा शोकिन अंमलदार, नाहीं तर गुलभिशा राखलेला पेणसलवाला 'लस्करचा जमादार' चार पैसे देई. पण तेवढ्या सकाळांत जे काय सात-आठ आणे मिळत तेवढें दौलत घरीं नेऊन भागूच्या हवालीं करी. पण दौलतीला आणखी एक कुणगा मिळाला होता. त्याच्या वांटणीला चारसहा बिघे आलेले होते. येसाबाईच त्यांची वहिवाट करी; अन् वर्षाच्या वर्षाला सुगीच्या वेळीं चारदोन पोतीं आरगडी, नाहीं तर बाजरी ती दौलतीच्या कणगींत आणून ओती. दौलतीचें चांगलें चाललें होतें.

भागूसुद्धां उगीच आपली नवऱ्याला बायको होती असें नाहीं. खेडेगांवच्या मानानं ती बरी दिसे. घराला परडें बरेंच मोठें होतें. तिकडचीं सगळींच घरें धाब्याचीं अन् गरिबांचीं घरें तर कच्च्या विटांचीं. पण भागूचा कामाचा तडाका मोठा. येवढें परडें अन् घर; पण भागूनें दोन्हीं अगदीं तुकतुकीत ठेवलीं होतीं. भिंती मातीनं अन् जमिनी शेणानं सारसारवून भागूनं अगदीं लखलखीत ठेवल्या होत्या. अंगणांत दोन शेरड्या असत. हातांत आकडी घेऊन गांवाबाहेरच्या झाडांचा पाला भागू स्वतः पुष्कळदां आणी. पुढच्या निऱ्यांचा दांडगा झोळ एका हातानं सावरीत आणि पदर दातांत धरून, सडकेकांठच्या सरकारी झाडांकडे रोख लावून ती पहात चालली असली म्हणजे सरकारी माणसेंसुद्धां तिला चमकावायास कधीं धजलीं नाहींत.

गांवाला पाण्याचे हाल फार; पण यांना पाणी किती लागणार! अगदीं पहांटे ओढ्यावरून परत येतांना दौलती दोन खेपा करी. सडासारवणाला लागे तें भागू गांवांतल्या खाऱ्या विहिरीचें आणी. भागूचा हात सारखा फिरत असल्यामुळें घरांत लक्ष्मी नांदत असे. हें सगळं भागूला कसं कळूं लागलं कुणास ठाऊक ? भागूला आई ना बाई; तिला आईही नव्हती अन् बापही नव्हता. आधीं आई मेली अन् मग बाप मेला. भागीच्या बापाचं अन् येसाबाईचं काय नातं होतं तें आतां आठवत नाहीं; पण मरतांना त्यानें ही आपली पोर येसाबाईच्या पदरांत घातली होती येवढं मात्र खरं. येसाबाई चांगली कनवाळू बाई होती. तिनें भागूला खाऊंपिऊं घातलें; तिचं न्हाणंधुणं केलं; तिला लहानाची मोठी केली. पण येसाबाईला टापटीप कशी ती सगळ्या जन्मांत कळली नव्हती. तिच्या अंगाप्रमाणें तिच्या घराचाही फापटपसारा फार. तिला कसलीही आवरशक्ती नव्हती. पण भागी जरी या बाईच्या घबडग्यांत वाढली होती तरी तिला स्वच्छता नीटनेटकेपणा फार कळे. आपलें घर ती अगदीं आरशा-सारखें ठेवी. दौलत अन् भागू म्हणजे मोठा चखोट जोडा होता. भागूच्या अंगाखांद्यावर विशेष कांहीं नव्हतें; आणि गिऱ्हाइकाच्या डोक्याला लागतें म्हणून दौलतीनें आपल्या हातांतलें चांदीचें कडेंही काढून ठेवलें होतें. नुसत्या शरीराच्या रसरशितपणानेंच तीं दोघें शोभिवंत दिसत.

येसाबाईच्या घराच्या पलीकडे दहापांच हातांवर त्यांचाच एक—जातवालाच म्हणावयाचा—रहात होता. तो येसाबाईच्या घरीं जातयेत असे. विशेष घरोबा होता असें मात्र नव्हे. हा एक माबडा गृहस्थ होता. केव्हांही पहा, खालचा ओंठ लोंबत असा-

वयाचा आणि तोंडांत उरलेले दोन सुळे दोन बाजूला त्याच्यावर आलेले असावयाचे. येसाबाईला हा आपल्या घरीं यायला नको असे. पण तो मात्र वेळ सांपडला कीं तिच्या घरीं यायचा. येसाबाई हें कसं, येसाबाई तें कसं, असं कांहींतरी बोलणं काढायचा अन् मग बोलण्यानं बोलणं वाढवीत बसायचा. येसाबाई तुटकपणानें बोले; पण याच्या तोंडांतली लकडी कधीं संपायची नाहीं. हा आपल्या घरीं सारखा येतो, तर लोक काय म्हणतील असें येसाबाईला वाटे; म्हणून ती पुष्कळदां घुम्मच बसे; पण याचें लुलुपुतु संपावयाचें नाहीं. दुसरें कोणी असलें म्हणजे हा फारसें बोलावयाचा नाहीं. पण येसाबाई एकटी असली कीं दाताओठांची कसलीच आडकाठी नसल्यामुळें याची जिभली सारखी लवलव करी. भागू लहान असल्यावेळची ही गोष्ट आहे. त्याच्या चिकटपणाचें शेवटीं येसाबाईला हंसें येई. तो गेल्यानंतर ती तिरस्कारानें हंसून शेजारच्या आयाबायांना म्हणे.—

" मेला जुनऱ्या त्यो जुनऱ्या ! आन् म्हनृतो कसा, येसाबाई तुमची भागी माज्या जान्याला द्या ! आतां बया, तुमीच सांगा, असं कुनी केलंया का ? पर ह्या मुरदाडाला कळल तवा ना ! जरा हाकुंट तकुंट आला मजी आपला पुना म्हन्तो, माज्या जान्याला तुमची भागी द्या ! आतां या काराला काइ करावं ! आमची भागी काय वाटवर पडलीया ! आर तूं जुनरी, आन् आमची प्वार मांगतुस ? "

शेजारणी म्हणत,—"लइ कसनुस इचारतु ह्यो ! अव, आपून कोन् आन् ह्यो कोन् ! त्येला वाटतया आपून बी कारागीर अन् हे बी कारागीर ! पन् बाय, त्यो आन् आपून सारकं कसं व ?"

" कसं बोललां चिमाई तुमी ! माजं खरं का खोटं ? ह्येनं असं येळ तिनदां इचराव काय व ? " येसाबाई पुन्हा म्हणे.

असे संवाद अनेकदां होत. पण त्या भावड्याला लोभ सुटत नसे. त्याला वाटे कीं, आपल्या जानूला येसाबाईची भागी मिळावी. असें कित्येक दिवस चाललें होतें. शेवटीं भागी जरा टवटवीत दिसूं लागतांच येसाबाईनें भागीचें लग्न आपल्या 'पुतन्याशीं' लावून टाकलें. भागीला पुढें दोन वर्षांनीं पदर आला.

जानूसुद्धां दौलतीच्या 'शिन'चा म्हणजे वयाचा होता. तोही आप्पा पैलवानाच्या तालमींत जात असे. तालमीच्या हौद्यांत या दोघांची लढत मोठी तडफेनें होत असे. दौलत फार दांड आणि सकत पोरगा; जानू शिडशिडित पण अतिशय चलाख. मात्र दमांत लवकर उखडत असे. तरी, धोबी पासोडी आपटतो तसा, एकाद्या वेळीं चुरशीला पेटून तो दौलत्यालासुद्धां मातींत रप्पकन् उताणा आपटीत असे. क्रिकेटच्या डावांत जसा एकादा चुणचुणीत बोलर दोनचारच फैरी टाकतो, पण तेवढ्यांत चांगल्या-चांगल्यांच्या दांड्या उडवितो तसा हा जानू आपल्या चपळाईच्या बळावर प्रसंगीं दुपटीतिपटीच्या गड्याची अब्रू घेई. यामुळें 'कार्टे काय करील कुणास ठाऊक' असा कौतुकाचा शेरा मारून जो तो त्याला बिचकून असे. गळ्यांत काळा गंडा, दंडांत बारकासा ताईत, तांबड्या मातीनें घासून निघत असलेली आणि मालिस्तीनें नितळ बनलेली त्याची लालवट शरीरकाठी, चेहेऱ्यावरून घरघरून आलेलें त्याचें नाक, बाळपण संपून तरुणपणाची जागृति मिळालेल्या त्याच्या पिळदार दंडमांड्यांतील स्नायूंची वस्तशीर नाचानाच, आणि डोळ्यांतील पिंगट छाया हीं पाहून, तो हौद्याच्या कडेला टेकून उभा असला म्हणजे कुणालाही आनंद वाटे. डाव्या डोळ्यांतील बुबुळ एकाद्या वेळीं जास्तच कोपऱ्यांत नेऊन पहाण्याची त्याला खोड असल्यामुळें पहाणाराचें लक्ष त्याच्याकडे विशेषच जाई.

आप्पा पैलवान् मात्र, इतकें असूनही, त्याला थोडें हिडिस-फिडिस करी. तें पाहून बाकीचीं मुलेंही तसेंच करीत. असें झालें म्हणजे लहानपणीं तो नुसतीच चुळबुळ करी; पण पुढें जसजशी त्याच्या अंगांत रग वाढूं लागली आणि तो मस्त होऊं लागला तसतसा तो वस्तादाकडे गुर्मीनें पाहूं लागला आणि इतर पोरांना टाफरून बोलूं लागला. आप्पा पैलवान त्याला सगळ्यांच्या देखत 'ए जुनऱ्या' म्हणून हाक मारी आणि तो आखाड्यांत नसला म्हणजे बाकीचीं मुलें एरवीं बोलतांनाही त्याचा उल्लेख 'जुनऱ्या जुनऱ्या' म्हणूनच करीत. हें जानूला माहित होतें; अर्थात् तो मनांतून चिडलेला असे. एखाद्या वेळीं त्या किचकट पोरांना तो दरडावून म्हणे, "ल्येकाच्यांनू, येकेक कानपडांत मारीन तर पानी मागू येयाचा न्हाइ; याद धरून असा; जान्याशीं गाट हाय. येकाद्या दिवशीं मुडदा पडल." वास्तविक पहातां त्या पोरांना कांहींच माहित नसे. एक दुसऱ्याला विचारी, 'कां रे! जुनऱ्या म्हणजे काय रे? आप्पा पैलवान जान्याला जुनऱ्या कां म्हणतात रे?' दुसरा म्हणे, 'लेका मला तरी काय माहित! सगळीं म्हणतात म्हणून मीहि म्हणतों!' कोणी म्हणे कीं 'जान्या' ह्याचंच लाडकं नांव जुनऱ्या असें केलेलें आहे; पण दुसरा कोणी म्हणे, "तसं नाहीं; त्ये न्यारंच हाय!"

जानूच्या घरचें चांगलें डगडगीत होतें. म्हाताऱ्या धोंडिबानें धंदा केलेला कुणी पाहिला नव्हता. जानूनें तर कुस्तींतल्याशिवाय कुणाच्या डोईला कधीं हातही लावला नव्हता. पण धोंडिबा आणि जानू दोघेहि थोड्या इतमामानेंच रहात. पण हें सारें खरें असलें तरी 'जुनऱ्या जुनऱ्या' हा अपशब्द त्याला उद्वेग आणी. आपण कांहीं तरी कमी आहों याची गुप्त जाणीव त्याच्या मनाला खात असे.

वाटेनें जातांना, ते पलीकडे दोघेतिघे बोलत उभे आहेत ते आपल्या-संबंधानेंच कुजबुजत असावेत, असें त्याला वाटे. आपण केवळ ‘ जुनरी ’ म्हणून भागी आपल्याला मिळाली नाहीं याची हळहळ त्याला उत्पन्न झाली होती. आपल्या नांवाशीं बिलगलेला हा जुनरे-पणाचा डाग कसा धुवून टाकतां येईल याची विवंचना त्याला लागली होती. कधीं काळीं आपल्या घरांत असला धंदा असला तरी लोकांनीं अन् जातवाल्यांनीं त्याची इतकी आठवण ठेवावी याचा त्याला विस्मयही वाटे. पण कांहीं इलाज नव्हता. बाप धोंडिबा थकत चालला होता. त्याचे उरलेले दोन सुळेही आतां पडले होते. आणि आतां तर, तो काय म्हणत आहे हें सराइताशिवाय इतर कोणाला समजणें अवघड झालें होतें. आपण आतां पोरके होणार याची जाणीव जानूला हळूहळू होऊं लागली होती. एकीकडे लोकांच्या मनांतली आपल्याविषयींची तिरस्कारबुद्धि व दुसरीकडे पुढें दिसत असलेला पोरकेपणा या दोन विचारांनीं जानू अगदीं गडबडून गेला होता.

एके दिवशीं, बहुधा तो अमावास्येचाच दिवस असावा, धोंडिबाचा जीव फारच घाबरला. त्याला वाटूं लागलें कीं, आतां आपलें आटपत आलें. तुकडा करून घालायला घरांत एक बाई होती. तिनें त्याची घालमिल पाहिली अन् जानूला आखाड्यांतून बोलावून आणला. त्याला जवळ घेऊन धोंडिबा कळवळून म्हणाला “ जानू, ए माझ्या जानू, तुजी आय मरूनशान लइ वर्सं झालीं. तुला पोटाशीं धरूनशान न्हानाचा मोटा क्येला. आतां मी बी मरतु. जानू, तूं ध्येनांत ठिव; आपून जुनराकडचं; नासकाकडचं. अरं समदं न्हाइच; कारागीरच; पन कुनी कुनाची डुई करतं, कुनाची करित न्हाइ : आपूनबी बाप–आजं करीत व्हत, त्येच

करीत व्हतों : पन् हाकुडल्या मुलकाला आपल्ये जातवाले आपल्याला कमी ल्येकत्यात : 'जुनरी जुनरी' म्हूनशान् म्हन्त्यात. अरं ह्ये बामन-म्हराटी ह्येंची भादारत्यात : आपून जो येईल त्येची भादरत व्हतु : पन् त्येवढ्यापायीं आपनास्नी न्यार समाजत्यात, आन् आपल्याशीं सोयरिक करीत न्हाइती."

जानू मधेंच म्हणाला, "हाइ ठावं समदं! ह्ये जातवाल बी ठाव हायती आन् संमदी बी ठाव हाइती; पन् बाबा, जुनराकुट हाकड कशापायीं आलां तुमी?"

"अरं, तुला काय सांगू?" म्हातारा खोकूं लागला : तो धापा टाकीत म्हणाला, "त्येची गोष्ट बी लइ न्यारी. अरं, त्येला लइ वर्सं झालीं : तुज्या तालमींत त्यो तमांच्या पैलवान हाय ना? हाय कां न्हाई?"

"हाय, हाय; त्यो नित लडिवतुया आमास्नी."

"हंग त्योच : त्येच्या शिनचा मी असन; तवा नासकाकडं अन् जुनराकडं लइ मारामारी झाली. मारवाडी याजबट्टा करीत व्हतं; त्येनी बग गरीबाच्या जमिनी पार घशांखालीं घातल्या. समदं कुनबी पार रिकामं झालं : आन् मंग जवा रान प्येटलया तवां येका मारवाड्याचं नाक जाग्याला न्हाइना : बगाव त्या मारवाड्याचं नाक ग्येललं!"

"मंजी! कुनब्यांनीं नाकं कापलीं मारवाड्यांचीं?"

"हां हां तर, तूं ऐकतुयास काइ!" म्हातारा धापा टाकीत पण अर्धवट हसत म्हणाला, "येका सावकाराचं नाक न्हाइलं न्हाइ ठान्याला"

"पन् बाबा आपून कां हाकडं आलुं? तुमची सावकारी व्हती?"

" हा लेका ! आपली सावकारी कुटली रं ! पन त्येचं असं झालं ! सरकारनं या कुनब्यासनीं धरलं; आन् ' नाकं कशानं कापलीं ' मूनशान लइ न्याट लावलं : त्ये म्हंगाल, ' वस्तन्यानं ! ' ' अरं वस्तारं कुणी दिलं ? ' त्ये म्हंगालं, ' न्हाव्यांनीं दिलं ! ' आन् मग पोलिसाचं शिपायी न्हाव्यामागं लागल ! तवां आमुशाच्या रात्रीं कारबारीन, मी, आन् याक धाकला भाऊ ज्ये तकुंड न्हाटलु त्ये कस ना कसं हतं येऊनशान ऱ्हाईलु. त्येवाच्या घरनं हातच ऱ्हातुया ! " म्हातारा बोलून जास्तच थकूं लागला. म्हणून जानूनें त्याला गप्प केलें व तो त्याच्यापाशीं बसून राहिला.

जानूला ही हकीकत ऐकून मोठी गंमत वाटली; आणि त्या गोष्टीला आज तीस वर्षें झालीं तरी जुनेरेपणाचें भूत कसें मागें लागलें आहे हें त्याच्या ध्यानीं आलें. म्हातारा बोलला नाहीं; पण त्या धंद्यावर त्यानें चांगला पैका मिळविला होता; आणि टुकीच्या रहाणीनें त्याच्यापाशीं अजून चांगली माया शिल्लक राहिली होती. म्हणून तर कसलाही धंदा न करतांहि त्याला ठाकठिकीनें रहातां येत होतें. हळूहळू इकडल्या रानाला त्यानें बरीच जमीन घेतली होती; अन् कुळाडाळाशीं भलेपणानें वागून आपला जम त्यानें चांगला बसाविला होता. जानूला अर्थातच पोटाची काळजी नव्हती. पण म्हाताऱ्याला वाटे, ' माज्या जान्याच दोन हाताचं चार हात कंदी व्हत्याल ! ' पण याला इलाज काय ? बाकीचे येथले न्हावी त्याला कमी लेखीत. त्यामुळें हा योग कुठेंही जमेना. म्हाताऱ्यानें पुष्कळ खटपट करून पाहिली; पण त्याचें बोलणें कोणीही जातवाला पतकरीना. जानूलाही आपल्या हीनपणाची रुखरुख जास्तच वाटूं लागली. जों जों जास्त नकार यावे तों तों आपण खरोखरीच हीन आहों असें त्याला वाटूं लागलें. म्हातारा त्याची समजूत

घाली; " जमल कुठें तरी " असें तो म्हणे. पण जानू जास्तच उद्विग्न होत चालला. होतां होतां म्हाताऱ्यानें जिवाची आशा सोडली. त्यानें जवळ काय होतं नव्हतं तें त्याला दाखविलं. माजघराच्या दाराआडच्या भिंतीकडे नेहमीं लक्ष ठेवावयास सांगितलें. शेतवाडीच्या कागदाचा रुमाल त्याच्या हवालीं केला. जोग वकीलाची मर्जी नेहमीं राखीत जा म्हणून सांगितलें. सैपाकाच्या बाईला अंतर देऊं नको म्हणून बजावलें अन् एके दिवशीं पहांटे चाराच्या सुमाराला म्हताऱ्यानें ' राम ' म्हटलें.

जानू आतां अगदीं उघडा पडला. त्याला घर होतें, शेत होतें, करून घालायला माणूस होतें, पण त्याचें असें आतां कुणीच राहिलें नाहीं. येसाबाई आपल्याला कमी लेखते हें त्याला माहित होतें; पण माणसाला कुणी तरी हवें असतें. तो तिच्याकडे जास्तच जाऊं-येऊं लागला. येसाबाई एकटीच होती. या पोराकडे पाहून तिला वाईट वाटे; पण जातीबरोबर माती खावी लागते. ती त्याला कमी लेखी. मनांतून मात्र तिला वाईट वाटे. म्हाताऱ्याचा ती तिरस्कार करी; पण या पोराचें पोरकेपण पाहून तिला दुःख होई. पण आतां ती तरी किती जगणार होती ? तिचेंही वय झालें होतें. जानू कमी खरा, पण पोरका, अन् बाप केवळ भाबडा होता. यामुळें येसाबाईचा त्याच्यावर जीव असे. धोंडिबा मेल्यावर तर तिला त्याचें अगत्य जास्तच वाटूं लागलें. येसाबाई भारी प्रेमळ बाई होती. पोटीं पोर-बाळ नाहीं; जवळ डबोलें चांगलें; अर्थात् इतरांच्या पोरावर ती ममता करी. पण जों जों जानूची घसट येसाबाईकडे वाढूं लागली तों तों दौलती आपल्या मावळणीवर मनांतून फार नाराज होऊं लागला. भागीसुद्धां थोडीशी फुरंगटल्यासारखी करूं लागली. दौलत्याला

वाटे कीं, हा आखाड्यांत माझ्याशीं चुरस करतो तो करतो; अन् आतां माझ्या मावळणीलाही त्यानं आपलीशी केली आहे. पण म्हातारीनें हें पुतण्याचें रागावणें मुळींच मानलें नाहीं. जानूच्या तोंडाकडे पाहिलें म्हणजे तिची तहानभूक हरत असे; अन् तिला त्याची दयाही येई. म्हणून आपलें सरत आलें असें पाहून तिनें मनाचा निश्चय केला, अन् एके दिवशीं रात्रीं जानूला बोलावून आणलें. त्याला एकांतांत घेऊन तिनें त्याला एक डबा दिला अन् म्हणाली, "जा घे जा, तुला; पण कुणाला सांगू नको." जानू तिची पूसतपास जास्तच करूं लागला. पण पूसतपास केल्यानें दुखणेकरी माणूस काय बरें होतें ? येसाबाई म्हातारी झालेली; ढकललेली भिंत; एके दिवशीं उचकी लागली; चार दिवस झाले उचकी थांबेना; सारजाबाईची मात्रा दिली, दामूभटाची पुडी आल्याच्या रसातनं दिली; देवरुशाचा अंगारा झाला; अंगांत आलेल्यानं कोंबडं मागितलं तें मारलें; पण उतार पडेना. एकादशीला दुपारीं तिनें जानूला धाडून दौलतीला अन् भागीला बोलावून आणलं अन् जानूला म्हणाली, "तूं जा आपल्या घरीं; माझीं पोरं माझ्यापाशीं आतां असूं दे." जानू गेल्यावर, तिनं उशाखालीं ठेवलेला दुसरा एक डबा काढला अन् म्हणाली, "अग भाग्ये, ये दौल्या ! अरं ह्ये समदं तुमचंच हाय; मी आतां जात्ये." कांहीं वेळानं म्हातारीनं प्राण सोडला.

धोंडीबा मेला, येसाबाई मेली; पण कोण कोणासाठीं थांबतो ? भागीचा प्रपंच सुखानें चालू राहिला. दौलतीचा धंदा, त्याची शेतवाडी, त्याची गै या सर्वांचें बरें चाललें होतें. आणि म्हातारीनें दिलेल्या डबोल्याचा उबारा चांगला असल्यामुळें त्यांना कसलीही काळजी राहिली नव्हती. तिकडे जानू मात्र आपल्या आढ्याखालीं एकटाच राहिला होता; त्याला आतां जास्तच एकलकोंडेपणा आला.

आतां त्याचें असें कोणी राहिलें नाहीं. ती म्हातारी तुकडा करील तेवढा चावावा; सकाळ संध्याकाळ जोर–जोडी करावी, शेतीवाडीवर जावें; जनावरांना कुरवाळावें आणि रात्रीं कंटाळा येईपर्यंत वाशांकडे बघत उताणें पडून केव्हां तरी झोपी जावें; असें त्याचें चाललें होतें. पण जीवितांत सारखे फरक पडत असतात.

खाण्यापिण्याची बख्खळ सोय असल्यामुळें दौलत मोठाच मल्ल बनला. भोवतालच्या पट्टयाला त्याच्या नांवाचा धाक उत्पन्न झाला. त्यालाही आपल्या शक्तीची घमेंड वाटूं लागली. तो सडकेला शेजारून चालला असला तर आजूबाजूचीं माणसें सरळ समोर पहात जाऊं लागलीं. त्याच्या डोळयाला डोळा लावून पहाणें कठिण होऊन बसलें. आप्पा पैलवानही त्याला बिचकूं लागला. भागीला मात्र त्याचा कसलाही जाच नव्हता. दोघें मोठीं सुखानें नांदत होतीं. दौलतीच्या प्रतिष्ठेबरोबर भागीचीहि प्रतिष्ठा वाढत होती. मान वर करून तिच्याकडे कोण पहाणार ? जानू मात्र इकडेतिकडे केव्हां हिंडतांना ती दिसली तर तिच्याकडे पाहिल्याशिवाय कधीं राहिला नाहीं. आणि तिलाही तें ठाऊक होतें. आणि जीवितांत सारखे फरक पडत जातात हें खरेंच आहे.

तालमीच्या पुढें असलेल्या मोकळ्या पटांगणांत दगडाच्या लहान–मोठ्या गोट्या पडलेल्या असत. 'गोट्या' म्हटलें तरी जास्त भडक शब्द नाहीं म्हणून गोट्या म्हणावयाचें इतकेंच. कांहीं मोठाल्या गोट्या कवळा भरून असत. या गोट्या उचलणें हाही एक पैलवानकीचा प्रकार असतो. सगळयांत मोठी गोटी येवढी जड होती कीं तिचा खालचा भाग मातींतच लपलेला असे. इतर गोट्या कोणी ना कोणी उचली; पण ह्या गोटीला कोणी हात घातला नव्हता. आप्पा पैलवान भर ज्वानींत असतांना त्यानें ही

केव्हांकेव्हां उचललेली होती. एके दिवशीं दौलतीची कुस्ती होऊन मंडळी परत तालमींत आली. दौलतीनें जंगी फडावर कुस्ती मारून हजाराचा तोडा मिळविला होता; म्हणून जिकडे तिकडे त्याची तारीफ चालली होती. त्यानें पाडलेल्या गड्याचा बोजा फार मोठा. येवढा गडी खांद्यावरून उरफाटा आपटणें साधें काम नव्हतें. पण दौलतीनें तें केलेलें होतें. इतक्यांत कोणसें म्हणालें, 'ही गोटी उचलली तर मात्र खरी शामत आहे. माणसाला कुणीही उचलील; पण ही गोटी उचलून दाखवावी.' दौलतीच्या कानावर हे शब्द गेले. गर्दन मागें वळवून त्यानें पाहिलें आणि तो गर्जून म्हणाला, "उद्यां तुमाला त्ये बी दावतों ! बगाया संमद लोक या." ही गर्जना ऐकतांच मोठीच गजबज झाली.

गावांत जिकडेतिकडे हें वर्तमान पसरलें आणि दुसरे दिवशीं पांचाच्या सुमाराला सगळा गांव हा प्रकार पहावयास लोटला. सर्वांच्यापुढें तालमींतले पैलवान बसले होते; दौलती त्यांच्याही पुढें बसला होता. इकडे तिकडे पाहून, अंगाभोवतींचें तांबडें झालेलें उपरणें मागें टाकून देऊन, दौलती 'जय बजरंग' करून जेव्हां ताडकन् सर्वांपुढें उभा राहिला तेव्हां सगळी सभा तटस्थ झाली. गांवकऱ्यांनीं त्याची कीर्ति पुष्कळ ऐकली होती; पण मुद्दाम तालमींत जाऊन त्याच्याकडे कोण पहातो ? मात्र आतां त्याचा तो प्रचंड देह पाहून माणसें भय आणि आश्चर्य यांनीं भरून गेलीं. म्हातारे एकमेकांत म्हणाले, "अरं आपल्या त्या बहिरू न्हाव्याचा ल्योक न्हवं का-दौल्या, दौल्या म्हनायचा !" "हां, हां त्ये प्वार !" पण आतां ऐकायला अन् बोलायला वेळ कुणाला होता ? जो तो दौलतीच्या त्या भीषण अविर्भावाकडे पहात होता. त्यानें दहा-पंधरा दंड काढले, दहा-पांच उठाबशा काढल्या. त्याबरोबर त्याच्या

अंगांतल्या बळवाहिन्या टरारून उठल्या आणि तो गोटीजवळ गेला. कवळा करून त्यानें एकदोनदां गोटी हलविली. त्याच्या अभिमानी माणसांनीं भीतीचा आवंडा गिळला. मग ती गोटी त्यानें गुडघ्या-पर्यंत उचलून सोडून दिली. "छया, त्ये काम साद न्हवं!" कोणी कुजबुजले. पुन्हां अवसान धरून त्यानें ती कमरेपर्यंत आणून सोडून दिली अन् तो तटकन् बाजूला झटकला; आणि त्यानें जोरानें दंड ठोकला. माणसांच्या अंगावर शहारे आले. आपापलीं अंगें सावरून अन् माना पुढें झोकवून लोक पाहूं लागले. त्यानें ती गोटी पुन्हा उचलली; आणि छातीपर्यंत आणून किंचित् झोकून पुढें लोटून दिली. दौलतीचे बरोबरीचे पैलवान पुढें झाले आणि त्यांनीं त्याच्या अंगाची थोडी मालिस्ती केली. आप्पा पैलवान् "जिते रहो" म्हणून ओरडला. दौलतीनें जोरजोरानें काडकाड दंड ठोकले आणि झेप घालून तो पुन्हां गोटीकडे गेला. खांद्यावरून गोटी मागें टाकली म्हणजे झालें हें सर्वांना माहीत होतें. आतां तेवढेंच राहिलें होतें. दौलतीनें ती गोटी छातीपर्यंत पुन्हां आणली, त्याच्या शिरा जाग्या होऊन अशा थडथडूं लागल्या कीं वरची त्वचा तडकते कीं काय असें वाटूं लागलें. तोंडाचा खालचा जबडा मुरगळून, मान वांकडी करून, त्यानें ती गोटी खांद्यापर्यंत नेली; आणि 'भले जवान, भले जवान, भले बहाद्दर!' या आरोळ्यांच्या कल्होळात ती त्यानें डाव्या खांद्यावरून मागें लोटली. पण गोटी मागें लोटून आपण पुढें झोक घेऊन जावयाचा तो दौलती गोटीच्या मागोमाग मागेंच कोसळला. त्याच्या तोंडांतून लालभडक रक्ताची गुळणी आली. ती गोटीवर सांडली अन् दौलती निश्चेष्ट होऊन दणकन् सताड मागें पडला. काय झालें हें कोणाला एकदम कळलेंच नाहीं. वडाची तोडलेली एकादी प्रचंड फांदी भुईवर आदळावी तसा दौलती आदळला. 'अरे,

ओहो, ओहो, काय ? मेला ? कोण ? दौलती मेला ? मेला ! मेला !' करीत सगळे लोक जमा झाले. 'दौलती मेला, दौलती मेला.' तालमीचें सारें पटांगण, पुराचा झोत आंत पडणाऱ्या डोहाप्रमाणें ढवळत, गजबजत राहिलें. "दौलती मेला, दौलती मेला" म्हणून सगळा गांव बोंबलूं लागला.

गोटी पडली तेथेंच अजूनही रुतून बसलेली आहे अन् दौलतीची किरत, आज चाळीस वर्षें झालीं—तिच्याभोंवतीं घुटमळत राहिली आहे.

गांवकरी आपल्या कामाला लागले; भागी तीन दिवसांनीं जागची उठली; गायीनें तीन दिवस बाटकाला तोंड लावलें नाहीं. तरी जीवित बदलत जातें हें खरेंच आहे. कोण कोणासाठीं थांबतो ?

वर्ष झालें, भागी आपल्या घरांत खिन्न मनानें दिवस कंठीत होती. एकादें लेंकरूं असतें तरी तिला थोडा विरंगुळा वाटला असता. पण दुर्दैवानें तेंहि नव्हतें. जातवाल्यांपैकीं कुणी आया-बाया येत जात, तेवढ्यानें काय थोडा विसावा वाटेल तेवढाच; दौलतीची मूर्ति तिच्या मनापुढें कायमची उभी होती. त्याचें शरीर, त्याचा दरारा, त्याची प्रीत, यांचें घवघावितपणा आणि चिवटपण इतकें मोठें होतें कीं त्यांचा विसर होणें कठिण होतें. भागी या गोष्टी विसरली नाहीं यांत कांहींच आश्चर्य नाहीं. गांवचे लोक सुद्धां विसरले नाहींत. गोटीवर सांडलेली रक्ताची गुळणी अन् जीभ बाहेर येऊन सताड पडलेला त्याचा धिप्पाड देह कोणाच्या डोळ्यापुढून हलेना. त्यांतच त्याच्या भीषणतेची आणि उग्र दर्पाची भर पडलेली. यामुळें दौलती लहानांच्या, मोठ्यांच्या डोळ्यापुढून हलेना. होतां होतां कोणी कोणी कुजबुजूं लागले कीं, आखाड्याच्या अंगणांत दौलती केव्हां केव्हां दिसतो! पलीकडे चिंचेचें

झाड होतें. त्याच्या दोन फांद्यांवर दोन पाय ठेवून आणि वरच्या पालवींतून डोकें वर काढून तो त्या फांद्या 'अमुशीच्या' रात्रीं हलवीत उभा राहिलेला आम्ही पाहिला असें कोणी-कोणी सांगूं लागले. कोणी म्हणाले, भागीला भेटायला तो रात्रींचा येतो; अन् पहाटेचा झटकतांना कोणी कोणी पाहिला आहे. अशा भुमका सारख्या उठूं लागल्या. मुलें तर जिवंतपणीं त्याच्याकडे पहावयास भीत. त्यांत या भुमकांची भर पडल्यावर तर भर दिवसां आखाड्यांत एकटीं-दुकटीं यायला तीं भिऊं लागलीं. चिंचेकडे पहाण्याची तर कुणाची छातीच नव्हती. पहाटेच्या वेळीं दौलती आखाड्यांत येऊन मेहनत करून जातो अशी गुणगुण चालू झाली. मर्दासारखे मर्द गडी पण ते पहाटे येण्याचें टाळूं लागले. जानू त्यांतलाच. पहाटे मेहनतीला येण्याचें त्यानें अगदीं टाकलें. दौल्या जिवंत असतांनाची त्याची चुरस जानूला माहीत होती. दौलती प्रचंड पुरुष झाल्यावर त्याच्या मनाला बसलेला धस्का कायमच होता. येसाबाईकडचें आपलें लागतेपण याला खपत नाहीं याचें स्मरण जानूला होतेंच. आपल्याला भागी मिळावी ही धोंडीबाची खटपट त्याच्या ध्यानांत होती. भागीकडे आपण पाहतों हें भागीनें ओळखलें आहे हेंही त्याला कळून चुकलें होतें. भागी निष्ठावंत आहे हेंही त्याला माहित होतें. पण दौलती झुटिंग झाला आहे या कुजबुजीनें तर त्याच्या मनांत कायमचा तळ दिला होता. त्यानें पहाटे मेहेनतीला येण्याचें अगदीं सोडून दिलें.

आपण म्हणतों कीं खेडेगांवचीं माणसें चांगलीं, निरागस, आणि सालस असतात. शहरांतल्या बजबजाटाला आणि उपरेपणाला कंटाळलेल्यांनीं असें म्हणावें. पण खेडेगांवांत रहावें म्हणजे खेडेगांवचा इंगा कळतो. विधवा होऊन खेडेगांवला निर्भयपणानें रहाणें तितकेंसें

साधण्यासारखें नसतें. या माणसाला कोणी नाहीं, हें निराश्रित आहे, अन् आपल्याला तें हवेंसें आहे असें वाटत असलें म्हणजे त्याच्या मागें लागावयास भय किंवा लाज न बाळगणारे खुशालचेंडू पोरे आणि फुकटखाऊ ऐतोबा तिथें वाटेल तितके असतात. ते मग जात म्हणावयाचे नाहींत, गोत म्हणावयाचे नाहींत, कुचाळी करावयास भ्यायचे नाहींत आणि अंगाशीं येण्यासारखें नसलें तर याच्याही पुढें जायला मागें घ्यायचे नाहींत. भागीला आपला गांव चांगला माहीत होता. ती पाण्या-उदकाला निघाली म्हणजे तिच्या मागें कांहीं अंतरावर रहावें आणि वाइटवांकडें बोलावें; वाण्याच्या दुकानाकडे ती निघाली म्हणजे आपण तिथें आधींच जाऊन बसावें व ती येऊन दुकानापुढें असेतोंपर्यंत मुद्दामच तिच्याकडे पहात रहावें; कवाड उघडें टाकून ती थोडीशी इकडे तिकडे गेलीशी पहातांच तिच्या घरांत जावें व तेथून आपण बाहेर पडत आहों असें परत बाहेर निघून इतरांना दाखवावें; असले प्रकार हे चावट लोक फार करूं लागले होते. तिचें थोडेंसें शेतवाडेंग होतेंच. त्यांत मुद्दामच गुरें घालावीं आणि मग तीं मोठ्या तरतुदीनें आपण परत पिटाळीत आहों असें दाखवावें; भुइमुगाच्या वेलाचा भारा तिनें बांधला म्हणजे वेळेवर पुढें होऊन हात लावण्याची तयारी दाखवावी; तिची गाय मुद्दामच कोठें तरी पिटाळून द्यावी आणि मग मोठ्या संभावितपणानें रात्रीच्या वेळीं दारांत आणून सोडावी अन् "भागाबाई, गै आली व—" म्हणून आरोळी ठोकावी असेही प्रकार कोणी करीत. भागीला हा मोठा जाच झाला होता. काय करावें हें तिला कळेना. एक गोष्ट मात्र तिच्या ध्यानांत येऊन चुकली होती कीं आपल्याला असल्या तऱ्हेनें छळायला हे लबाड लोक भलत्या वेळीं किंवा भलत्या ठिकाणीं आले म्हणजे जानू हा लांब कुठें तरी टेहळत असावयाचा.

तो तिच्याशीं कधीं एक अक्षर बोलला नव्हता. पण आपल्यावर त्याची पाखर आहे हें ती उमगली होती; पण तिनें त्याची ओळख मात्र त्याला कधीं दिली नव्हती.

होतां होतां गुंड लोक फारच चेकाळले. त्यांचा म्होरक्या गांवातला एक बाबण म्हणून होता. बाबण मोठा उरफाटया काळजाचा, काय वाटेल तें करायला न भिणारा होता. प्रतिकार होत नाहीं असें दिसलें म्हणजे त्या माणसाला तो प्रतिकार करावयाची इच्छाच नसते असा त्याचा समज झालेला होता. वर सांगितलेल्या प्रकारापेक्षां विपरीत अशा कांहीं गोष्टी तो शब्दांनीं आणि वाकुल्यांनीं करीत असे. हळूहळू हा बेफाम होत जाणार असें स्पष्ट दिसूं लागलें. भागूला फार विवंचना पडली. या माणसाचें अंग मोठ्या वाडसी दरवड्यांतही असतें असा गुप्त बोभाटा सर्वत्र असे. अर्थात् हा काय करील अन् काय नाहीं याची चिंता भागूला सारखी वाटे. खेडेगांवाला पोलिसाचा पाय, कधीं सठींसहामाशीं लागला तर लागायचा पण बायकांच्या जातीला सगळेंच अवघड असतें. एकाद्याच्या आड पडायला जावें तों तोच गळा कापतो. यामुळें कवाडें नीट लावून भागू एकटीच खबरदारीनें रात्र काढी. कोठें कांहीं खुट् झालें कीं ती उठून काडी ओढी अन् इकडे तिकडे पाही. आधींच करपलेला तिचा देह या काळजीनं, अगदीं चोपून गेला.

हस्त नक्षत्र होतें. आभाळांत ढगांची थाप दाटली होती. देशावर हस्ताचे पाऊस फार तुफान असतात. अंधार किट्ट पडलेला होता. रात्रीं साडेबाराचा सुमार असावा. पडून गेलेल्या पावसाचा खळखळाट जिकडेतिकडे चालू होता; आणि मधून मधून एकादी सर अजून येतही होती. अवघा गांव चिडीचिप झालेला होता. भागू अर्धवट झोंपेंत होती.' तों बाहेरच्या दारावर कोणी तरी टिचकी

मारीत आहेसें तिला वाटलें. अंथरुणावरून उठून ती टवकारून ऐकूं लागली. पुन्हा टिचकी ऐकूं आली. ती दार उघडून अंगणांत आली. पुन्हा थाप वाजली. त्यांत कांहीं अर्थ उमटविण्यासारखी थाप ती होती. तिला वाटलें दार उघडावें. वास्तविक तिनें उघडावयास नको होतें. पण एकदां या भाजाकाराचा निकाल लावलाच पाहिजे असें तिच्या मनानें घेतलें. ती अगदीं कंटाळली होती ! 'आला आंत कुणी तर जोरानं ओरडेन' असें ती मनाशीं म्हणाली. आणि खोटें धैर्य धरून अडसर काढून तिनें दार उघडलें. तिचें भय खरें ठरलें. घोंगडें तोंडावरून घेतलेला एक माणूस सपकन् आंत आला, अन् त्यानें दार दपटून आडसर लावून घेतला. भागू गांगरून गेली. ओरडणेंसुद्धां सोपें काम नसतें. आतां ती ओरडणार तों त्या माणसानें घोंगडें टाकून दिलें आणि एक नाकेला, लालवट, सडपातळ, देखणा माणूस डाव्या डोळ्यांतलें बुबूळ अगदीं कोपऱ्यांत नेऊन तिच्याकडे पहात राहिला.

जानू म्हणाला, "भागू तूं भिऊं नको. तुझ्या केसाला धक्का लावणार नाहीं." घुटका गिळून ती मागें झाली आणि दारांतून आंत गेली. जानूही गेला. तिला सगळेंच अवघड झालें. पण जानूच्या इमानीपणाची तिला खात्री होती. तो म्हणाला.

"भागूबाई, ह्यें आतां किती दिवस निबनार ? तुमाला इत एकटीला ह्ये लोक सुकानं नांदूं देत्याल असं वाटत न्हाई. हे हरामखोर लोक तुमाला किती जाच करत्याती ह्ये पायलंत ना ?" भागू नुसतीच रडूं लागली.

"ह्ये आतां कसं निबनार ?"

"अव, ह्ये जातवाल तरी मजिकड जरा वाइच बगत्याल ग्या मनांत म्हतलं; पन् त्ये बी न्हाइ."

"कशाच जातवाल भागूबाई ? काय करत्यात त्ये तुमासाठीं! याक जन तरी इचारतुया ? आन् तुमी आपलं जातवाल जातवाल करीत बसलाया?"

" मग कसं मानसानं व्हावावं तरी कसं व ? जावावं तरी कुटं ? ह्ये काय मला अव्हरूनं व्हाऊं द्येत्यात ? मला न्हाइ बया वाटत, दिवाशिपत तुमास्नी सांगत्यें."

" मंग मी काय म्हन्तुया ? मी बी त्येच सांगतुया ! "

दोघें एकमेकांकडे क्षणभर टक लावून पहात राहिलीं.

" काय करावं तरी बया ! आपल्या घरीं आपला टुकडा खाऊनशान् सवताच्या आड्याखालीं व्हायाला बी चोरी झाली की!"

" अवं भागूबाई, त्येस्नी ठाव हाय कीं ही ' रांडाव '; तवा आपलं कसं बी बोलावं; हिचा मर्द कुनी न्हाइ तवा तिचा कार करावा."

भागू रडूं लागली. " अव, त्ये मर्दात मरद व्हत; तवा मजिकड बघायची कुनाची माय येली व्हती ! "

" पन् ह्ये असच करायला सोकावललं; भागूबाई, तुमास्नी ह्येचा इचार कराया होवा."

जानू असाच तीन-चार वेळां रात्रीच्या वेळीं तिच्याशीं बोलून गेला. जानू आपल्याकडून हें सगळें गुप्तांत करीत होता. पण नाहीं नाहीं म्हटलें तरी अगदीं 'लप्पं छप्पं' असतें त्यालासुद्धां पाय फुटतात; आणि गोष्ट चट्कणीं होते. ज्यांनीं भागूच्या अनाश्रितपणाकडे आणि होणाऱ्या छळाकडे यत्किंचितही लक्ष दिलें नव्हतें त्यांचा जात्यभिमान एकदम जागा झाला. ते कुरकुरूं लागले,

" हिला जातवाला कुनी मिळत न्हाइ का ? "

" अव ही त्या जुनेऱ्याचा हात धरून जानार बगा ! "

" तुमाला ह्ये आतां कळतंया; आमीं मागंच हेरलंया : अव, ही त्या येसाबाईनं वाडावल्येली पुरगी ! आन् येसाबाई तर जुनऱ्याला जीव की परान करीत व्हती. आमाला कळत न्हाइ का ! "

" त्या दौलतीची बाईल उटून जाईल बगा ! "

असले शब्द त्या गांवांतले लोक एकमेकांत बोलूं लागले. पण त्याबरोबर दुसरें एक बरें झालें. जानूचें तिच्याशीं कांहीं लागतेपण आहे हें कळतांच बाबणासारखे उंडारलेले लोक सावध झाले. जानूशीं आपला प्रसंग पडेल असें त्यांना वाटूं लागलें. दौलतीच्या मानानें जानू " लुस्कान " होता हें खरें; पण तोही आतापर्यंत चांगला पिळदार जवान बनलेला होता. बाबण्यासारख्यांचा त्यानें एका झडपींत मुडदा पाडला असता. अर्थात् कुटाळीची लज्जत म्हणून का होईना, भागूची ही हकीकत लपतछपत पसरत राहिली, आणि तीमुळें जानूचें छत्र तिच्या डोक्यावर आहे हें सर्वांना आपोआपच कळलें.

भागूला एक चुटपूट लागून राहिली होती. जानूला सगळे लोक जुनऱ्या म्हणून म्हणतात, त्याला कमी लेखतात, दौलतीसुद्धां त्याला हिडिसफिडिस करी,—आपण कांहीं निराळें करायचें मनांत आणलें तर तें बरें दिसेल का असें तिला वाटे. ही तिच्या मनाची तळमळ तिच्या बोलण्यांत केव्हां केव्हां आलेली जानूनें पाहिली होती. त्यालासुद्धां आपल्या या—मानीव का होईना, पण हीनत्वाची जाणीव होतीच. दौलतीची ती उग्र आणि लढाऊ मुद्रा जानू विसरला नव्हता. दौलती जिवंत असतांना पुढें पुढें त्याच्यासमोर उभें राहण्याची आपली शामत नव्हती याची जाणीव त्याला होती. तो मेल्यावर आपण त्याच्या बायकोशीं पाट

लावण्याला धजतों याची धास्ती त्यालाही होती. त्यांतही दौलती हा झुटिंग झाला आहे आणि रात्रीं, अपरात्रीं त्याची सावली कुठें तरी दिसते, आणि पहांटे तर तो तालमींतच मेहनत करून जातो या भुमकेनें तर त्याच्या मनांत सारखें कांपरें भरे. आपण म्हणतों पण मोठ्या माणसांनासुद्धां भुताची भीति वाटते! जानूनें पहांटेची मेहेनत सोडून दिली होती. अंगणांत पडलेल्या त्या गोटीकडे पहाण्याचीसुद्धां त्याला छाती होत नसे. मनुष्य सशक्त असला किंवा ज्ञानी असला म्हणून तो भुताला भीत नाहीं हें खोटें आहे. दौलतीसारख्या माणसाच्या बायकोशीं पाट लावायचा म्हणजे त्याच्या मनाला धाकधूक वाटे. तो रात्रीं–अपरात्रीं भागूच्या घरींच कसा गेला याचें नवल वाटतें. पण माणसाला लोभ पुष्कळदां निर्भय बनवितो.

जानूनें शेवटीं एके दिवशीं भागूला प्रत्यक्षच विचारलें; पण भागू कांहीं बोलली नाहीं. आपल्याला कोणी नाहीं, लहानपणीं-सुद्धां आपल्याला कोणी तरी वाढविलें, आतां तर जो तो आपल्यावर डोळा ठेवून असणार, हें तिनें ओळखलेंच होतें. कुणाचा रूपावर डोळा, कुणाचा शेतवाडीवर डोळा, कुणाचा घरावर डोळा. कुणा-कुणाला तर हेंही माहित झालेलें होतें कीं थेसाबाईनें मोठें डब्ोलें दौलतीला दिलेलें आहे, त्यावर कुणाचा डोळा. कोणी कशासाठीं, कोणी कशासाठीं, पण शेवटीं भागूसाठीं ज्याला त्याला आशा सुटली होती. मनांत कितीही नसूं द्या, अस्तुरीला मर्द बापड्र हवाच, ही जाणीव तिला अधिक अधिक होऊं लागली होती. त्यांतून कांहीं लेकरेंबाळें असतीं तरीही निराळें झालें असतें. पण तेही नव्हतें. जानूनें पुन्हा एकदां खडा टाकला. जानूला तरी कोण होतें ? आई नाहीं, बाप नाहीं; तीस वर्षांचें वय झालें पण कुठें सोयरीक

करतां येईना. भागू म्हणाली, "तुमी मन्तां ती बी गोष्ट काय खोटी न्हाइ." डोईवरचा पदर मान ओवाळून तिनें एकदां सावरला अन् ती भुईकडे पहात राहिली. "पन् हे हुयाचं कसं? जातवालं आडावत्याल न्हवं का? बया म्या तरी का करावं?" भागू रडूं लागली.

"तुमी कष्टी कां व्हतां भागूबाई? मी हाई न्हव का? आव, मला कोनू काय करतुया? हां, हाकडतकड क्येलं तर कडब्याच्या पेंडीवानी एक्येकाला गुडग्यावर मोडीन. हातं न्हाइ जमलं तर आमच्या पावन्याच्या गांवाला जाउनशान् करून टाकूं. तुमी व्हो म्हना मंजी संमदं जमतया."

आज शुक्र उगवायच्या आधींच जानू आणि भागू यांची दोन कोस जमीन चालून झाली होती. वाटेनें त्यांनीं अनेक गोष्टी केल्या. जानूनें आपल्या 'पावन्याला' आधींच कळाविलेलें होतें. शुक्र उगवण्याच्या टेंबाला विहिरीजवळ सडकेकाठीं गाडी सुटली होती तेथें तीं दोघें येऊन पोंचलीं. भागूला चालण्याची संवय नव्हती आणि गरज तर मुळींच नव्हती. येथून गाडींत बसून तीं सुखानें चाललीं होतीं. बैलांच्या पायाखालची वाट. हीं दोघें गाडींत बसलेलीं अन् बोलत असलेलीं. बैल चालते करून बापडा गाडीवान् सावकाशीनें मागून येत होता. भागूनें मन मोकळें केलें, जानूनेंही केलें. "अव त्येस्नी तर तुमचं नांव बी नग व्हतं, पन् मी तरी बया काइ करावं? आन् येसाबाय तर तुमच्या धोंडिबास्नी 'जुनऱ्या जुनऱ्या' करून हाटकायच्या. त्येस्नी तरी कसनुस वाटलं असतं."

"भागूबाई तुमाला का याड लागलया का काय? अव, येसाबाईची मर्जी माज्यावर क्येवडी हे तुमास्नी सांगाइ व्होवं? हे बघा." असें म्हणून जानूनें आपल्या पोतडींतून एक डबा काढला अन् तो

तिच्या हवालीं केला. तो म्हणाला, "तुमीच बगा : ह्ये डागिणं येसाबाइनं मला दिल्याती. मजिवर लोब असल्याबगार त्येनीं दिल असत्याल का ? तुमी रामपाऱ्यात नीट्ट बगा : तुमच्या वळकीच डागिणं दिसत्याल." इतकें म्हणून त्यानें डबा उघडलाच; अन् त्यांतली भली मोठी पुतळयांची माळ भागूच्या गळयांत घालण्यासाठीं त्यानें वर केली. तों भागूनें मान मागें घेतली. तो म्हणाला, "ह्यी तरी तुमच्या येसाबाईचीच '**दौलत**' हाय, तुमी तुमचंच घ्येतसा." इतकें म्हणून त्यानें शेवटीं ती शंभर पुतळयांची माळ तिच्या गळयांत घातलीच. भागूच्या अंगाला दरदरून घाम फुटला; "दौलत" शब्द तर तिच्या सगळ्या अंगाअंगांतून वेणा उत्पन्न करीत बाहेर पडला. तरी आपल्या आईसारख्या येसाबाईची मर्जी जानबावर खरीखुरीच होती याचा प्रत्यय मात्र भागूला खचित आला. गाडी चाललीच होती; अन् काळाचा प्रवाहही चालला होता.

'**पावन्यानं**' सगळी तयारी करून ठेवली होती. जानूनें उंची सामान आणविलें होतें. मोठी काळी चंद्रकळा, आणखी दोन साड्या, रेशमी चोळया अन् त्याच्या स्वतःच्या आईचे घरांतले सगळे दागिने त्यानें आणले होते. जानूला कांहीं कमी नव्हतें. मणीमंगळसूत्र तयार केलें होतें. घट मांडले, भागूनें दागिने घातले, भडक मुगवें लुगडें ती नेसली; कासारानें तिला राजवर्खी, नवी चांदणी असल्या बांगड्या भरल्या. जानूनेंही झोकदार पोषाख केलेला होता. तो अगोदरच मोठा रसरशित होता, नाकेला होता, अन् पिळदार बांध्याचा होता. आतां हा पोषाख केल्यावर तर तो अधिकच खुलून दिसूं लागला. एका विधवेनेंच तिला मळवट भरला. असल्या समारंभाला सुवासिनी स्त्रिया येत नसाव्या. मग जानूनें आपलें मुंडासें

काढून मांडीवर ठेवलें. या बायांनीं त्याला कुंकू अन् अक्षता वाहिल्या. एकीनें भागूची ओटी भरली. बोलूनचालून पाट लागावयाचा होता. फारशी धार्मिक भानगड कांहीं नव्हती. जेवणावळ होऊन हें काम संपावयाचें.

भागू आणि जानू या दोघांनाही असल्या या शुभप्रसंगींही अशुभाची जाचणूक होतीच. समारंभ आटोपला. आतां नवऱ्याच्या घरीं जावयाचें होतें. म्हणजे आपल्याच गांवाला जावयाचें होतें. दौलतीचें नांव तिकडच्या टापूंत सर्वांना माहित होतें. मनच्या मनांत सगळया पाहुण्यांनासुद्धां नवलच वाटत होतं. येवढा दांडगा मर्द ! पण त्याच्या बायकोनें पाट लावला म्हणून ते आश्चर्य करीत होते. पण हा ज्याचा त्याचा मनसुबा होता : आणि जातींत वहिवाट होती. मात्र नवरा-बायकोच्या मनांतली मळमळ गांवाच्या जवळ यावें तों वाढत जाणार हें ठरलेलें होतें. भागीची मळमळ निराळी, अन् जानूची निराळी : भागूला जुन्या गोष्टीचा विसर पडणें शक्य नव्हतें आणि जानूही किती दांड असला तरी झुर्टिंग झालेल्या दौलतीचा धस्का त्याच्या पोटांत कायमच होता. त्यानें पहांटेची आखाड्यांतली मेहेनतही सोडून दिली होती. जमलेल्या मुख्य पाहुण्यांना हें सर्व माहित होतें. यावर कांहीं तरी तोडगा करावयास हवा होता. म्हणून एकानें सुचविलें कीं भागूच्या पहिल्या नवऱ्याला शांत करायला इलाज करावा. नवरीनं काखेंत कोंबडा घेऊन आपल्या गांवाला जावं : मग कोंबडा मारावा : मग नवऱ्याच्या घरापाशीं आल्यावर नवरीच्या काखेंत आणखी एक कोंबडा द्यावा : तोही दाराच्या अलीकडे मारावा, म्हणजे पहिल्या नवऱ्याचा जीव शांत होईल. मग नवरीनं डोईवर कलश घेऊन जानूच्या घरांत प्रवेश करावा. 'यावर कोणी म्हणाले कीं,

आपल्यांत ही चाल नाहीं. अगोदर हें काम जरा कमीपणाचंच झालेलं आहे. त्यांत तुम्ही आणखी हें एक नवीन काढलंत म्हणजे आणखी कमीपणा येईल. पण सगळा विचार होऊन म्हाताऱ्या चौघांनीं सांगितलें कीं असं केल्यानं दोघांच्याही मनाला बरं वाटेल. दौलतीचा जीव शांत होईल : अन् या दोघांना पुढं कांहीं पिडा होणार नाहीं. सर्वांना हा विचार मानवला.

सर्व जमवाजमव होऊन मंडळी परत भागू–जानूच्या गांवा-कडे निघाली. अंधाऱ्या रात्रीं असल्या लग्नाचे प्रकार व्हावे असा प्रघात असल्यामुळें हीं आल्याचा बोभाटा फारसा झाला नाहीं. तिकडे भागूच्या अंगणांत नारळ, तांदूळ, विडा नेऊन ठेवविला. अन् हिकडे भागूच्या काखेंत कोंबडा दिला. गांवाच्या जवळ आल्यावर भागू थोडी गडबडल्यासारखी झाली. कोंबडा मारा-वयाचा आहे आणि तो दौलतीच्या जिवानं स्वस्थ व्हावं म्हणून मारावयाचा आहे या विचारानं ती अगोदरच विढुळली होती. इतक्यांत कोंबडा करकरूं लागला. वस्त्राखालीं तिनं तो तसाच धरला होता. पण धडपड करून त्या कोंबड्यानें करकरून जोरानें साद घातली ! को–को–को म्हणून कोंबडा जोरानें ओरडला. भागूच्या अंगाचें पाणी झालें. तिचे डोळे पाण्यानें डबडबले : तिनें हात गाळून तो कोंबडा खालीं सोडून दिला. मारणारानें सावध राहून त्याची मान चटकन् कापली. भागूची गलबल जानूनें पाहिली होती. कोंबड्यानें ओरडावयास नको होतें. कोंबडा दौलतीसाठीं मरायचा होता. दौलती भागूचा नवरा होता. तो मर्द माणूस होता. त्याच्या संगतींत ती सुखानें राहिली होती. ती आतां दुसऱ्या नवऱ्याच्या घरीं जाणार होती. पण कोंबड्यानें ओरडून काय सांगितलें ? ती जानूला हलकेच म्हणाली, “ काव ऽ !

झो काय म्हन्तुया ? ” जानू स्वतःसुद्धां गडबडला होताच,–पण धीर करून तो म्हणाला, “ अग, कोंबडं वरडायचंच. तूं तकड बगू नगं. ” ती पुढें जाऊं लागली. जानूच्या घराजवळ भागूच्या काखेंत त्यांनीं आणखी एक कोंबडा दिला. तो तिनें तरतुदीनें काखेंत धरला.–पण तोही धडपडूं लागला. गृहप्रवेश करावयाचा; पण इतक्यांत कोंबडा जोरानें कों–कों करून कोकलला; पाय झाडून पंख फडफडवून, पुन्हां कडकडून जानूकडे पाय झाडून तो ओरडला. त्याबरोबर जानूच्या काळजानें ठाव सोडला; त्यालाही थरकांप भरला. ती म्हणाली, “ ह्ये बगाव त्ये काय म्हन्त्यात त्ये ! ” इतक्यांत अंधारांत कोणसें ओरडलें, “ दौलतीला—ह्ये—” यांतला दौलती शब्द उचलून ती व तो अगदीं घाबरून गेली. जानूनें लगबगीनें लग्नाच्या खुणा फेकून दिल्या आणि तो भागीकडे पाहूं लागला. भागूनें लग्नाच्या खुणा फेकून दिल्या. तिची बोबडी वळली. ती तडक स्वतःच्या घराकडे गेली; तिनें कवाड उघडलें आणि आंतून तें दपटून घेऊन ती नाहींशी झाली. सकाळपर्यंत भागीच्या घरांतून रडण्याचा भिसूर सूर सारखा येत होता.

———

# १३ देवकाईची देवकी झाली !

पुरंदरच्या डोंगरावर एक बुरुज बांधावयाचें काम बादशहानें सुरू करविलें. काम पुन्हा पुन्हा ढासळून पडे. शेवटीं 'पायांत एकाद्याची वडील लेक-सून बळी द्या म्हणजे काम टिकेल' असा हुकूम बादशहानें धाडला. जो आपली लेक-सून बळी देण्यासाठीं देईल त्याला सातशें होनांचा 'भोगली' गांव वंशपरंपरा मिळणार होता. म्हणून राखणदार बहिरनाक महारानें आपला मुलगा नाथनाक आणि सून देवकाई हीं पायांत घालावयास दिलीं. बुरुज उभा राहिला. बहिरनाक श्रीमंत झाला. त्याची पोरेंबाळें सुखी झालीं. अजूनही त्याच्या घराण्यांतील लांबचे वंशज त्या उत्पन्नाचे तुकडे-तोकडे खात आहेत. कुळाचार म्हणून देवकाई हें नांव त्याच्या कुळांत चालूं आहे.

मंदिर–प्रवेशाची चळवळ महाराष्ट्रांत बरीच झाली. हीं मंदिरें ज्या देवांचीं आहेत त्या देवांनीं अस्पृष्ट समाजाला अजून बाहेरच ठेवलेलें आहे ! महार समाज हा महाराष्ट्रीय अस्पृष्ट जातींतील बहुसंख्य समाज असून पुढारलेला आहे. हा मोठा तेजस्वी, आक्रमक, आणि आकांक्षी बनत चाललेला आहे. जे आपल्याला झिडकारतात त्यांना तो झिडकारतो आणि आपलें भावी मोठेपण स्वाभिमानावर व स्वसामर्थ्यावर उभें करण्याची त्याची उमेद आहे. हिंदुत्वांतून बाहेर पडण्याची गर्जना त्याच्या पुढाऱ्यांनीं केली असली तरी सरसकट समाज ही आकांक्षा ठेवीत नाहीं. स्वाभिमानानें आपण वैभवशाली झालों म्हणजे त्यांत सर्व कांहीं येईल असें त्याला वाटतें. इतर साऱ्या गोष्टी जशा आपण आपल्या करूं तशी आपली धर्म-

कल्पना व आपलीं देवस्थानेंही आपणच बनवूं अशी उमेद त्यानें धरल्यास त्यांत नवल नाहीं.

पुरंदरच्या बुरजाच्या पायांत लोकांनीं आपलीं पोरें घालावीं आणि त्यावर आपलें वैभव रचावें ही गोष्ट या समाजाच्या पुढाऱ्यांच्या मनाला फार लागून राहिली होती. अपमानाच्या जाणिवेच्या भरांत त्यांना वाटे कीं हा बुरुज पाडून टाकावा आणि पायांत पुरलेलीं तीं अर्भकें बाहेर काढावीं. हें केलें तर आपला ऐतिहासिक अवमान धुऊन जाईल असें त्यांना वाटे. हा विचार प्रबळ होतां होतां लोक म्हणूं लागले कीं त्या अर्भकांच्या जागींच आमच्या देवतांचें स्थान बनावें. आमचा अपमान खणून काढला म्हणजे तेथेंच आमचा देव जागृत होणार !

समाजाच्या पुढाऱ्यांनीं विश्वप्रयत्न करून पुरंदरवरील शेंदऱ्या बुरजाचा ताबा मिळविला. त्यांच्या या प्रयत्नाची कुणकुण समाजाला लागलीच होती. बुरुज पाडावयाचा, पाया उभारावयाचा, आणि जेथें अर्भकें पुरलीं आहेत तेथेंच अभिमान–देवतेची स्थापना करावयाची अशी ही कल्पना होती. पुढाऱ्यांपासून उतरत उतरत ही कल्पना अवघ्या समाजांत पसरली आणि जो तो मोठ्या उत्सुकतेनें या प्रसंगाची वाट पाहूं लागला. पुरंदरच्या डोंगरावर हें व्हावयाचें असल्यामुळें तिकडच्या टापूंत विलक्षण खळबळ सुरू झाली होती.

पुरंदरच्या आसपास वसलेल्या खेडेगांवांत जिकडे तिकडे एकच विषय चालू होता. नाथनाक आणि देवकाई यांना बुरुजाच्या पायांत गाडण्यासाठीं सुभेदाराच्या हवालीं करून ज्यांनीं उत्पन्नें मिळविलीं होतीं त्यांचे वंशज महार अजूनही या गांवांत ठिकाठिकाणीं रहात आहेत. त्यांच्यांतील नव्या पिढीच्या उमेदवार लोकांच्या अंगांत नवें वारें भरलेलें होतें. या असल्या उत्पन्नाच्या 'अन्नावर आपला पिंड वाढला

असल्याच्या जाणिवेनें त्यांना ओशाळगत उत्पन्न झाली होती. आपल्या अंगावरचें हें मांस सुरीनें खरडून काढावें असा चेव त्यांच्या मनांत उत्पन्न होत असे. अर्थात् या पातकासंबंधानें ते घरांत अनेकदां चर्चा करीत व पश्चात्तापाचे विखार भिनल्याच्या त्वेषानें एकमेकांशीं बोलत. त्या गाडलेल्या नाथनाकाचा आणि देवकाईचा आतां उद्धार होणार आहे हें पाहून त्यांना पराकाष्ठेचा आवेश चढला होता. कांहीं कांहीं शिकलेल्या महार मुलीही अशाच तरारून गेलेल्या असल्या-मुळें त्याही या वाटाघाटींत सामील होत. घरांतलीं वडीलधारीं पुरुषमाणसें आणि पोक्त स्त्रिया तरुण लोकांच्या या चाललेल्या वादा-कडे कान टवकारून बसलेलीं असत. नाथनाकाला अन् देवकाईला कसें पुरलें, कशासाठीं पुरलें, या कामांत दगलबाजी कोणीं कोणीं केली, वर शिळा बसली तेव्हां त्या अर्भकांच्या मनाची काय कालवा-कालव झाली असेल, त्यांनीं आंतल्याआंत काय किंचाळ्या फोडल्या असतील, तीं शेवटीं कशीं गुदमरून मेलीं असतील याचीं भयानक वर्णनें हीं तरणीं पोरें करीत. तीं त्या बायांच्या कानीं पडत. महि-नेन् महिने हा प्रकार घरोघरीं चालला होता. आंत भाकऱ्या थापतांना बाहेर चाललेल्या वर्णनाकडे या आयाबायांचे कान लागलेले असत. त्यांना घरांतला कामधंदा सुचत नसे. पाण्या–उदकाला बाहेर गेल्या, 'मस' हिंडवून आणायला गेल्या, नाहींतर मीठमिरची-साठीं बाजाराला गेल्या तरी पोरांपोरींनीं घरांत मांडलेला कल्होळ त्या आपल्या डोक्यांत घेऊन जात. कुणाच्या पराक्रमानें हें सारें घडत आहे हें तर त्यांना पाठच झालेलें होतें.

होतां होतां एके दिवशीं या तरुण लोकांच्या गोष्टी चालल्या असतांना एकजण म्हणाला, "खालच्या वाडींत शिदनाकाच्या घरीं लइ कालवा माजतुयां, त्येच्या भनीच्या अंगांत येतंया, आन् ती

सगळ्या वाडीच्या वस्त्यानं वराडतीयां; नात्नाक, नात्नाक, द्येवकाई, द्येवकाई करीत, अन् टाळ्या ठोकीत फिरतीया.'' तेथलीं सुशिक्षित मुलें त्याच्याकडे तुच्छतेनें पाहूं लागलीं. तो भावडा पुन्हां म्हणाला, "तुमच्या गळ्याच्यान् शिदनाकाच्या भनीच्या अंगांत येतंया, अन् ती हाकडंतकडं नाचतीया !'' तीं तरणीं पोरें जागचीं उठलीं आणि शेजारच्या वाडीला गेलीं. लिंब्या महाराच्या घरापुढें वाडींतले लोक, म्हाताऱ्या बाया, तरण्या पोरी, नागडीं-उघडीं लहान मुलें, खांद्यावर घोंगडं टाकलेले दहापांच म्हातारे असे सारे वाडीकर जमलेले होते. देवकाई अगदीं बेफाम बनलेली होती. तिचे केंस पाठीवर मोकळे सुटलेले होते. तिच्या कपाळाला कुंकवाचा मळवट भरला होता. तिच्या गालफडावरून अन् मानेवरून घामाचे ओघळ चालले होते. तिचे डोळे लालबुंद झाले होते. तिनें खांद्यावरचा पदर खालीं कमरेला गुंडाळलेला होता. तिच्या हातांत लिंबाऱ्याचा फोंक होता अन् तो ती एकदां इकडे तर एकदां तिकडे असा नाचवीत होती. हुं हुं हुं हुं करून कमरेपासूनचा वरचा मोहरा ती मागें पुढें झुकवीत होती. हीं शिकलेलीं तरणीं मुलें तिच्याकडे पहात बाजूला उभीं राहिलीं. मधून मधून देवकाई एखादा शब्द तोंडावाटे काढी. "आ डोंगरची आई, आ डोंगरचीं बाई, आ डोंगरची माई, आ डोंगरची ताई'' असें कांहीं तरी म्हणून ती ढसढसां रडूं लागे. "अग रांड, जीव ग्येला, जीव ग्येला'' म्हणून बोंबले आणि डोक्यावर असलेलें एकादें ओझें जसें कांहीं फेंकून देत आहे अशा आविर्भावानें हात झाडी. "हिला कांहीं तरी सांगायचं आहे'' असें त्या तरुण लोकांना वाटत होतें, पण तेही अर्धवट भयानें गप्प उभे होते. सारीं माणसें भयभीत होऊन घुटके गिळीत होतीं. एक म्हातारा धीर धरून म्हणाला, "न्हवं, न्हवं, तूं कोन हाइस, सांगनास कां ? तूं हाइस तरी कोन ?'' देवकाई त्याच्या बाजूला वळली

अन् किंचाळून ओरडली, " अर, तुजं पांडरं क्यास मार्तीत ग्येलं. अर तुजं पांडरं क्यास मार्तीत ग्येलं. अर तकड बग ! " पाठीमागच्या डोंगराकडे तिनें तोंड वळविलें आणि लिंबाऱ्याच्या फोंकानें कांहीं तरी दाखवीत " अर, मी व्हय रं; अर, मी व्हय रं; अर, मी व्हय रं—" म्हणत म्हणत ती उभ्यानेंच खालीं कोसळली. तिच्या तोंडांतून फेंस जाऊं लागला, तिच्या बोटाच्या आंकड्या झाल्या, तिनें आपले हात उरावर पांघरून घेतले, तिच्या पसरलेल्या पायाची जुडी झाली, तिचें हुं हुं हुं करणें हळूं होऊं लागलें; तिचे डोळे गच झाले; ऊर तेवढा जोराजोरानें वर खालीं होत होता. " शिरपा, पानी घाल, पानी घाल " दुसरा म्हातारा ओरडला. तोंडांत पाणी जातांच देवकाईनें डोळे उघडले. ती रडूं लागली. कमरेला गुंडाळलेला पदर तिनें लगबगीनें अंगावर घेतला. ती सगळीकडे टकमक पहात उठून बसली.

बुरुजापर्यंतचा सारा डोंगर माणसांनीं गजबजून गेला होता. अनेक जातींचे लोक आलेले असले तरी मुख्य भरणा महारांचाच होता. बाकीच्या जातींचे लोक विचारांत पडल्यासारखे दिसत होते. हें काय घडत आहे याची गंभीर चर्चा त्यांच्यांतील कांहींजण करीत होते; व कांहींजण त्या टीकेकडे कान देऊन, सुन्न मनानें, दिगंतापर्यंत पसरलेल्या खालच्या मैदानाकडे पहात होते. यांच्या आणि त्यांच्या मनांत चालूं विषय मावत नव्हता. कोणी बोलून बोलून मनांतील त्याचा असह्य दर्प घालवीत होते आणि कोणी गप्प बसून पुन्हा पुन्हा सुस्कारे सोडून, तो दर्प मनांतल्या मनांत जिरवीत होते. या इतर जातवाल्यांचीं मनें एकंदरीनें पाहतां चिंतातुर दिसत होतीं. पण अशा या लोकांच्या थव्यांतही मधूनमधून पांढरपेशापैकीं लोकांच्या कांहीं लहान लहान टोळ्या हर्षभरित झालेल्या होत्या. त्यांतील माणसें

दिलखुलासपणें बोलत होतीं. तीं म्हणत होतीं, " फार चांगलें घडत आहे ! अरे, एका समाजाचें सहस्रावधि वर्षांचें सुतक फिटत आहे. त्या समाजाला चालतें बोलतें दैवत लाभलेलें आहेच. पण पांचशें वर्षांपूर्वी खोलांत गाडलेल्या एका अश्राप भावनेच्या स्फोटांतून एकादी नवी चंडिका हे उत्पन्न करीत असले तर करूं द्या. दडपल्यानें आत्तांपर्यंत भागलें, आतां आपल्याला स्फोटही मिळतां आले पाहिजेत ! " महार समाजांतील माणसें तर बेभानच झालेलीं होतीं. त्यांना कसलें तरी अवसान चढलें होतें. त्यांना कसला तरी हुरूप प्राप्त झाला होता. मनावरचा भार गेल्याचें सुख त्यांना होत होतें. ते आनंदानें नाचत—बागडत होते, हातवारे करीत होते आणि आरोळ्या ठोकीत होते. भुई खणतां खणतां, देवतेनें सांपडेल म्हणून सांगितलेल्या मोहोरांच्या हंड्यांच्या कड्या दिसूं लागतांच भोंवतालचे लोक जसे वेडावून जाऊन एकमेकांना कवटाळूं लागतील व एकमेकांच्या पाठीवर थपडा मारूं लागतील तसे हे महार करूं लागले. दास्यांत, हालांत, विपत्तींत, लाचारींत जन्माला आलेल्या आणि मरून गेलेल्या सहस्र पिढ्यांचें रक्त त्यांच्या रोमारोमांतून ठणकत होतें; फणफणत होतें; तें विमोचनाच्या जाणिवेनें थयथय करीत होतें. त्यांच्या हुरूपाला नांव नव्हतें, त्यांच्या आनंदाला उद्गार नव्हता, त्यांच्या भावनेला मर्यादा नव्हती. मधें मधें कोठें तरी एकादा मुसलमानांचा गट बसलेला होता. ते एकमेकांत रागारागानें बोलत होते. ते सारे गांवढे मुसलमान होते. " हमारे बादशहाने बुरुज खडा किया ह्यू, ये आदमी कायकू निकाल देता है ? " " अरे जाना देव भाई, क्या इसमें ह्यू ? लेकिन् बडा तमासा हो रहा ह्यू ; अबी वो देखो. " असें कांहीं जण बोलत होते. पण महारांच्या आरोळ्यांत यांचे हे वाद, म्हणजे ढगांच्या गडगडाटांत उंदरांची चिंवचिंव लुप्त व्हावी तसे लुप्त होऊन जात होते.

साहेब यायला अजून अवकाश होता; आणि डोंगराखालची वाट दोन्ही अंगाच्या झाडोऱ्यांतून भांगासारखी चाललेली दिसत असल्यामुळें साहेबांची मोटार दुरून येत असतांनाच दिसण्यासारखी होती. गळयांत नाना प्रकारचे पट्टे अडकाविलेले आणि छातीवर, खांद्यावर, दंडावर नाना प्रकारचीं रंगीबेरंगीं रेशमीं फुलें लावलेले शेंकडों स्वयंसेवक बुरुजापासून तों तहत डोंगराच्या पायथ्यापर्यंतच्या उतरत्या वळणदार वाटेवर दुतर्फा उभे होते. साहेब आल्याची शीट वाजतांच वाटेवरची गर्दी हटविण्याच्या तयारींत ते दिसत होते. साहेब पायींच वर चढतात का डोलींतून वर येतात याची बरोबर कल्पना त्यांना नव्हती. व्यवस्थेचें काम अनिश्चित रूपाचें असल्यानें ते थोडे अस्वस्थच होते. साहेबांचें आतां वय झालेलें असल्यानें आणि ते अंगानेंहि फार सुटलेले असल्यानें ते बहुधा डोलींतूनच वर येतील या हिशेबानें त्यांनीं तळाशीं डोलीची व्यवस्था करून ठेविलेली होती. इकडे याची अशी तयारी चालूं असतांना सहस्रावधि लोक यांच्या दुतर्फा रांगांच्या मधून गडाकडे चालले होते. जे डोंगरचढाईला रहाळलेले आणि माहितगार होते ते वाटेल त्या बाजूनें, झाडाझुडांतून, नाकाडांवर वळणें घेत वर चाललेल्या पाऊलवाटांवरून, बुरुजाकडे भराभर झेपावत होते. पुरंदरचा सारा मोहरा माणसांनीं गजबजून गेला होता. नीरेच्या खोऱ्यांतील लोकांच्याही झुंडीच्या झुन्डी दक्षिणेच्या बाजूनें डोंगरांच्या चोळींतून, बारक्या बारक्या खिंडींतून, जनावरांनीं पाडलेल्या पाऊलवाटांवरून केदारेश्वराच्या रोखानें वर येत होत्या. इकडच्या बाजूची झाडी जर इतकी दाट नसती तर मुंग्यांसारखी माणसांची रीघ लागलेली दिसली असती. या गडाच्या माथ्यावर, याच्या उतारावर आणि याच्या पायथ्याला अनेक रणकंदनें आजवर झालेलीं आहेत आणि

हजारोंच्या हजारों फौजा याच्या अंगावरून वरखालीं वावरलेल्या आहेत. पण आजचा माणसांचा भार प्रत्यक्ष इन्द्रानें वस्ती केलेल्या या पुरातन नगराजालासुद्धां न सोसवेसा होता. माणसांना असें वाटत होतें कीं, आज कांहींतरी अघटित घडणार आहे. इतिहास घडतो, इतिहास घडतो असें त्यांनीं आजवर अनेकदां ऐकलें होतें. पण आज तो इतिहास प्रत्यक्ष घडतांना त्यांना दिसणार होता!

बुरुजाच्या आसपास ठिकठिकाणीं महारांचीं टावकीं बसलीं होतीं. जो तो कोरीं कांबुनें घेऊन आला होता. कुणाच्या अंगांत नुसतीच पैरन, तर कुणाच्या अंगांत पैरनीवर तांबडा कब्जा; कुणी तीन 'बी'चा फेटा घातलेला, तर कोणी लाल कोरें पागोटें कानतिळ्यानें बांधलेलें; कुणी नकली जरीचा कुसुंबी रुमाल उजव्या डोळ्यावरून कपाळाकडे नेलेला, तर कुणी त्याचा समला कुल्ल्या-पर्यंत सोडलेला—असा ज्याचा त्याचा नवा थाट होता. त्यांना वाटत होतें, आपण जत्रेला आलों आहों. बायामाणसें उल्हासानें अशींच बहकून गेलेलीं होतीं. त्यांना पाठीशीं घालून पुढें बसलेले ते ताले-वार महार तंबाखूच्या पिचकाऱ्या मारीत होते आणि 'साह्येब कवां येनार' म्हणून एकमेकांना विचारीत होते. आधीं जागा धरावी म्हणून येऊन बसल्यामुळें ते आतां अगदीं आंबून गेले होते. इत-क्यांत एकजण म्हणाला, "त्या म्हाताऱ्याला हाटका रं; त्यो त्यो, लंगतूया नव्हं कां, हंग त्योच्." दोघांतिघांनीं त्याला हटकून आणलें. त्याच्याबरोबर एक पंधरा वर्षांचें पोर होतें. कोणी तरी दिलेली एक काळी टोपी आंतली बाजू वर करून त्यानें आपल्या टकल्यावर खालवर दाबून बसविलीं होतीं. खांद्यावर दहा ठिकाणीं गेलेला एक एक सदरा त्यानें अंगांत घातलेला होता. त्याच्या हातांत एक थाळी असून, डाव्या हातांत धरलेल्या काटकीनें आणि उजव्या

हाताच्या नखांनीं तें ती वाजवीत चाललें होतें. म्हातारा अन् तें पोरगें समोर येतांच त्या महारांच्या टोळींतील म्होरक्या त्याला म्हणाला, " अरं संब्या, कुटं निगाला रं ? " " आमी ? आमी जकडं सारी जन–जत्रा, तकडं आमी, " म्हातारा हंसत म्हणाला. संब्या म्हणजे आसपासच्या महारांचं एक खेळणं होतं. " अरं संब्या, यखांदी लावनीबिवनी म्हन् कीं ! सायोब कवा येत्यात कुनाला ठावं. जरा वाइच म्हंचील कां न्हाइ ? " " हां हां, न्हाई कशापायी व ? पन जरा चिलिम वडल्याबिगार त्ये कुटं जमतंया ?" त्या सुखवस्तु महारां-पैकीं एकानें खिशांतली चिलिम, तमाखू, छापी काढून दिली; दुस-ऱ्यानें एकदम काड्याची पेटी त्याच्या अंगावर टाकली. म्हाताऱ्यानें जोरजोरानें चार दोन झुरके मारले. " हां, आतां झालं कां रं नरडं शाप ? " म्हातारा नुसताच खोकत खोकत हंसला. " काय म्हन्तूस आतां, संब्या ? " " त्ये, सुबानअल्लाची लावनी म्हनू कां?" " छ्या, छ्या, अन्नाडी ल्येका, बाया मानसं बसल्याती ना हतं ! " " बरं दादा ! आगिनगाडीचं गानं म्हंतू. " सर्वांनीं होकार भरला.

संब्या म्हातारा गाऊं लागला आणि शिरप्यानं थाळीवर ठेका धरला.

" शिंगल् वर खालिं करतीयां रं करतीयां
आगीनगाडी **येतीया येतीया** १

(पोरगा पुन्हां म्हणतो)

सायोब तिकूटी बगतूया रं बगतूया
बोकड गिराइक **सोडतूया सोडतूया** २

पानपटि बिडि माचिस इकतीया रें इकतीया
शिगूरट् पावना **वडतूया वडतूया** ३

पोटर पानी वाड्तूया, रं वाड्तूया,
बामन पानी पेतूया पेतूया ४
(पोराकडे वळून संब्या म्हणतो, " त्येका म्हन् न्येटानं,
" बामन पानी पेतूया पेतूया ! " )
गाडिंत मानुस चड्तया र चड्तया
अनाडि वरूड करतूया करतूया ५
इटाळ चंडाळ मरतूया र मरतूया
मानुस ख्येटुन बस्तया बस्तया ६
तिकूटीचा पैसा करतूया करतूया
मास्तर शिरिमंत होतूया होतूया ७
सायोब यस् पयास करतूया र करतूया
आय्या कागद लिवतूया लिवतूया ८
मड्डुम किलबिल करतीया र करतीया
बुटन्येर वाडुन नेतोया नेतोया ९

गाणें येथवर येत आहे तों तिकडून दोनचार कडकलक्ष्म्या पायांतले पितळे वाळे खळखळ वाजवीत तेथें प्राप्त झाल्या. गडबड होत आहेसें पाहून संब्या म्हणतो,

" संबु भोसला गातूया रं गातूया
शिरप्या बी सात करतूया करतूया १०

इकडून एक, तिकडून एक असे दहा-पांच पैसे संबूच्या पुढें पडतात तों कडकलक्ष्म्या जोरजोरानें ओरडूं लागल्या.

त्या आपल्या पाठीवर आसूडाचे फटकारे फडाफड वाजवीत होत्या. त्यांच्या डोकीवरील झिंज्या, कपाळावरील मळवट,

त्यांचीं घामेजलेलीं थोबाडें, त्यांच्या अंगावरील लक्तरें, त्यांच्या कमरेभोंवतालचे खणाचे परकर, त्यांच्या हातांतील अजगरासारखे लांब लांब आसूड या देखाव्यानें पोरें भिऊनच जावयाचीं. " तुळजापूरची अंबाबाई, जानाई, जोरवाई, घाटांतली यमाई, कोलापूरची टेंबलाई हा, हा, हा, तुमचीं पोरंबाळं, तुमच्या आयाभइनी "—असा कांहीं गोंगाट त्यांनीं माजविला कीं हा प्रसंग जणूं कांहीं त्यांच्यासाठींच चालला आहे असें कुणाला वाटावें. यांच्याबरोबर असलेला माणसांचा घोळका खूपच मोठा होता; पण त्यांच्या मध्यावर कांहींतरी वेडावांकडा प्रकार चालू असावा असें वाटूं लागलें. ओंवती—भोंवतींचे तमाम महार तटकन् उभे राहिले आणि जो तो चवड्यावर उभे राहून काय आहे हें पाहूं लागला. मध्यावर एक बाई अर्धवट नाचत होती. ती हातांतील लिंबाचा फोक बुरुजाकडे दाखवी आणि तोंडानें कांहीं अस्पष्ट शब्द काढी. अनेक बाया तिला आंवरून-सावरून घरीत असतांना तिच्या अंगावरून चाललेले घामाचे पाट पुसत; आणि तोंडानें 'हटा, हटा' असें म्हणत. वाडींतले सारे लोक तिच्याबरोबर आले होते. चार म्हातारीं माणसें जोरानें ओरडलीं, " आई, आतां वाइच उबी -हा; तुजं भगत लइ दमल बग ! " देवकाईनें धुंद नजरेनें इकडे--तिकडे पाहिलें आणि ती जागेवरच डुलत उभी राहिली. भोंवतीं माणसांचें विस्तीर्ण कडें पडलें.

देवकाईचा आवेश पाहण्यासारखा होता. पायथ्याच्या वाडीपासून ती सारखी नाचत ओरडत आली होती. पण दमल्याची कसलीही खूण तिच्या अंगीं दिसेना. लिंब्या महाराच्या अंगणांतून ती निघाली ती येथपर्यंत एकदाही खालीं टेकली नव्हती. पण तिचा थयथयाट आणि तिचें घुमणें चालूंच होतें. " चला;

बुरजाकडं चला. अरं माजा ल्योक आला कां ? अरं माजा ल्योक कुटं दिसतुया कां ? " असें म्हणून ती आजूबाजूला आनू गडाच्या पायथ्याकडे येणाऱ्या सडकेकडे पाहूं लागली. " अरं, त्यो माजा किश्न हाय, त्यो माजा ल्योक हाय; मी त्येची आय हाय, मी माजं थान त्येच्या मुकांत घालत्यें. " असें म्हणून उघड्यावाघड्या पडलेल्या आपल्या स्तनाची ती चाळवाचाळव करूं लागली. " त्यो तुमचं पांग फेडील; त्यो माजा ल्योक हाय; मी त्येची आय हाय; माज्या घराकडं चला; बुरजाकडं चला, " हे तिचे उद्गार ऐकून भोंवतालच्या सहस्रावधि महारांच्या अंगावर शहाऱ्यांचें रान उभें राहिलें. जो तो एकमेकाकडे टकमक पाहूं लागला. " आतां ह्यो उत्पानू नग; किती जलम झालं, त्यें उत्पानू खातीया; माजं रगात मीच पितीया; माजीं आंतडीं मीच चावतीया; आतां माजा किश्न येनार; त्यो माज्या पोटीं आलाया; त्यो रतांत बसून येनार; गुरव त्येच्या म्होरं शिंग वाजवनार; चोपदार त्येला रामराम करनार. " इतकें बोलून ती धुंद झालेली बाई मोठमोठ्यानें हंसूं लागली. तिचे दातवणानें काळे झालेले सारे दांत उघडे पडले. लोक तीला पाहून भिऊं लागले. ' मी देवकाई, माजी सासू देवकाई, तिची सासू देवकाई, तिची, तिची, तिची सासू बुरजांत; अरं माजा जीव कोंडला; अरं माजं नाक दाबलं; बोलवा माज्या किस्नाला. " एकदम गिरकी मारून ती पायथ्याकडे तोंड करून उभी राहिली आणि हांसत हांसत तिनें हात पसरले. लोक पायथ्याच्या सडकेकडे पहातात तों एक मोटार गडाकडे येतांना दिसूं लागली. " बोला बाबासाहेब महाराज कीं जय ! " " बोला भीमराव महाराज कीं जय ! " या आरोळ्यांनीं पायथ्यापासून बुरुजापर्यंतचें सारें नभोवितान दुमदुमून गेलें. महाराष्ट्रांतील श्रेष्ठ पर्वतराजानें दशसहस्र

मुखांनीं भीमरावांचें स्वागत केलें. देवकाई बेहोप होऊन खालीं कोसळली.

तिकडे आतांपर्यंत त्या जुनाट बुरुजाचें सारें बांधकाम महार स्वयंसेवकांनीं खणून काढलेलें होतें. मजूर लावून हें काम सहज होण्यासारखें होतें. परंतु महार स्वयंसेवकांनीं हें परिश्रमाचें काम आपणच करावयाचें ठरविलें व थोडयाशा वेळांत त्यांनीं सारा बुरुज पायापर्यंत भुईसरपट करून टाकला. शंभरजणांचा हात पडला म्हणजे कसलेंहि प्रचंड काम कसें हातोहात निकालांत निघतें तें येथें दिसून आलें. गडावर येणाऱ्या माहितगारांना वाटलें होतें कीं अजून बुरुज उभाच असेल. पण मुहूर्ताची वेळ येण्याच्या आधीं दीडदोन प्रहर या उत्साही लोकांनीं त्या बुरुजाचें पुरतें निसंतान केलें. दगड–धोंडे, मातकट, झाडोरा हें सारें झाडून झुडून पायाच्या खुणा त्यांनीं मोकळ्या केल्या व या विस्तीर्ण जागेवर एक मोठी झोंकदार छत्री उभविली. ती रंगीबेरंगी रेशमी कापडांची केलेली असून तिला सभोंवार सहस्र पुष्पगुच्छ लोंबविले होते. हीं सारीं कामें इकडे चालू असतां झपाझप जमा होणारा जनसंमर्द दूरदूरच थोपवून धरण्याचें काम कांहीं स्वयंसेवक करीत होते. गडावरील नानाप्रकारच्या लतापल्लवांनीं आणि तोरणांनीं या ठिकाणाला मोठी दिमाखदार शोभा आलेली होती. जरतारीच्या कापडानें मढविलेले पांच-सहा प्रशस्त कोच छत्रीखालीं मांडलेले असून पांच-पन्नास राजशाही खुर्च्याही ठेविलेल्या होत्या. या छत्रीकडे येणाऱ्या चढणीच्या वाटेवर एकीपुढें एक अंतराअंतरावर कमानी उभारलेल्या असून प्रत्येक कमानीपाशीं सनईवाल्यांचा एक एक ताफा सुसज्ज ठेवला होता. शिवाय दोहींकडे दोन उमदे

लोक उभे राहिलेले असून त्यांच्या हातांत कमानीवरील दोऱ्यांचीं टोकें दिसत होतीं.

छत्रीखालीं स्वच्छ सरपोस घातलेल्या एका गादीवर पांच गरीबशीं दिसणारीं महार माणसें बसलीं होतीं. त्यांच्या मागल्या अंगाला पुरंदरच्या पायथ्याचे कांहीं उत्पन्नदार महार बसले होते. हे उत्पन्नदार महार मधून मधून डोळे पुशीत होते व ते गादीवर बसलेले पांच महार वरचेवर आजूबाजूला टकमक बघत होते. हे पांच जण नाशिकच्या परिसरांतील एका खेड्याचे होते. हे पिढयान् पिढ्या पंढरीचे वारकरी होते आणि शुद्ध आहारविहाराचे म्हणून मान्यता पावलेले होते. त्यांना या नियोजित कामासाठीं आणावें किंवा नाहीं यासंबंधानें महार पुढाऱ्यांत बरीच भवति-न-भवति झाली होती. 'साहेबां'ना ही गोष्ट आवडणार नाहीं असें अनेकांनीं बोलून दाखविलें. पण साहेबांच्या खालोखाल जे दुसरे पुढारी होते ते म्हणाले कीं, 'साहेब जातगंगेच्या बाहेर नाहींत.' त्यांच्यापुढें लहानलहान भगव्या पताका आणि टाळांचे जोड पडले होते. पलीकडे पांच-सात लोक शेजारीं टिकाव कुदळी घेऊन बसले होते. कांहीं माती, दगड, चुना यांच्या राशीपाशीं दोन गवंडी बसले होते. पाण्यानें भरलेल्या तांब्याच्या लालभडक अकरा घागरी कळस करून बसविलेल्या होत्या आणि त्यांच्या तोंडांतून आंब्याचीं पानें वर आलेलीं होतीं. माहितगारांना हें ठाऊक होतें कीं या अकरा घागरींत महाराष्ट्रांतील अकरा नद्यांचीं उदकें भरलेलीं आहेत. शेजारीं शुभ्र बुरख्यांत कांहींतरी उभें करून ठेवलें होतें. या घागरींच्या चबुतऱ्याच्या भोंवतीं महार समाजांतील अकरा प्रतिष्ठित सुवासिनी वस्त्राभरणांनीं आणि अलंकारांनीं नटून बसलेल्या होत्या. हे सारे लोक मधूनमधून, मातींतून मोकळ्या केलेल्या पायथ्यापैकीं एका

जागेकडे; आणि झांझवाले, ढोलधमामेवाले, शिंगवाले, बँडवाले आपापल्या साहित्याकडे, पुन्हा पुन्हा पहात होते. अशा प्रकारें सर्व तयारी होऊन बसली होती. तों तिकडून शिंगाड्यांचीं शिंगें आणि जयजयकाराच्या गर्जना उठूं लागल्या.

सर्वांनीं ओळखलें. जयजयकाराचें लोण भराभर वर चढूं लागलें. पुरंदरचें सगळें तकटच्या तकट जयजयकारांनीं आणि आरोळ्यांनीं नादावून गेलें. ज्याची वाट सर्वजण पहात होते तो थोर पुरुष पहिल्या कमानीपाशीं येऊन पोंचतांच वाद्यांचा घोष सुरूं झाला. कमानी-खालीं येतांच दोन्ही बाजूच्या माणसांनीं गोफ ओढले व त्याच्या डोक्यावर चित्रविचित्र फुलांची वृष्टि झाली. दुसऱ्या कमानींत, तिसऱ्या कमानींत, असें होत होत पांचव्या कमानींत तो आल्या-बरोबर छत्रीखालची सर्व सभा उठून उभी राहिली. सुवासिनींनीं त्याच्या भाळीं कुंकुमाचा टिळा लावला आणि हंसतमुखानें त्याला ओंवाळिलें. सर्व जन्मभर सभापरिषदांत आणि खाजगी संभाषणांत कडाकड प्रहार करीत बोलणारा आणि त्वेष, असूया, आव्हान, धिक्कार या भावनांनीं मनःपिंड खारून गेलेला एवढा जबरदस्त, शूर लोकनायक; पण त्या स्वागतानें त्याची चित्तवृत्ति हेलावली आणि त्याचे डोळे पाण्यानें डबडबून भरले. त्यानें चटकन् खिशांत हात घातला आणि जें कांहीं हाताला लागलें तें त्यानें या सुवासिनींच्या तबकांत टाकलें. मंडपांत प्रवेश होतांच वाद्यांचा पुन्हा गजर झाला. तो वीर पुरुष स्थानापन्न झाला. गद्गदित झालेली सारी सभा क्षणभर स्तब्ध झाली; आणि त्या पांच सत्पुरुषांनीं टाळ वाजविण्यास सुरुवात केली. त्यांनीं अभंग म्हटला :

आजि आला दिवस धन्य सोनियाचा
जिवलग विठोबाचा भेटलासे ॥

तेणें सुखसमाधान झालि विश्रांति
दुजें नाठवती चित्तीं कांहीं ॥

समाधानें जीव राहिला निश्चल
गेले हळहळ त्रिविध ताप ॥

चोखा म्हणे आनंद वाटलासे जीवा
संतांचे पाय केशवा देखीयेले ॥

अभंग संपतांच "जय जय केदारेश्वर; जय जय केदारेश्वर, जय जय केदारेश्वर" असा घोष करीत, टिकाव–कुदळी घेतलेल्या त्या लोकांनीं एकमेकाला केदारेश्वराचा अंगारा लावला. शेजारीं उभ्या असलेल्या माणसाला त्यांनीं खूण करतांच त्यानें कसला तरी तांबडा द्रव पदार्थ पायथ्यावर भांड्यानेंच शिंपडला. हें करतांना ते सात-आठजण एकमेकांच्या आड उभे राहिले होते. काय शिंपडलें हें त्यांनीं कोणास फारसें दिसूं दिलें नाहीं. ज्या जागेवर हा द्रव पदार्थ शिंपडला तिच्याभोंवतीं ऊद, नागरमोथे, धूप यांचे ढीग घातले होते; ते त्यांनीं चंदनाच्या ढलप्यांनीं पेटवून दिले आणि एकदम उग्र वासांचा धूर सर्वत्र पसरूं लागला. टिकाव-वाल्यांनीं दर्जा खरवडून पायावरची शिळा उखणून उलथून टाकली आणि ते लगोलग बाजूला झाले. 'केदारेश्वर ! केदारेश्वर ! जय केदारेश्वर !! जय जय केदारेश्वर !!!' अशा गर्जना त्यांच्या तोंडून चालल्या होत्या. सुवासिक धुराच्या लोळांत उघडलेली कमान झांकून गेली. इकडे वाद्यांचा गजर जोरानें चालू होता. कोणी कोणाशीं कांहींही बोलत नव्हतें. काय चाललें आहे हें

मात्र सर्वांना ठाऊक होतें. ठरल्याप्रमाणें अनुक्रमानें सारें घडलें. अर्धा तासपर्यंत सुवासाचा आणि धुराचा थर, उघडलेल्या कमानीवर, पसरून राहिला. हळूंहळूं शांतता भंग पावली. थोडी गजबज सुरू झाली. गजबजीचा गोंगाट झाला. गोंगाटाचा कल्होळ झाला आणि खालून आरोळ्या येऊं लागल्या. कोणी, " आडवा, तिला आडवा " म्हणत होते. कोणी, "जाऊं द्या, तिला जाऊं द्या' म्हणून गर्जत होते. वरील समारंभाकडे मन गुंतलेल्या स्वयंसेवकांकडे तिरस्कारानें पहात आणि ' ही ही ' करून दर्पयुक्त हास्य करीत ती त्यांच्या रांगांमधून झपाझप वर चालली आणि छत्रमंडपांत येऊन दाखल झाली.

तिला आवरावें असें कोणासच वाटेना. एकाद्या वेळीं असें होतें कीं, सर्व माणसें स्तिमित व निष्क्रिय बनतात, आणि जें घडत असेल त्याच्याकडे नुसतीं पहात बसतात. अनेकांना वाटलें कीं ठरलेल्या कार्यक्रमांतीलच हाही एक प्रकार असावा. देवकाई सरळठोक आली ती उघडलेल्या कमानीपाशीं आली आणि त्या कमानीवरून काढून टाकलेल्या शिळेला तिनें पायांतल्या वहाणेच्या तीन लाथा मारल्या. ' बया, मी सुटल्यें ग ! बया मी सुटल्यें ग ! ' असें म्हणून ती हुंदके देऊं लागली आणि त्वेषानें धांवत जाऊन कोचावर विराजमान झालेल्या त्या शूर पुरुषाच्या पायांवर डोई ठेवून ती ढसढसून रडूं लागली. " अर माज्या ल्येंकरा ! मी देवकाई हाय; तूं माजं ल्येंकरूं; तूं किश्न परमात्मा हैस; मी तुझी आय देवकी हाय. " तो थोडा बाचुकला, त्यानें आपले पाय मागें घेतले, उभें रहात रहात त्यानें तिलाही उभें केलें व सद्गदित होऊन तिच्या त्या भेसूर पण अर्थपूर्ण ध्यानाकडे तो पहात राहिला. " अरं, कली माजला अन् आमाला त्येनं गाडलं; त्वां मला सोडवलं रं ! तूं माजं

त्र्यंबकरूं ! " असें पुनः पुनः म्हणत ती त्या कमानीपाशीं गेली आणि खालीं कोसळली. हें आहे तरी काय असें जो तो शेजाऱ्याला विचारूं लागला; पण ज्याला त्याला हें काय आहे याची मनोमन साक्ष पटतच होती !

दरम्यान त्या कमानीचें तोंड पुरेसें उघडें ठेवून, तयार ठेवलेल्या गवंड्यांनीं, तिच्यावरच एक तुळशी वृंदावन व एक चौथरा भराभर रचून काढला; त्या सत्पुरुषांपैकीं एका वृद्धानें आपल्या हातानें तुळशीचें रोंप लाविलें. बुरख्यांत कोण आहे हें कोणाला कळलें नव्हतें. ताबडतोब स्वयंसेवकांनीं तो बुरखा काढला आणि देवकाईची बनविलेली सुबक मूर्ति त्यांनीं शेजारच्या चौथऱ्यावर बसविली. पलीकडे जमा केलेले उत्पन्नदार चवथऱ्याभोंवतीं जमले आणि त्या देवकीच्या मूर्तीला त्यांनीं नमन केलें. पांच सत्पुरुष पुढें झाले. त्या अकरा घागरींतील थोडें थोडें पाणी त्यांनीं त्या मूर्तीच्या मस्तकावर घातलें. तिच्या कपाळीं त्यांनीं मळवट भरला; तिला ताप्त्याचें वस्त्र नेसविलें व तिच्या अंगावर फुलांची रास ओतली. पुढें उभे राहून टाळ वाजवीत त्यांनीं अभंग सुरूं केला. तिकडे देवकाई आंचके देत पडली होती. सत्पुरुषांनीं अभंग म्हटले :—

"देव आहे तैसा नेणवे सहसा
भांबावला कैसा विश्वजन ।।

तया रूप नाहीं रेखा ना लक्षण
लाविलें आणून प्रतिमेसी ।।

देव सर्वगत निराळा अद्वैत
तया मूर्तिमंता ध्यायी जन ।।

पहातां या डोळां न दिसे प्रकट
भावनेनें निकट केलें रूप ।।

तुज घालुनियां पूजितों संपुष्टीं
परी तुझ्या पोटीं चौदा भुवनें ।।
तुज नाचवूनी दाखवूं कौतुका
परी रूप-रेखा नाहीं तूज ।।
तुजलागीं आम्हीं गात असों गीत
परी तूं अतीत शब्दाहूनी ।।
तुजलागीं आम्हीं घातियेल्या माळा
परी तूं वेगळा कर्तृत्वासी ।।
दीन वदे आतां होऊनि परिमित
माझें कांहीं हित विचारावें ।।

मूर्तीचें ध्यान उग्र हास्य करणारें होतें.

अभंग संपतांच सर्वांनीं त्या देवतेच्या मूर्तीवर फुलें उधळलीं आणि प्रत्येकजण तिला साष्टांग दंडवत घालूं लागला. फुलें वहावीं, दंडवत घालावें असा क्रम चालू झाला. समारंभ भरांत आल्यावर एक वृद्ध सत्पुरुष म्हणाला, "महाराज, आपण आतां यावें, फुलें वहावीं अन् दंडवत घालावें." पुढारी पुरुषाच्या मुखावर अनिश्चयाची छाया पसरली. सहस्र अनुयायी गळा दाटून येऊन ओरडले, "महाराज आपण पूजा केली पाहिजे; दंडवत घातलें पाहिजे." पुढाऱ्यानें आपलें आसन सोडलें. तो पुढें आला. त्यानें फुलें वाहिलीं व दंडवत घातलें. स्मरण झाल्यासारखें करून तो म्हणाला, "त्या देवकाईला पूजेला आणा." तोंच त्या सुवासिनी स्फुंदून उद्गारल्या "महाराज, आपण फुलें वहाण्यास हात वर केला त्याबरोबर देवकाईनें प्राण सोडला ! महाराज, देवकाईच्या मुखांतून निघालेला प्राण त्या देवकीच्या मूर्तींत गेलेला आपण पाहिला

नाहीं का ! आपण खऱ्या खऱ्या देवकीची पूजा केली आहे ! ”

सारी सभा भयचकित आणि स्तब्ध बनली. पुढारी त्या भांबावलेल्या सुवासिनीच्या तोंडाकडे पहात उभा राहिला. टाळ्यांचा गजर झाला. पुरंदरच्या डोंगरावर जिवंत—जागृत स्थान उत्पन्न झालें. जनसमाजाच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. टाळ्या, फुलें, गुलाल, बुक्का, गर्जना, परस्पर—आलिंगनें, देवतेच्या पायाशीं लोटांगणें, आणि पुढाऱ्याचीं दर्शनें यांचा खच पडला. महाराष्ट्रांतील पुरातन राजवंशाला स्वत्वाचा ठाव लागला. अठ्ठावीस युगें कर्दमांत नांदणाऱ्या एका मानववंशखंडाला प्रचंड उत्थानाचा झोका मिळाला. पुरंदरच्या पर्वताइतकेंच त्याचें मन आकांक्षी आणि उंच झालें. **देवकीच्या** स्थापनेचा संदेश हातोहात डोंगरभर पसरला. ‘ जय देवकी, जय देवकी ’ या जयजयकारांनीं बुडापासून शिखरापर्यंत तो पुरंदर पर्वत कंपायमान झाला आणि केदारेश्वराच्या शिखरावरून हा जयजयकार महाराष्ट्रभर नादावत गेला.

हळूहळू शांतता पसरली आणि पुढारी उच्चासनावर उभा राहून बोलूं लागला :

“ **माझ्या** बांधवानों ! आज तुम्ही खरे मुक्त झालां. तुमचा इतिहास मुक्त झाला. तुमचा धर्म मुक्त झाला. मला देवाधर्मांतलं काहीं कळत नाहीं. तुम्हांला कळतं. तुम्हांला देव हवा होता. तो तुम्ही मिळविलेला आहे. तुमच्या अवमानांतून, तुमच्यावर झालेल्या जुलमांतून, तुमच्या छळांतून तुमचा देव उत्पन्न झाला आहे. आतां त्याला सोडूं नका. ज्या देवांना तुम्ही भजत होतां त्यांनीं तुम्हांला कधीं माया दाखविली नाहीं. त्यांनीं तुम्हांला दाराच्या आंत पाऊल टाकूं दिलें नाहीं. हा देव मात्र तुमच्या भावनेंतून उत्पन्न झाला आहे. याला तुम्ही शिवूं नका असें म्हणण्याची कोणाची प्राज्ञा

ाहे ! तुमच्या सत्पुरुषांनींच त्याची स्थापना केली आहे आणि ांनींच त्याचे मंत्र म्हटले आहेत. तुम्हीं आपल्या पराक्रमानें हा वस आणलेला आहे. अरे माझ्या बांधवांनों ! या पुरंदरच्या ाखरावरून भोंवतालीं पहा ! जिकडे तिकडे दृष्टि पोंचेपर्यंत शेतवाडी म्हांला दिसेल. शिखरावर केदारनाथाचें देऊळ आहे. केदार ्णजे ' शेतवाडी ' हें तुम्हांला माहीत नाहीं. केदार म्हणजे शेती. ्चा नाथ हा शिखरावर बसून भोंवतालच्या साऱ्या शिवाराची ाखण करीत असतो. पण तुम्हांला आणखी एक गोष्ट माहीत ाहीं. महाराष्ट्रांतल्या या साऱ्या शेतीचे मालक तुम्ही होतां. ्हांला ' थोरल्या घरचे ' कां म्हणतात तें ध्यानांत आणा. याही- ां तुम्हांला ' भूमिपुत्र ' हें नांव या लोकांनींच दिलेलें आहे. ्ही खरोखरच या भूमीचे पुत्र आहां. तुम्हीच तिची औरस ाति आहां. म्हणून ही भोंवतालची शेती तुमचीच होती. त्या ाीचा नायक या शिखरावर बसलेला आहे. त्याच्याच पायथ्याशीं देवकीची स्थापना तुम्ही केली आहे. " बोला श्रीकृष्ण परमात्मा जय ! " तुम्ही म्हणतां मी तिचा पुत्र आहें ! बांधवांनों, मी चा पुत्र कसा असेन ? दशसहस्र महार आपली गर्दन फुगवून ाडले--" आपण श्रीकृष्ण परमात्मा आहां. आपण आहां आहां." नें तुमचें समाधान होतें काय ? " होय–होतें, होतें. " डलेल्या त्या जुन्या देवकाईची आतां देवकी झालेली आहे. या ाकीनें तुमच्यावर होत असलेल्या जुलमाला गति दिलेली आहे. देव णसाच्या अंगांत चैतन्य घालतो; पण या पाषाणाच्या देवकीच्या अंगांत हाडामांसाच्या देवकाईनं आपलें चैतन्य घातलेलें आहे; ती मरून गेली हे. तिच्या मरणानं, या देवतेच्या थापनेनं, हा गड आतां पवित्र ला आहे. आतांपर्यंत हा गड मला सुतक्यासारखा वाटत असे.

आतां ही तुमची पुण्यभूमि झाली आहे. या महाराष्ट्रभूमींतील तुमचें औरस देवस्थान कोणचें म्हणून विचारलें तर काय सांगाल ? " पुरंदरची देवकी, पुरंदरची देवकी, " सहस्र लोक ओरडले. बांधवांनो, मी आतां थकूं लागलों आहें. " आपण शंभर वर्षें जगा." तुमच्या शिक्षणाची व्यवस्था झाली. "होय." राजदरबारांत तुम्हांला प्रतिष्ठा प्राप्त झाली. "होय." त्या त्या श्रेष्ठ लोकांच्या मांडीला मांडी लावून तुम्ही बसूं लागलां. "होय." तुमचा क्षत्रियाचा धर्म तुम्हांला परत मिळाला. "होय, महाराज." आज तुमचा देव तुम्हांला मिळाला आहे. "होय." आतां सुखानें रहा. या राष्ट्राच्या कर्त्या लोकांत पुढारीपणानें वागा. माझा गळा दाटून येतो. बांधवांनो माझे या देवकीला आणि तुम्हांला सहस्र नमस्कार असोत ! "

आतां तुम्ही वाचक पुरंदरावर गेलांत तर 'देवकी'चें भव्य देवालय तुम्हांला दिसेल. त्याच्या पायरीपाशीं एक समाधि असून अंगांत आलेल्या बाईची एक मूर्ति त्या समाधीवर बसविलेली आढळेल.

---